# संस्कृत-वाक्यरचना.

( दुय्यम शाळांतील चोथी ते सातवी इयत्तांकरितां )

सखाराम रावजी भट, एम्. ए., बी. टी.
'मॅट्रिक्युलेशन संस्कृत ग्रॅमर'चे कर्ते

मॅकमिलन आणि कंपनी लिमिटेड
मुंबई
किंमत १। रुपया ] १९३४ [ सर्व हक्क स्वाधीन

# प्रस्तावना

संस्कृत भाषा अभ्यासकांस संस्कृत-वाक्यरचनेचें ज्ञान प्राप्त होऊन तदनुसार त्यांना संस्कृत ग्रन्थांचा अर्थ सुलभतेनें आत्मसात् करतां यावा या हेतूनें प्रस्तुत पुस्तक लिहिलें आहे. कोणत्याही भाषेच्या—विशेषतः संस्कृतासारख्या प्रचलित नसलेल्या भाषेच्या—प्राथमिक अध्ययनांत व्याकरणाबरोबरच वाक्यरचना या विषयालाही प्रमुख स्थान द्यावें लागतें. परंतु डॉक्टर भाण्डारकरकृत व्याकरण पुस्तकांच्या अगर इतर तत्सम पुस्तकांच्या योजनेंत चौथ्या इयत्तेपासून उपयुक्त होईल अशा रीतीचें वाक्यरचनेवरील पुस्तक आज उपलब्ध नाहीं व केवळ व्याकरणपुस्तकांतून या विषयास पुरेसें महत्त्व दिलेलें नसतें. या दृष्टीनेंच आजकाल तरी ६ व्या अथवा सुमारें ७ व्या इयत्तेंतून 'आपटेज् गाइड टु संस्कृत कंपोझिशन' या इंग्रजींत लिहिलेल्या पुस्तकाचा उपयोग करण्यांत येत असतो, व तें पुस्तक संस्कृतवाक्यरचनेचे विशिष्ट प्रकार समजावून देण्यास अत्यंत उपयुक्त आहे यांत शंका नाहीं. परंतु अलीकडे बऱ्याच विश्वविद्यालयांनां संस्कृत विषयांतील प्रश्नांचीं उत्तरें मातृभाषेतून लिहिण्याची सवलत विद्यार्थ्यांस दिल्यामुळें व परकीय भाषेपेक्षां मातृभाषेंतूनच कोणताही विषय शिकणें व शिकविणें सुलभ असल्यामुळें संस्कृत विषय मातृभाषेतूनच शिकविण्याची प्रथा पडत चालली आहे. वाक्यरचनेचे मूलभूत मुख्य मुख्य नियम आरंभापासूनच अमलांत आणावे लागत असल्यामुळें चौथ्या इयत्तेपासून सातव्या इयत्तेपर्यंत उपयुक्त होईल अशा क्रमवार मांडणी करून आधुनिक अध्यापनशास्त्रानुसार मराठींत लिहिलेल्या पुस्तकाचा उणेपणा संस्कृत शिक्षकांस आज बरेच दिवस वाटत आहे व थोड्या फार अंशानें तो उणेपणा दूर व्हावा म्हणून प्रस्तुत पुस्तक लिहिलेलें आहे. प्रस्तुत पुस्तकाचा हेतु साध्य व्हावा म्हणून पुढील सूचना अनुसरल्या जाणें इष्ट आहे.

१. पुस्तकांतील विषयांची मांडणी चौथ्या इयत्तेपासून सातव्या इयत्तेपर्यंतच्या व्याकरणक्रमानुसार शक्य तितकी सुलभ रीतीनें केली आहे. सामान्यतः १० ते १५ पाठ चौथ्या इयत्तेंत, २५ ते ३० पर्यंत पांचवींत, ४० ते ४५ पर्यंत सहावींत, व उरलेले सातवींत शिकविले असतां चार वर्षांत पुस्तक पुरें करतां येईल. परंतु

शिक्षकास जरूरीप्रमाणे कोणताही पाठ घेण्याला हरकत पडू नये या बद्दल दक्षता ठेवण्यात आली आहे. आशीर्वादार्थ व णमुल् अव्ययें याविषयी स्वतंत्र पाठ लिहिण्याइतका यांचा उपयोग संस्कृत वाङ्मयात होत नसल्यामुळे, आज्ञार्थ व ल्यबन्त अव्ययें या पाठांतच यांचा समावेश केला आहे. अर्थात् तेवढा भाग सहाव्या अथवा सातव्या इयत्तेत शिकविण्याकरितां राखून ठेवितां येईल.

२ प्रत्येक पाठामध्यें प्रथम उदाहरणादाखल सोपीं सोपीं वाक्यें (शक्य तितकीं संस्कृत ग्रन्थांतील) देऊन नंतर त्यावरून विवक्षित नियम रचण्यांत आले आहेत. त्यामुळें विद्यार्थ्यांना नियमाचें ज्ञान स्वतःच करून घेणें शक्य होईल. शिवाय उदाहरणांत दिलेल्या वाक्यांत संधि केलेले नाहींत, कारण नियमाचें नीट आकलन होणें हें ध्येय असल्यामुळें संधि करून दुर्बोधतेंत भर घातलेली नाहीं. यामुळें विद्यार्थ्यांस प्रथम पाठ स्वतः वाचावयास लागून नंतर शिक्षकांनी कठीण भागाचें विवरण केल्यास विद्यार्थ्यांमध्यें स्वावलंबन व आत्मविश्वास उत्पन्न करतां येईल.

३ प्रत्येक पाठांतील नियमाचें ज्ञान दृढ व्हावें म्हणून पाठाचे शेवटीं अर्थ करण्याकरितां व पाठांतील नियम कसे उपयोगांत आणले आहेत हें दर्शविण्याकरितां वाक्यें व श्लोक देण्यांत आले आहेत. त्यांची निवड मुख्यतः पंचतंत्र, हितोपदेश, रामायण, महाभारत, गीता, सुभाषित ग्रंथ, रघुवंश, शाकुन्तल व उत्तररामचरित अशा परिचित ग्रंथांतून केली आहे. यामुळें प्रत्येक श्लोकापुढें तो कोठून घेतला हें दर्शविण्याचें प्रयोजन आहेसें वाटलें नाहीं. ज्या ठिकाणीं अर्थ किंवा संदर्भ समजणें कठीण जाईल अशा ठिकाणीं अर्थबोधक व संदर्भदर्शक टीपा दिल्या आहेत, व कठीण शब्दांच्या अर्थासाठीं शेवटीं विस्तृत शब्दकोशही जोडण्यांत आला आहे. यामुळें विद्यार्थ्यांना स्वावलंबनानें अर्थ लावणें शक्य होईल. याच हेतूनें चौथ्या इयत्तेतील विद्यार्थ्यांना कठीण जाऊं नये म्हणून पहिल्या १५ पाठांतील वाक्यांमध्यें संधि केलेले नाहींत. मात्र श्लोक अथवा श्लोकार्ध पाठ करतां यावे म्हणून त्यांतील संधि केलेले आहेत.

४ निरनिराळ्या पाठांतून शिकलेल्या नियमांचा उपयोग करतां यावा या दृष्टीनें अभ्यासाचे आधुनिक तऱ्हेचे विविध प्रकार पाठांचे शेवटीं देण्यांत आले आहेत. त्यांतील वाक्यें निर्दिष्ट तऱ्हेनें पुरीं करून व संधि करून पुन्हा स्वतंत्र वहींत विद्यार्थ्यांनी लिहिल्यास संधिनियमांचें आवश्यक ज्ञानही दृढ होण्यास मदत होईल.

शिवाय या योगानें सामान्यतः रूढ असलेल्या संस्कृत भाषान्तररूपी लेखन प्रकारालाही उपयुक्त तर्‍हेनें विविधता व सरसता आणता येईल.

प्रस्तुत पुस्तक लिहितांना सिद्धांतकौमुदी व इतर प्रचलित व्याकरणविषयक ग्रंथांचा व विशेषतः 'आपटेज् गाइड् टु संस्कृत कॉम्पोझिशन' या पुस्तकाचा मला जो उपयोग झाला त्याचा या ठिकाणीं कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें जरूर आहे. त्याचप्रमाणें पुस्तक लिहीत असतांना श्री. ज. आर्. दारंगेकर, बा. ए. (ऑ.), संस्कृत शिक्षक, कोल्या हायस्कूल, मुंबई, यांनीं जी वेळोवेळीं मदत केली त्याबद्दल व पुस्तकाचें हस्तलिखित काळजीपूर्वक वाचून गु. श्री. वि. ज. जोशी, एम्. ए., संस्कृत शिक्षक, नाशिक हायस्कूल, यांनीं ज्या मार्मिक सूचना केल्या त्याबद्दल मी उभयतांचा अत्यंत आभारी आहे.

शेवटीं पुस्तकाच्या कल्पनेपासून पुस्तक लिहून पुरें होईपर्यंत ज्यांनीं ज्यांनीं मला उत्तेजन दिलें त्या सर्वांचे आभार मानून ही लांबलेली प्रस्तावना पुरी करतों.

मुंबई,
नोव्हेंबर १९३४

स. रा. भट.

# संस्कृत-वाक्यरचना.

## अनुक्रमणिका.

# संस्कृत-वाक्यरचना.

## अनुक्रमणिका.

| विषय | पृष्ठ |
| --- | --- |


---

# पाठ १.

## शब्दांच्या जाति.

१ रामः ईश्वरं पूजयति ।
जनाः उद्यानं गच्छन्ति ।
पुष्पाणां सौन्दर्यं जनान् आनन्दयति ।

वरील वाक्यामध्ये **रामः** हें मनुष्याचें नाव अथवा विशेषनाम, **ईश्वरम्**, **जनाः**, **उद्यानम्**, **पुष्पाणि** हीं सामान्य नावें अथवा नामें, आणि **सौन्दर्यम्** हें भाववाचक नाम अशीं विविध प्रकारचीं **नामें** आहेत.

२ एषः नरः मम मित्रम् इति पुत्रः जनकं कथयति ।
किं त्वं पश्यसि उद्याने इति आचार्यः छात्रं पृच्छति ।
अहं पुष्पाणि पश्यामि इति छात्रः वदति ।

वरील वाक्यातील **एषः**, **मम**, **किम्**, **त्वम्** व **अहम्** हे नामाबद्दल आलेले शब्द **सर्वनामें** होत.

३ एतानि रमणीयानि चित्राणि ।
बहवः कुमाराः विविधैः प्रकारैः क्रीडन्ति ।
दशरथस्य चत्वारः पुत्राः ।

वरील वाक्यातील **रमणीयानि**, **बहवः**, **विविधैः** व **चत्वारः** हीं गुण किंवा संख्या दर्शविणारीं **विशेषणें** आहेत

४ मयूराः नृत्यन्ति ।
बालाः पाठशालां गच्छन्ति ।
वयं श्रीगणेशं नमामः ।

वरील वाक्यामध्यें **नृत्यन्ति**, **गच्छन्ति** व **नमामः** हे शब्द वाक्यातील क्रिया दर्शविणारे अर्थात् **क्रियापदें** आहेत.

## (अव्ययानि.)

५ अश्वः शीघ्रं धावति।
बालः सविनयं वदति।
अद्य अहं देवालयं गच्छामि।

वरील वाक्यांत शीघ्रम्, सविनयम् व अद्य या शब्दांचा क्रियेशीं संबंध आहे व यांचीं रूपें बदलत नाहींत. म्हणून हीं **क्रियाविशेषण अव्ययें** होत.

६ कृष्णं परितः गोपाः तिष्ठन्ति।
वृक्षस्य समीपे क्रीडति गोपालः।
पाठशालायाः पुरतः उद्यानं वर्तते।

वरील वाक्यांतील परितः, समीपे व पुरतः हे रूप न बदलणारे शब्द नामाच्या विशिष्ट विभक्तीपरीकर योजलेले आहेत. म्हणून हे **शब्दयोगी अव्ययें** होत.

७ रामः गोपालः कृष्णः च पाठशालां गच्छन्ति।
युद्धे वीरः अश्वम् आरोहति रथे उपविशति वा।
अहं क्रीडाङ्गणं गच्छामि। किन्तु मम वयस्याः तत्र न आगच्छन्ति।

वरील वाक्यामध्यें च, वा व किन्तु हे रूप न बदलणारे शब्द दोन अथवा अधिक नामें, क्रियापदें किंवा वाक्यें जोडणारे आहेत. म्हणून यास **उभयान्वयी अव्ययें** म्हणतात.

८ अहह दारुणः प्रसङ्गः।
आः कथम् अद्यापि शत्रुभ्यः भयम्।
अहो रमणीयता उद्यानस्य।

वरील वाक्यांत अहह हा शोक, आः हा क्रोध अथवा आश्चर्य व अहो हा आनंद असे निरनिराळे मनोविकार दर्शविणारे व रूप न बदलणारे शब्द **उद्गारवाचक अव्ययें** होत.

यावरून असे दिसून येईल कीं, इतर भाषांप्रमाणें संस्कृत भाषेमध्यें सुद्धा शब्दांचे आठ प्रकार आहेत परंतु संस्कृत व्याकरणकार शेवटील चार प्रकारांचा समावेश ' अव्ययानि अथवा निपाता ' या एकाच प्रकारामध्यें करतात

## अभ्यास १

(अ) पुढील वाक्यांचा अर्थ करून त्यांतील नामें, विशेषण व क्रियापदें सांगा —

१ मणिभद्रस्य नाम वैश्यस्य रत्नोद्भव नाम पुत्र अस्ति ।

२ एकस्मिन् विस्तीर्णे उद्याने आम्रा पनसा नारिकेला च इति विविधा तुङ्गा वृक्षा वर्तन्ते ।

३ विशालस्य कासारस्य अगाधे जले बहव मण्डूका वसन्ति ।

४ अश्व सौम्य धीर चतुर च पशु ।

५ संवत्सरस्य आरम्भे बाल नवीन पुस्तक लभते ।

(आ) पुढील वाक्यसमूहांतील अन्वयें दर्शवून त्याचा अर्थ करा —

१ अद्य अहं शनै शनै सिंह प्रति गच्छामि इति शशक स्वगत चिन्तयति । तथा च करोति । तत्र सिंह त सकोप वदति । आ किं तव विलम्बस्य कारणम् । सत्वर कथय इति ।

२ एकदा जम्बूक वन गच्छति पश्यति च द्राक्षाफलानि मण्डपे । स पुन पुन उत्पतति किन्तु तानि स न लभते । तदा स वदति अम्लानि खलु एतानि द्राक्षाफलानि इति ।

## अभ्यास २

अर्थ करून जाड अक्षरांतील शब्दांच्या जाति सांगा —

१ अस्ति एकस्मिन् वने वटवृक्ष । तस्य कोटरे कृष्णसर्प निवसति । स च सदैव वायसानां शावकान् भक्षयति । एकदा एक बक दु खेन कुलीरक कथयति । मम शावकान् दुष्ट सर्प भक्षयति । किं करोमि कथं च सर्पं नाशयामि इति । तदा कुलीरक वदति । त्वं मत्स्यस्य मांसखण्डान् नकुलस्य सर्पस्य च विवरयो मध्ये क्रमेण प्रक्षिप इति । नकु:

तथा करोति। पश्चात् नकुल: विवरात् बहि: आगच्छति। तान् च भक्षयति। सर्पस्य विवरस्य समीपं गच्छति। तत: नकुल: प्रथमं सर्पं मारयति। पश्चात् वकाना शावकाना रवं शृणोति तान् अपि भक्षयति। एवं यत्नेन कृत: उपाय: अपाय: भवति।

विद्या मित्रं प्रवासेषु भार्या मित्रं गृहेषु च।
व्याधितस्यौषधं मित्रं धर्मो मित्रं मृतस्य च ॥
हस्तस्य भूषणं दानं सत्यं कण्ठस्य भूषणम्।
श्रोत्रस्य भूषणं शास्त्रं भूषणैः किं प्रयोजनम् ॥
वरः वरयते कन्या माता वित्तं पिता श्रुतम्।
बान्धवाः कुलमिच्छन्ति मिष्टान्नमितरे जनाः ॥

---

# पाठ २.

## नामें—लिंगविचार.

**राम, सीता, अयोध्या, वनम्, सूर्य, उद्यानम्, चन्द्र, निशा, सौन्दर्यम्, हर्ष, रमणीयता।**

वरील सर्व शब्द निरनिराळ्या प्रकारची नामें आहेत परंतु त्यांचीं लिंगें निरनिराळीं आहेत —

(तो) **राम, सूर्य, चन्द्र, हर्ष** — पुल्लिंगी
(ती) **सीता, निशा, रमणीयता** — स्त्रीलिंगी
(तें) **वनम्, उद्यानम्, सौन्दर्यम्** — नपुंसकलिंगी

वरील उदाहरणावरून साधारणपणें असें म्हणतां येईल कीं, संस्कृत भाषेमध्यें इतर भाषांप्रमाणें ताहीं लिंगाचा नियम आहेत. सामान्यतः नामाच्यापूर्वी मराठीप्रमाणें तो, ती, तें यांपैकीं जें सर्वनाम योजतां येईल त्याप्रमाणें त्याचें लिंग असतें. परंतु या सामान्य नियमाला पुष्कळ अपवाद आहेत.

## अपवादः—

१ रामस्य मित्रं गोविन्दः। यज्ञे विप्रः उपस्थितः।
प्रभातस्वप्नः शुभः। धान्यस्य राशिः मूल्येन नीतः।
मम वस्तु सुन्दरम्। नेत्रे अश्रु दृष्टम्।
व्याधिः नष्टः औषधेन। बालकस्य ऊरुः न स्थूलः।

वरील उदाहरणांतील अधोरेखित शब्दांचा लिंगें मराठींतील लिंगाहून भिन्न आहेत.

२ गङ्गायाः तटः–तटी–तटम्।
शोभनं दिनम्–शोभनः दिनः।

वरील उदाहरणांतील अधोरेखित शब्द भिन्न भिन्न लिंगाचे आहेत. संस्कृतमध्यें पुल्लिंगी व नपुंसकलिंगी असणारे असे शब्द पुष्कळ आहेत.

३ रामस्य देहः–कायः (पु.), तनुः (स्त्री.), शरीरम् (न.)।
नृपस्य आदेशः (पु.), आज्ञा ,, , शासनम् ,,।
नरस्य कामः–मनोरथः ,, , इच्छा ,, , ईप्सितम् ,,।
मङ्गलः संवत्सरः। मङ्गलाः समाः। मङ्गलं वर्षम्।

वरील उदाहरणांमध्ये एकाच अर्थाचे शब्द भिन्न भिन्न लिंगाचे आहेत.

४ वसुः–(पु.) सूर्य, (न.) द्रव्य, (स्त्री.) प्रकाश.
हरित्– ,, जलद चालणारा घोडा, ,, गवत, ,, पृथ्वीचा भाग.
अर्चिस्–,, अग्नि, ,, ज्वाला, ,, रश्मिची स्त्री.

वरील शब्दांचे निरनिराळ्या लिंगामध्यें निरनिराळे अर्थ होतात.
म्हणून सामान्य नियमाला अपवाद असणाऱ्या शब्दांची लिंगें पाठ केली पाहिजेत.

### अभ्यास १

पुढील नामांची लिंगें सांगा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा —

आम्र (वृक्ष व फल), अभिलाष, अलङ्कार, भूषण, अभ्र, आशा, उदर, चित्र, व्यथा, क्रोध, क्षेत्र, गोदावरी, खनिज, ग्रीष्म, धान्य, देवता, नगर,

नगरी, नद नदी, पद, पद्म, फल, शङ्ख, शठ, व्याघ्र, सुख, स्तुति, मति, स्नेह, प्रीति, सुवर्ण

## अभ्यास २

पुढील वाक्यांचा अर्थ सांगून त्यांतील जाड्या अक्षरांतील नामांचीं लिंगें सांगा —

१ दुर्जना मक्षिका वायवः **विघ्नान्** उत्पादयन्ति ।
२ क्रुद्धः नरः धनस्य **नाशेन** क्षुभ्यति ।
३ सङ्कटस्य समये **मित्राणि** अपि नरं त्यजन्ति ।
४ दीपाः अन्धकारं नाशयन्ति । तथा औषधानि **व्याधीन्** नाशयन्ति ।
५ सज्जनाः **स्वप्ने** अपि वचनस्य भङ्गं न कुर्वन्ति ।
६ जनाः प्रातःकाले **मित्रं** पश्यन्ति नमन्ति च ।
७ सायङ्काले वृद्धाः नराः **देवालयं** गच्छन्ति ।
८ शालागृहस्य **पुस्तकालये** विविधान् ग्रन्थान् पश्यन्ति छात्राः ।
९ बालकस्य नेत्राभ्याम् **अश्रूणि** पतन्ति ।
१० रम्याणि **वस्तूनि** जनान् प्रीणयन्ति ।

---

# पाठ ३.

## नामें—वचनविचार.

१ एकः वृक्षः, द्वौ वृक्षौ, बहवः वृक्षाः ।
एका लता, द्वे लते, बह्व्यः लताः ।
एकं पुष्पम्, द्वे पुष्पे, बहूनि पुष्पाणि ।

वरील उदाहरणांवरून असें दिसून येतें कीं संस्कृतमध्यें तीन वचनें आहेत — **एकवचन, द्विवचन व बहुवचन**. इंग्रजी अथवा मराठी भाषेमध्यें दोनच

वचन आहेत—एकवचन व अनेकवचन. म्हणून संस्कृतमध्ये अनेकवचन असा शब्द उपयोगात आणीत नाहीत, कारण अनेकवचन या शब्दात द्विवचनाचाही अन्तर्भाव होतो.

सामान्यतः एकवचन एक वस्तु अथवा प्राणी दर्शविते, द्विवचनावरून दोन वस्तूंचा अथवा प्राण्यांचा बोध होतो व बहुवचन हे दोहोंहून ज्यास्त वस्तु अथवा प्राणी दर्शविते.

## विशिष्ट उपयोगः—

२ **एकवचनः—ब्राह्मणः पूज्यः** अथवा **सिंहः बलिष्ठः** याचा अर्थ एक ब्राह्मण पूज्य अथवा एक सिंह बलिष्ठ एवढाच नव्हे, तर सर्व ब्राह्मणवर्ग पूज्य अथवा सर्व सिंहवर्ग बलिष्ठ असा होतो. यावरून असे दिसून येते की संस्कृतमध्ये एकवचनाचा उपयोग वर्गवाचक रीतीनेही केला जातो.

३ **द्विवचनः—जायापती, जम्पती, दम्पती** (नवरा–बायको), **पितरौ** (आईबाप), **रोदसी** (पृथ्वी व आकाश), **द्यावाभूमी–द्यावापृथिव्यौ** (पृथ्वी व आकाश), हे शब्द नेहमी दोन वस्तु अथवा प्राणी दर्शवितात, म्हणून याचा उपयोग नेहमी द्विवचनात केला जातो

**नरस्य हस्तौ, पादौ, कर्णौ, नयने** हे अवयववाचक शब्द एका मनुष्यासंबंधी बोलताना दोन वस्तु दर्शवितात, म्हणून त्याचा उपयोग द्विवचनात केला जातो

**द्वयम्–द्वितयम्–युगम्–युगलम्–द्वन्द्वम्**—हे शब्द 'जोडी' या अर्थी उपयोगात येतात व अर्थावरून जरी दोन वस्तूंचा बोध होत असला तरी त्याचा उपयोग एकवचनात होतो ज्या वेळेला दोन अथवा दोहोंहून अधिक जोड्या असा अर्थ दर्शवायाचा असेल त्या वेळी वरील शब्द द्विवचनात अथवा बहुवचनात योजता येतात

४ **बहुवचनः—(अ) भारतवर्षे बहूनि पवित्राणि स्थलानि सन्ति।** या वाक्यात '**स्थलानि**' या बहुवचनान्त नामाचा उपयोग '**पुष्कळ ठिकाणें**' या अर्थी केलेला आहे.

(आ) **ब्राह्मणाः पूज्याः, सिंहाः बलिष्ठाः,** या ठिकाणी **ब्राह्मणाः** व **सिंहाः** या बहुवचनाचा उपयोग वर्गवाचक पद्धतीने केलेला आहे.

(इ) आचार्यपादाः—गुरुचरणाः—मातृचरणाः—तातपादाः— ही आदरार्थी बहुवचनाची रूपे आहेत. आचार्य, गुरु, पितृ, मातृ इत्यादि आदरणीय व्यक्तिवाचक शब्दांना 'चरण किंवा पाद' हा शब्द जोडून आदर दर्शविण्याकरिता बहुवचनांत उपयोग करण्याचा प्रघात आहे. हेच शब्द नुसते बहुवचनांत योजले असतांही आदर दर्शविला जातो.

✓(ई) मगधाः, वङ्गाः, विदर्भाः, निषधाः, कलिङ्गाः हे देशवाचक शब्द लोकांच्या नावावरून घेतले असल्यामुळें बहुवचनात योजले जातात. परंतु लोकांच्या नावाला जर 'देश किंवा विषय' हा शब्द जोडला तर त्याचा उपयोग एकवचनांत होतो. जसे.—निषधाः याबद्दल निषधदेशः किंवा निषधविषयः।

✓ (उ) रघवः, कुरवः, पाञ्चालाः, जनकाः—हे शब्द बहुवचनात कुलवाचक अर्थ दर्शवितात. असें.—रघवः-रघुकुलम्।

✓ (ऊ) आपः (स्त्री. पाणी), वर्षाः (स्त्री. पावसाळा), सिकताः (स्त्री. वाळू) अक्षताः (पु. न मोडलेले तांदूळ), गृहाः (पु. घर), दाराः (पु. पत्नी) असवः-प्राणाः (पु. प्राण) यां शब्दांचा उपयोग नेहमीं बहुवचनात होत असतो. अर्थ मात्र एकवचनी असूं शकतो.

समाः—(स्त्री. वर्षे) हा शब्द बहुवचनात योजतात व त्याचा अर्थ बहुवचनीच असतो.

## अभ्यास १

पुढील वाक्यात रिकाम्या जागी या पाठांतील नियमांना अनुरूप होतील अशीं पुढें दिलेल्या रूपांतील योग्य तीं रूपें योजा :—

१ नलः निषधानां नृपः। २ गङ्गायाः ~~सिकताः~~ आपः शुभाः।
३ वर्षासु पर्जन्यः पतति। ४ सायङ्काले बाला- समुद्रस्य तीरे सिकताभिः क्रीडन्ति।
५ मित्रस्य असवः रक्षति दानः। ६ रघुकुले रघुषु वा रामः जातः।
७ द्रुपदः पाञ्चालदेशस्य पाञ्चालानां वा नृपः। ८ अहं रघूणां श्रीरामं नमामि।
९ सर्वेषु श्वापदेषु सिंहः बलिष्ठः। १० पितरौ पुत्रस्य पराक्रमेण हृष्यतः।

(आपः, पाञ्चालानाम्, इत्यादम्, रघुषु, वर्षासु, प्रणात्, सिंहः, सिकताभिः, निषधानाम्, पितरौ)

## अभ्यास २

पुढील वाक्यांचा अर्थ सांगून त्यांतील जाड्या अक्षरांतील शब्दांच्या विशिष्ट वचनाचें कारण सांगा —

१ **मगधेषु** पाटलिपुत्रं नाम नगरम् ।
२ **गुरुचरणानां पितृचरणानां** च दर्शनं पुण्यम् ।
३ पुत्रस्य मरणेन दुःखिता जननी हाहानिनादेन **रोदसी** पूरयति ।
✓४ दशरथस्य **दारेषु** कौसल्यायां रामः जातः ।
५ पीडिताभ्यः **सिकताभ्यः** अपि तैलं न लभ्यते ।
वरुणः **अपां** पतिः इति वेदेषु लिखितम् अस्ति ।
७ **जनकानां रघूणां** च सख्यं च जनानां प्रियम् ।
८ जननी **प्राणानां** त्यागेन अपि पुत्रं रक्षति ।
✓९ कस्मिंश्चित् प्रदेशे आम्रवृक्षे वायसदम्पती प्रतिवसतः ।
१० माता मित्रं पिता चेति स्वभावात्त्रितयं हितम् ।

---

# पाठ ४.

## वाक्यरचना.

१ **कुमारः हस्ताभ्याम् ईश्वरं नमति ।**
**हस्ताभ्यां नमति ईश्वरं कुमारः ।**
**ईश्वरं नमति कुमारः हस्ताभ्याम् ।**
**नमति ईश्वरं हस्ताभ्यां कुमारः ।**

वरील सर्व वाक्यांचा अर्थ सारखाच आहे परंतु शब्दांची मांडणी निरनिराळी केलेली आहे. संस्कृतमध्यें एकाच वाक्यांतील शब्द सामान्यपणें कोणत्याही क्रमानें लिहिले तरी चालतात, कारण वाक्यांतील प्रत्येक शब्द विवक्षित अर्थ दर्शवितो व त्याच्यावरून वाक्यांतील त्याचा संबंध स्पष्ट होतो

जसे, '**कुमारः**' हा प्रथमान्त एकवचनी शब्द कर्तृपद आहे. तो कोठेंही योजला तरी तो कर्तृपदच होणार. तसेंच '**ईश्वरम्**' हा शब्द द्वितीयेचे एकवचनात आहे. तो वाक्यांत कोठेंही योजला तरी तो कर्मपदच होणार. तसेंच '**नमति**' हें वर्तमानकाळी तृतीयपुरुषी एकवचनी क्रियापद कुमारः या कर्तृपदाशीं जुळणें होणार. '**हस्ताभ्याम्**' हा तृतीया-द्विवचनान्त शब्द वाक्यात कोठेंही योजलेला असला तरी **नमति** या क्रियापदाशीं साधनसंबंध दर्शविणार.

## काहीं अपवादः—

२ **रामः गृहं गच्छति कन्दुकेन क्रीडति च ।**

या संयुक्त वाक्यातील शब्दांची रचना जर बदलली तर काय परिणाम होईल तो पाहूं. जसें '**कन्दुकेन गच्छति गृहं रामः च क्रीडति ।**' या वाक्याचा अर्थ असंबद्ध असा होईल. म्हणून हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं संयुक्त अथवा मिश्र वाक्यामधील एका क्रिया असलेल्या त्याचा योग्य क्रम बदलता कामा नये; कारण त्यामुळे अर्थाऐवजी अनर्थ होईल. परंतु त्या संयुक्त अथवा मिश्र वाक्यातील जी साधी एक क्रिया असलेली वाक्यें असतील त्यांतील शब्दरचना बदलली तर अर्थांतर अथवा अनर्थ होणार नाहीं. जसें, **गच्छति रामः गृहं क्रीडति च कन्दुकेन ।** या वाक्याचा व मूळ वाक्याचा अर्थ सारखाच आहे; कारण घरी जाणे व चेंडूनें खेळणें या क्रियांचा क्रम बदललेला नाहीं. फक्त पहिल्या साध्या वाक्यांतील शब्दांचा क्रम बदलला व तसाच दुसऱ्याही वाक्यांतील बदलला.

३ (अ) **रामः च गोविन्दः च पाठशालां गच्छतः ।**
**रामः वा गोविन्दः वा पाठशालां गच्छति ।**
**रामः एव पाठशालां गच्छति ।**
**रामः कुमारेषु चतुरः खलु ।**

वरील वाक्यांतील **च, वा, एव** आणि **खलु** हीं अव्ययें वाक्याच्या आरंभी उपयोगांत आणून, **च रामः च गोविन्दः** ........। या रामा

गोविन्दः . .....। एव रामः... ....। खलु रामः ... . . । असा तऱ्हेनें योजना करता येणार नाहीं.

(आ) बालः परीक्षाम् उत्तरति सः हि उद्यमशीलः ।

हें वाक्य बालः परीक्षाम् उत्तरति हि सः उद्यमशीलः । असें योजता येणार नाहीं, कारण 'हि' म्हणजे 'कारण' हें अव्यय वाक्याच्या आरंभीं येत नाहीं तर वाक्यांत पहिल्या शब्दानंतर येतें. त्याप्रमाणें,

(इ) गोविन्दः उद्यमशीलः तस्य पुत्रः तु अलसः ।

हें वाक्य गोविन्दः उद्यमशीलः तु तस्य पुत्रः अलसः । असें म्हणता येत नाहीं, कारण 'तु' म्हणजे 'परंतु' याचा उपयोग 'हि' प्रमाणें वाक्याच्या आरंभीं करता येत नाहीं, तर तो वाक्यामध्यें नंतरच करावा लागतो.

(ई) गोविन्दः उद्योगं करोति चेत् सः धनं लभते ।

या वाक्यांतील 'चेत्' म्हणजे 'जर' हें अव्ययसुद्धा हि व तु या अव्ययांप्रमाणें वाक्याच्या आरंभीं उपयोगांत आणता येत नाहीं. या ठिकाणीं वर्तमान काळीं रूपाचा भविष्यकालवाचक अर्थ आहे

(उ) रामः उद्यानं गच्छति । गोविन्दः अपि उद्यानं गच्छति ।

येथ 'अपि गोविन्दः उद्यानं गच्छति' असा जर शब्दप्रयोग केला तर वाक्याला प्रश्नाचें स्वरूप येईल व मूळचा अर्थ दर्शविला जाणार नाहीं म्हणून 'अपि' म्हणजे 'सुद्धा' या अव्ययाचा उपयोग ज्या शब्दाशीं त्याचा संबंध असेल त्या शब्दापुढें केला पाहिजे

(ऊ) रामः गोविन्दः इव चतुरः न ।

या वाक्यांत जर रामः इव गोविन्दः चतुरः न । असा शब्दरचनेत बदल केला तर अर्थ अगदीं विरुद्ध होईल, म्हणजे 'राम गोविंदाप्रमाणें चतुर नाहीं' या ऐवजीं 'रामाप्रमाणें गोविंद चतुर नाहीं' असा होइल, म्हणून 'इव' म्हणजे 'सारखा, प्रमाणें' या अव्ययाचा उपयोग उपमानानंतर (ज्याची उपमा दिली असेल त्या शब्दानंतर) केला पाहिजे.

(ए) 'त्वम् अधुना गृहं गच्छ' इति गुरुः छात्रं कथयति ।

या वाक्यांतील 'इति' म्हणजे 'असें' या अव्ययाची बोलल्या शब्दानंतरच्या

जागा बदलता येणार नाही. तोंडच्या शब्दानंतर 'इति' या अव्ययाचा उपयोग केला पाहिजे.

वरील सर्व उदाहरणांवरून हें लक्षात येईल कीं संस्कृतमध्यें एकाच साध्या वाक्यातील शब्दांची रचना कशीही केली तरी अर्थाला बाध येत नाही. परंतु संयुक्त अथवा मिश्र वाक्यामधील क्रियांचा क्रम बदलेल अशा रीतीनें शब्द बदलता येणार नाहींत.

त्याचप्रमाणें **च, वा, एव, खलु, हि, तु, चेत्** हीं अव्ययें वाक्याच्या आरंभीं उपयोगांत आणतां येणार नाहींत व **अपि, इव** आणि **इति** यांच्या जागा बदलतां येणार नाहींत.

साध्या संस्कृत वाक्यांतील शब्दरचना कशीही केली तरी चालते असें जरी वरील विवेचनावरून दिसून येईल तरी सामान्यतः पुढें दिल्याप्रमाणें वाक्यरचना असावी —

प्रथम कर्तृपदाचीं विशेषणें व कर्तृपद, नंतर, कर्मपदाचीं विशेषणें व कर्मपद व शेवटीं क्रियापदाशीं संबद्ध असणारीं क्रियाविशेषणें व क्रियापद. स्थलवाचक अथवा कालवाचक अव्ययें अथवा अव्ययार्थी शब्दसमूह, बहुधा वाक्याच्या आरंभीं योजतात. त्याचप्रमाणें वाक्यांतील क्रियेवर जोर द्यावयाचा असल्यास क्रियापद प्रथम योजतात. उद्गारवाचक अव्ययें वाक्याच्या आरंभीं येतात. 'आसीत्' हें रूप प्राचीन काळच्या जुन्या गोष्टी वर्णन करतांना आरंभीं योजण्याची वहिवाट आहे.

## अभ्यास १

पुढील वाक्यांचा अथवा श्लोकांचा अर्थ करा व त्यांतील शब्दांची रचना बदलतां येईल कीं नाहीं हें सकारण सांगा —

१ दशरथस्य ज्येष्ठा भार्या कौसल्या मध्यमा सुमित्रा कनिष्ठा च कैकेयी अभवन्।

२ सूर्यस्य आतपेन पीडिता जनाः वृक्षाणां छायाम् आश्रयन्ते विश्रान्तिसुखम् अनुभवन्ति च।

३ एकः, हिमालयपारात् आगतः सचनम नाम बालकः द्वारि तिष्ठति देवपाददर्शनम् इच्छति च।

४ राजहंसः स्वभावात् मन्दगतिः चित्रवर्णस्य सेनापतिना कुक्कुटेन वेष्टितः ।
५ रामः प्रसन्नः भवति तथा मधु हस्तेन स्पृशति अस्त्रविद्यां शिक्षते च ।

६ पादपानां भयं वातात्पद्मानां शिशिराद्भयम् ।
पर्वतानां भयं वज्रात्साधूनां दुर्जनाद्भयम् ॥

७ निमित्तमुद्दिश्य हि यः प्रकुप्यति
ध्रुवं स तस्यापगमे प्रसीदति ।

८ धरायाः भूषणं विद्या मन्त्रिणां भूषणं नृपः ।
भूषणं च पतिः स्त्रीणां शीलं सर्वस्य भूषणम् ॥

९ यथामिषं जले मत्स्यैर्भक्ष्यते श्वापदैर्भुवि ।
आकाशे पक्षिभिश्चैव तथा सर्वत्र वित्तवान् ॥

१० धनस्यार्जने दुःखं तापयन्ति विपत्तिषु ।
मोहयन्ति च सम्पत्तौ कथमर्थाः सुखावहाः ॥

## टीपा

३ देव हा शब्द पद्याचा राजा ‘राजहंस’ याला उद्देशून योजला आहे—
देव—महाराज
देवपाद द्रष्टुम् (इच्छति)—महाराजांच्या पायांचे दर्शन घेण्याची (इच्छा धरीत आहे)

९ ‘आमिषं भक्ष्यते’ हे शब्द सर्व वाक्यांशाबरोबर जोडले पाहिजेत.

## अभ्यास २

पुढील शब्दांची योग्य रीतीने मांडणी करून वाक्ये बनवा —

१ उत्तिष्ठन्ति, मृगाणि, देव, बालाः, प्रक्षालयन्ति, वदनम्, च, नमन्ति ।
२ तीरं, उद्यानं, सायङ्काले, वा, गच्छन्ति, समुद्रस्य, जनाः ।
३ विश्रान्तिसुखं, चरन्ति, वा, उद्याने, अनुभवन्ति, इतस्ततः, जनाः ।
४ रामः, च, गोपालः, प्रदीपं, किन्तु, कृष्णः, अर्जुनः, एव, कृष्णं, धावन्ति ।

५ वृक्षस्य, मूर्धा, शाखाया, वायस, गानाय, नृत्यति, विरव, च, करोति, तदा, मुख, मासखण्ड, भूमौ, मुखात्, पतति ।

पुढाल वाक्यें च, वा, इति, हि, तु यापैकी योग्य अव्ययानी जोडून लिहा —

६ राम समुद्र तरति । युध्यते राम रावणेन सह । राम न पलायते ।
७ छात्र पारितोषिक लभते । [illegible] सावधानम् अध्ययन करोति ।
८ जनक पुत्र वदति । आवाम् अधुना उद्याम गच्छाव ।
९ जम्बूक बहुवारम् उत्पतति । स द्राक्षाफलानि न लभते ।
१० अह सूत अस्मि । अह सूतपुत्र अस्मि । पश्य मम पराक्रमम् । कर्ण द्रोणस्य पुत्र कथयति ।

## अभ्यास ३

खाली दिलेल्या प्रत्येक शब्दसमूहानास शब्दाची योग्य रूपें तयार करून अर्थपूर्ण वाक्यें बनवा —

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | रात्रि, | खग | यम्, | नीड | |
| २ | जन, | उद्यान | अनु+भू, | विश्रान्तिसुख | |
| ३ | भक्त, | ईश्वर, | पुष्प, | पूज् | |
| ४ | समुद्र, | वात, | तरङ्ग, | उद्+भू | |
| ५ | बाण, | शत्रु, | योध, | क्षिप् | |
| ६ | चन्द्र, | पूर्णिमा, | जन, | चित्त, | आह्लाद् |
| [illegible] | प्रजा, | नृप, | पितृ, | भू | |
| ८ | जनक, | दा, | अलङ्कार, | कन्या | |
| ९ | छात्र, | अध्ययन, | वृध्, | ज्ञान | |
| १० | नर, | उद्यम, | लभ्, | धन | |

## अभ्यास ४

प्रथम विभागातील कर्तृपदाना अनुरूप असे द्वितीय समूहातील विधेय भाग जोडा —

| | प्रथमविभाग | | द्वितीयविभाग |
|---|---|---|---|
| १ | अश्वा | १ | आकाशे उड्यन्ते । |
| २ | खगा | २ | जलं वर्षन्ति । |
| ३ | ऋषि | ३ | भूमिं कृषति । |
| ४ | कृपय | ४ | प्रजा रक्षन्ति । |
| ५ | कृषीवल | ५ | ईश्वरं ध्यायन्ति । |
| ६ | नृपा | ६ | काव्यं रचयति । |
| ७ | मालाकार | ७ | शत्रुं जयति । |
| ८ | वीर | ८ | वृक्षान् सिञ्चति । |
| ९ | पथिक | ९ | शीघ्रं धावन्ति । |
| १० | मेघा | १० | जलं पिबति । |
| ११ | आरोग्य | ११ | सज्जनान् निन्दति । |
| १२ | खला | १२ | रात्रौ प्रकाशन्ते । |
| १३ | तारका | १३ | प्रातःकाले अध्ययनम् आरभते । |
| १४ | नर | १४ | व्यायामेन वर्धते । |
| १५ | बाल | १५ | धनलाभेन मोदते । |

## अभ्यास ५

पुढील वाक्यातील रिकाम्या जागी कंसात दिलेल्या शब्दांपैकी योग्य तो शब्द योजा —

१ कृषीवला ——— भूमिं कृषन्ति । ( हलेन, खड्गेन, खनित्रेण )
२ बाल मुखं क्षालयति ——— । ( जलेन, दुग्धेन, रसेन )
३ वीर अरिणा सह युध्यते ——— । ( गृहे, उद्याने, रणे )
४ नद्य ——— उद्भवन्ति । ( सागरेभ्य , मेघेभ्य , गिरिभ्य )
५ नदीना जलं ——— शुष्यति । ( वर्षासु, हेमन्ते, निदाघे )
६ कर्ण मुख्यत प्रसिद्ध ——— । ( शौर्येण, औदार्येण, धैर्येण )
७ पुष्पाणि ——— अलङ्कुर्वन्ति । ( वृक्षान्, तडागान् , पर्वतान् )

८ नरः लज्जास्पदं ———— भवति । ( अविनयेन, दारिद्र्येण, मौर्ख्येण )

९ मयूरः ———— वाहनम् । ( गजाननस्य, सरस्वत्याः, शंकरस्य )

१० विश्वस्य निर्माता ———— । ( दशाननः, चतुराननः, षडाननः )

---

# पाठ ५.

## कारकविचार—प्रथमा.

**युद्धे शत्रोः वधाय वीरः धनुषः बाणान् करेण क्षिपति ।**

'युद्धात शत्रूला मारण्याकरिता वीर धनुष्यापासून हाताने बाण फेकतो' या वाक्यातील '**शत्रोः**' या शब्दाशिवाय इतर सर्व शब्द '**क्षिपति**' या क्रियापदाशी निरनिराळ्या प्रकाराने संबद्ध झालेले आहेत. जसे '**वीरः**' हा प्रथमान्त शब्द कर्तृसंबंध, '**बाणान्**' हा द्वितीयान्त शब्द कर्मसंबंध, '**करेण**' हा तृतीयान्त शब्द साधनसंबंध, '**वधाय**' हा चतुर्थ्यन्त शब्द प्रयोजनसंबंध, '**धनुषः**' हा पञ्चम्यन्त शब्द अपादान अथवा दूर होणें असा अर्थ दर्शविणारा संबंध व '**युद्धे**' हा कालवाचक अथवा स्थलवाचक अधिकरणसंबंध दर्शवितो. अशा तऱ्हेचा नाम व क्रियापद यामधील निरनिराळ्या विभक्तींनी दर्शविला जाणारा संबंध कारकसंबंध असा संबोधिला जातो व त्या विभक्तींना कारकविभक्ति असे म्हणतात.

'**शत्रोः**' या षष्ठ्यन्त शब्दाचा संबंध '**क्षिपति**' या क्रियापदाशी नसून '**वधाय**' हा दुसऱ्या नामाशीच आहे. म्हणून षष्ठी विभक्तीस कारकविभक्ति म्हणत नाहीत, व षष्ठी विभक्तीच्या नामानामामधील अथवा सर्वनाम–नामांमधील संबंधाला कारकसंबंध असे म्हणत नाहीत.

### प्रथमा—स्वतन्त्रः कर्ता

१ **रामः गच्छति । देवदत्तः पचति । स्थाली पचति ।**

या तीन वाक्यांमध्ये **रामः, देवदत्तः,** व **स्थाली** हे प्रथमान्त शब्द

कर्तृपदें दर्शवितात, कारण वरील वाक्यामध्यें हे शब्द स्वतंत्र, मुख्य व निरपेक्ष असे क्रियेचे उत्पादक आहेत. 'देवदत्तः पचति' यामध्यें शिजविणाऱ्याला महत्त्व आहे, परंतु 'स्थाली पचति' यामध्यें स्थालीला शिजण्याच्या क्रियेमध्यें महत्त्व आहे हें दर्शविलेलें आहे.

२ अहम् अत्र गङ्गातीरे तिष्ठामि ।
पक्षिशावकाः अत्र निवसन्ति ।
बालकौ कन्दुकेन क्रीडतः ।
वयं सर्वे सुखेन कालं नयामः ।
त्वं देवं न नमसि ।

वरील वाक्यामध्यें कर्तृपदाचा जो पुरुष व जें वचन आहे तो पुरुष व तें वचन क्रियापदाचेंही आहे. जसें—

अहम्—प्र. पुरुष ए. वचन—तिष्ठामि—प्र. पु. ए. व.
बालकौ—ए पुरुष द्विवचन —क्रीडतः—तृ. पु. द्वि. व.

यावरून असें म्हणता येईल की कर्तृपद व क्रियापद यामध्यें पुरुष व वचन यांचें साम्य पाहिजे.

३ युधिष्ठिरः सर्वेषां पाण्डवानां सर्वेषु पाण्डवेषु वा ज्येष्ठः भवति ।
ध्रुवः नारायणस्य भक्तः (अस्ति) ।
पाण्डवाः कौरवाणां शत्रवः (भवन्ति) ।
पाठशाला रमणीया अस्ति ।
प्रजाः रामस्य जीवितम् (सन्ति) ।
अर्जुनः कृष्णस्य मित्रम् (भवति) ।

वरील वाक्यांत अस् किंवा भू हें क्रियापद योजलेलें अथवा गुप्त आहे त्याचा अर्थ पूर्ण करण्यासरिता भक्तः, शत्रवः, जीवितम् व मित्रम् ही नामें व ज्येष्ठः व रमणीया हीं विशेषणें योजलेलीं आहेत. त्यापैकीं विशेषणाचा उपमेय कर्तृपदांतील नामाच्या लिंग, वचन व विभक्ति याप्रमाणें

केलेला आहे व नामाचा उपयोग कर्तृपदाप्रमाणें फक्त विभक्तींत केलेला आहे नामाचें मूळ लिंग कायम राहिलें आहे व वचन अर्थानुसार झालेलें आहे. क्रियापदाचें रूप मूळ कर्त्याला अनुसरून झालें आहे

४ सज्जना. आदरस्य आस्पदम् अथवा पदम् भवन्ति ।
अस्मिन् विषये वयं प्रमाणं स्म. ।
नृपा. पूजास्थानं भवन्ति ।
ईश्वरः भक्तेः भाजनं भवति ।
युवाम् उभौ कल्याणस्य भाजनं भवथः ।
पुत्रस्य पितृचरणाः एव प्रमाणं भवन्ति ।

वरील वाक्यांत अस् अथवा भू हें अपूर्णार्थक क्रियापद योजलेलें आहे. म्हणून त्याचा अर्थ पूर्ण करण्यासाठीं आस्पद, पद, प्रमाण, स्थान व भाजन असे नपुंसकलिंगी शब्द योजलेले आहेत व ते एकवचनांत योजलेले आहेत त्यांचीं रूपें कर्तृपदाच्या लिंगावर अथवा वचनावर अवलंबून न राहतां क्रियापदाचें रूप मात्र मुख्य कर्त्याप्रमाणें झालेलें आहे

५ (अ) राम. त्वं वय च सर्वे उद्यानं गच्छाम. ।
(आ) सर्वे नागरिकाः अहं च अद्य शंकरं पूजयाम. ।
(इ) युवाम् उभौ एते बाला. च अधुना क्रीडथ ।
(ई) राम. गोविन्द. सर्वे जना. च उद्यानं गच्छन्ति ।

वरील ‘अ’ व ‘आ’ या वाक्यामध्ये ‘च’ नें जोडलेल्या कर्तृपदामध्यें प्रथम-पुरुषी कर्तृपद असल्यामुळें क्रियापदाचें रूप प्रथमपुरुषी झालें आहे, व सब कर्तृपदें मिळून बहुवचनी अर्थ होत असल्यामुळें क्रियापदाचें रूप बहुवचनी झालें आहे.

‘इ’ मध्यें प्रथमपुरुषी कर्तृपद नसल्यामुळें व द्वितीयपुरुषवाचक असल्यामुळें क्रियापदाचें रूप द्वितीयपुरुषी बहुवचनी झालें आहे

‘ई’ मध्यें केवळ तृतीयपुरुषी कर्तृपदें असल्यामुळें क्रियापदाचें रूप तृतीय पुरुषी बहुवचनी झालें आहे

यावरून असें म्हणतां येईल कीं ‘च’ नें जोडलेल्या कर्तृपदामध्यें जर

प्रथमपुरुषी सर्वनाम असेल तर क्रियापदाचें रूप प्रथमपुरुषी, प्रथमपुरुषवाचक सर्वनाम नसेल व द्वितीयपुरुषवाचक असेल तर द्वितीयपुरुषी, आणि प्रथम व द्वितीयपुरुषवाचक कर्तृपदांचे अभावीं तृतीयपुरुषी केलें पाहिजे; व वचन सर्व कर्तृपदाचें मिळून जें होत असेल तें झालें पाहिजे.

६ रामः वा गोविन्दः वा अहं वा अधुना गच्छामि।
वयं यूयं वा समास्थानं गच्छथ।
वयं त्वम् पतौ बालौ वा ईश्वरं पूजयतः।

वरील वाक्यांमध्यें कर्तृपदें 'वा' या अव्ययानें संबद्ध झालेलीं आहेत व क्रियापदें जवळच्या कर्तृपदाप्रमाणें पुरुष व वचन यांमध्यें योजलेलीं आहेत. जसें, गच्छामि हें अहम् या जवळच्या कर्तृपदाप्रमाणें, गच्छथ हें यूयम् प्रमाणें व पूजयतः हें बालौ या कर्तृपदाप्रमाणें झालें आहे.

टीपः—'च' म्हणजे 'आणि' व 'वा' म्हणजे 'अथवा' या उभयान्वयी अव्ययाचा उपयोग प्रत्येक संबद्ध शब्दानंतर करतात किंवा फक्त शेवटीं करतात. मराठीप्रमाणें फक्त संबद्ध शब्दांमध्येंच करून चालत नाहीं तर शेवटीं सुद्धा करावा लागतो. जसें—

रामः च गोविन्दः च कृष्णः च। किंवा रामः गोविन्दः कृष्णः च।
रामः अध्ययनं करोति च क्रीडति च। किंवा रामः अध्ययनं करोति क्रीडति च। तसेंच,
रामः वा गोविन्दः वा कृष्णः वा। किंवा रामः गोविन्दः कृष्णः वा।
रामः पाठं वाचयति वा क्रीडति वा। किंवा रामः पाठं वाचयति क्रीडति वा।

बालः नदीं गच्छति च स्नानं करोति च।
बालः नदीं गच्छति स्नानं करोति च। किंवा स्नानं च करोति।
बालः प्रतिदिनम् उद्यानं गच्छति वा क्रीडाङ्गणे क्रीडति वा।
बालः प्रतिदिनम् उद्यानं गच्छति क्रीडाङ्गणे क्रीडति वा। किंवा
बालः प्रतिदिनम् उद्यानं गच्छति क्रीडाङ्गणे वा क्रीडति।

वरील वाक्यावरून असें दिसून येईल कीं, 'च' नें अथवा 'वा' नें संबद्ध असलेल्या दोन अथवा अधिक वाक्यांत प्रत्येक वाक्यानंतर, फक्त शेवटीं किंवा शेवटच्या वाक्यांत पहिल्या शब्दानंतर केंव्हां 'च' चा किंवा 'वा' चा उपयोग करता येतो.

## अभ्यास १

पुढील वाक्यांत रिकाम्या जागीं योग्य शब्द योजा:—

१ सज्जनाः आदरस्य ———— भवन्ति।

२ धर्मराज वदति हे नकुल तथा च सहदेव समराङ्गण ——— इति ।
३ गोपाल अह युवाम् उभौ च ———— ।
४ मित्रे स्नेहस्य पात्रं ————
५ अर्जुन श्रीकृष्णस्य प्राणा ——— ।
६ जनकस्य ———— पुत्राणा प्रमाण भवन्ति ।
७ सर्वा लता कुसुमै ———— भवन्ति ।
८ राम युवाम् अह वा एतद् कार्यं — — ।
९ वय त्व ——— वा सभा गच्छत ।
१० गुणा पूजास्थान — न च वय ——— ।

## अभ्यास २

पुढील वाक्यातील अथवा श्लोकातील कर्तृपद व क्रियापद यामधील सबध स्पष्ट करा व अर्थ सागा —

१ सन्ति इह गिरिदुर्गाणि निर्झरा कन्दराणि च ।
२ बुद्धिसम्पन्ना महात्मान सङ्कटेषु न विकम्पन्ते ।
३ पश्यामि देवान् तव देव देहे ।
४ त्व विश्वस्य पर निधानम् ।
५ विशन्ति नाशाय ज्वलन पतङ्गा ।
६ आर्य भीमसेन गच्छाम गुरुजनेन अनुज्ञाता अह भ्रातर च युद्धाय ।
७ सत्य शौर्यं दया त्यागो नृपस्यैते महागुणा ।
८ खल करोति दुर्वृत्त वद् हि फलति साधुषु ।
९ अप्रियस्यापि पथ्यस्य परिणाम सुखावह ।
१० द्वे वा द्वादश वर्षाणि वय वा द्यूतनिर्जिता ।
प्रविशेम महारण्यमजिनै परिवासिना ॥

### टीपा

१ गिरिदुर्गाणि-पर्वतावरील किल्ले (गिरि+दुर्ग)
१० प्रविशेम-(प्र+वि [ धातूचें विध्यर्थी प्र पु ब व.)
आम्ही प्रवेश क रू

## अभ्यास २

पुढील वाक्यांत रिकाम्या जागीं योग्य ते शब्द योजा —

१ त्वं राम च फलानि ——— ——(भक्ष्)।

२ अहम् एते बाला च चित्राणि ———(दृश्)।

३ राम यूयम् ——— च मित्र स्थान ।

४ अह राम वा श्लोक — —(पठ्)।

५ ते ——— वा ईश्वर पूजयाव ।

६ गुरु शिष्या च उद्यान ——— (गम्)।

७ वयं वा बान्धवा वा यूय वा नृप ——— (वर्ण्)।

८ राम गोपाल तस्य मित्राणि च उपदेश ——— (स्मृ)।

९ मालाकार तस्य पुत्र वा वृक्षान् ———(सिच्)।

१० राम सीता च वने ———(वस्)।

---

## पाठ ६.

### द्वितीया—कर्म.

१ रामः वृक्षान् पश्यति।
बालः हस्तौ क्षालयति।
वानराः फलानि भक्षयन्ति।

वरील वाक्यांतील 'पश्यति, क्षालयति व भक्षयन्ति' ही क्रियापदें सकर्मक आहेत व 'वृक्षान्, हस्तौ व फलानि' हे द्वितीयान्त शब्द कर्मपदें आहेत. म्हणून सकर्मक क्रियापदांचा उपयोग करताना कर्मवाचक शब्द द्वितीयेंत योजावा.

२ आचार्यः छात्रान् प्रश्नं पृच्छति।
दरिद्रः धनिकं द्रव्यं याचते भिक्षते वा।

गोपालः धेनुं दुग्धं दोग्धि।
गोपो दधि नवनीतं मथ्नाति।
गुरवः शिष्यान् धर्मं ब्रुवन्ति–भाषन्ते–शासति वा।
भृत्यः भारं गृहं नयति–वहति वा।

वरील वाक्यामध्यें क्रियापदं सकर्मक असून दोन दोन शब्द द्वितीयेंत आलेले आहेत ते दोन्ही शब्द कर्मपदें आहेत त्यांतील '**छात्रान्, धनिकम्, धेनुम्, दधि, शिष्यान् व गृहम्**' हे शब्द द्वितीयेशिवाय अन्य विभक्तींत योजता येतील जसे, **छात्रान्, शिष्यान्** हे शब्द चतुर्थींत व धनिकं, दधि हे शब्द पचमीत योजतां येतील. म्हणून या कर्मपदाला '**गौण कर्मपदें**' म्हणतात. परंतु '**प्रश्नम्, द्रव्यम्, दुग्धम्, नवनीतम्, धर्मम् व भारम्**' हे शब्द मात्र नेहमीं द्वितीयेंतच योजले पाहिजेत म्हणून त्यांना '**मुख्य कर्मपदें**' असें म्हणतात. यावरून हें दिसून येईल कीं संस्कृतमध्यें **प्रच्छ्, याच्, दुह्, मन्थ्, ब्रू, नी व वह्** या क्रियापदांना दोन कर्मपदं असू शकतात व त्याचप्रमाणें या क्रियापदांशीं समानार्थक क्रियापदें सुद्धा द्विकर्मक पद्धतीनें उपयोगात आणता येतात

टीप —दुह् याच् पच् दण्ड् रुधि प्रच्छि चि ब्रू शासु जि मन्थ् मुषाम्।
कर्मयुक् स्यादकथितं तथा स्यान्नीहृकृष्वहाम्॥

या कारिकेतील पच्, दण्ड्, रुध्, जि, चि, मुष्, कृष् व हृ हीं संस्कृत भाषेमध्यें द्विकर्मक रीतीनें क्वचितच उपयोगात येतात

३ दुर्योधनः द्रोणं सेनापतिं करोति नियोजति वा।
नराः सिंहं मृगाधिपं मन्यन्ते।
जनाः रामम् ईश्वरं गणयन्ति।

वरील वाक्यांत **द्रोणम्, सिंहम्** व **रामम्** हीं कर्मपदें आहेत व **करोति, मन्यन्ते** व **गणयन्ति** हीं क्रियापदें आहेत. परंतु या वाक्याचा अर्थ पूर्ण करण्याकरितां मूळ कर्मपदाचा अर्थ निश्चित करणाऱ्या दुसऱ्या द्वितीयान्त शब्दाची गरज लागते जसें—**सेनापतिम्, मृगाधिपम्, ईश्वरम्**

म्हणून 'करणें, नेमणें, मानणें व निवडणें' इत्यादि क्रियापदांचे कर्मवाचक शब्द व त्याचप्रमाणें वाक्याचा अर्थ पूर्ण करणारे शब्द हे दोन्ही द्वितीयेंत योजावे लागतात.

४ बालः जननीम् अनुसरति-अनुगच्छति वा।
व्याघ्रः धेनुम् अभिधावति-गच्छति-द्रवति वा।
योधः अश्वम् आरोहति।
खगः आकाशम् उत्पतति।

वरील वाक्यांतील सृ, गम्, धाव्, द्रु, रुह् व पत् हीं क्रियापदें अकर्मक आहेत, परंतु त्यांना अनु, अभि, आ, उद् हे उपसर्ग जोडल्यामुळें त्यांचा सकर्मक रीतीनें उपयोग करण्यांत आला आहे.

संस्कृतमध्ये उपसर्ग जोडल्यानें अकर्मक क्रियापदें सकर्मक होऊं शकतात.

५ रामः ग्रामं ग्रामाय वा गच्छति।
पान्थः देशं भ्रमति।
चित्तेन हरिं व्रजति भक्तः।
बालः हर्म्यं गच्छति।

वरील क्रियापदें गत्यर्थक आहेत, म्हणून ज्या ठिकाणाप्रत अथवा भावनेप्रत गतीचा रोख असतो त्या स्थलवाचक अथवा भावनावाचक शब्दाची द्वितीया विभक्ति योजतात. स्थलवाचक शब्दाची कधी कधी 'गम्' या क्रियापदाचा प्रत्यक्ष गतिदर्शक अर्थानें उपयोग केला असता चतुर्थीही योजतात.

६ वने वसन्ति निवसन्ति वा मुनयः।
परंतु वनम् अधि-उप-अनु-आ-वसन्ति मुनयः।
बालः भूमौ तिष्ठति। परंतु बालः भूमिम् अधितिष्ठति।
नृपः सिंहासने आस्ते। परंतु नृपः सिंहासनम् अध्यास्ते।
यतिः पर्णशय्यायां शेते। परंतु यतिः पर्णशय्याम् अधिशेते।

वस् अथवा निवस् या क्रियापदाचा उपयोग सप्तम्यंत नामाबरोबर करतात,

परंतु **वस्** या क्रियापदाला अधि, उप, अनु व आ हे उपसर्ग जोडले म्हणजे स्थलवाचक शब्दाचा द्वितीया योजतात

तसेंच **स्था** (प ग प प) आस् व शी (द्वि ग आ प) या क्रियापदांना अधि हा उपसर्ग जोडला म्हणजे स्थलवाचक शब्दाला द्वितीया विभक्ति योजतात

७ सः बालः दश दिनानि पाठशालां न आगच्छति।
मुहूर्तं त्वं तत्र तिष्ठ इति रामः भृत्यं कथयति।
पान्थः प्रतिदिनं क्रोशं गच्छति।

वरील वाक्यांत **दिनानि** व **मुहूर्तं** हे कालवाचक शब्द व **क्रोशं** हा स्थलवाचक शब्द द्वितीयेंत योजलेले आहेत कारण '**अमुक कालपर्यंत**' अथवा '**अमुक अंतरपर्यंत**' हा अर्थ कालार्थी अथवा स्थलार्थी द्वितीयेनें दर्शविला जातो

## अभ्यास १

पुढील वाक्यांचा अर्थ सांगून त्यांतील द्वितीयान्त पदांचें प्रयोजन सांगा —

१ पान्थाः नगरात् नगरम् अटन्ति भ्रमन्ति वा।
२ युद्धे सेनापतिम् अनुसरन्ति सैनिकाः।
३ सः नरः बहून् क्रोशान् प्रतिदिनं चरितुं समर्थः।
४ छात्राः पाठशालायां सप्त वर्षाणि आङ्ग्लभाषां पठन्ति।
५ युद्धे वीराः रथान् अश्वान् गजान् वा आरोहन्ति।
६ राजपुरुषाः चोरम् अनुधावन्ति।
७ नगरस्य आदेशेन सः बालः नित्यं अश्वान् जलभक्षणाय क्षेत्रं नयति।
८ अस्माकम् अपि ग्रामाणां प्रसूतिम् वर्षाः त्यजन्ति इति रामस्य वचनम्।
९ सः अभिमानेन गृहं प्रवीणतां गच्छति।
१० लोके गुरुत्वं विपरीतता (लघुत्वं) वा स्वचरितैरेव नरं नयन्ति।

## अभ्यास २

पुढील वाक्यांत रिकाम्या जागी योग्य ते शब्द योजा —

१ द्रोणेन नकुलम् दुर्योधनं त ——— ——— अवदत्।

२ गोपाला: प्रभाते धेनू: ——— दुहन्ति।
३ महाबाहु: अर्जुन: ——— अन्वपतन्।
४ लक्ष्मणेन विरचितम् उटजं राम: ——— ।
५ अहं चतुर्दश ——— वने वसामि इति राम: अवदत्।
६ पुत्रस्य मृत्युना धनञ्जय: ——— अगच्छत्।
७ विश्वामित्र: मखस्य रक्षणाय ——— रामलक्ष्मणौ अयाचत
८ महेन्द्रस्य चापासन पुरस्य ——— ।
९ जना: ग्रामान्तरे श्रेष्ठस्य आचरणम् ।
१० राम: दूरदेशात् आगत मित्र कुशल ——— ।

---

# पाठ ७.

## तृतीया—कर्ता व करण.

१. रामेण अध्ययनं कृतम्—अक्रियत वा।
भीष्मेण प्रतिज्ञा पालिता—अपाल्यत वा।
कृष्णेन उद्यानं दृष्टम्—अदृश्यत वा।

वरील वाक्यांत रामेण, भीष्मेण व कृष्णेन ही तृतीयान्त पदें क्रिया कोणी केली हें दर्शवितात. परंतु वाक्यांतील मुख्य शब्द क्रिया कोणी केली हें दर्शविणारा नसून काय क्रिया केली गेली हें दर्शविणारा शब्द म्हणजे क्रियेचें कर्म आहे. म्हणून ही कर्मणि प्रयोगाची रचना आहे. कर्मणि प्रयोगांत कर्तरि-प्रयोगांतील प्रथमान्त स्वतंत्र कर्ता तृतीयेंत योजतात.

२. बाल: नयनाभ्यां पश्यति।
राम: शत्रुं बाणै: मारयति।
भक्त: स्तुतिभि: ईश्वरं भजति।

वरील वाक्यांतील तृतीयान्त पदें क्रियेचें साधन अथवा करण दर्शवितात म्हणून साधनवाचक शब्दाची तृतीया योजतात.

३ वायसस्य स्वरः प्रकृत्या कर्कशः ।

कृष्णेन साहस्रेण राक्षसाः हताः ।

द्विद्रोणेन धान्यं क्रीणाति रामः ।

वरील वाक्यातील तृतीयान्त पदें क्रिया करण्याची तऱ्हा दर्शवितात

४ (अ) रूप्यद्वयेन इदं पुस्तकं क्रीतम् ।

(आ) पथिकः शकटेन ग्रामान्तरं गच्छति नौकया च प्रत्यागच्छति ।

(इ) भृत्यः भारं शीर्षेण नयति वहति वा ।

(ई) पूर्वया दिशा नृपः गतः । अनेन मार्गेण चोरः पलायितः ।

वरील 'अ' या वाक्यामध्यें किंमतवाचक शब्द, 'आ' मध्यें वाहन वाचक शब्द, 'इ' मध्यें ज्या अवयवाचा उपयोग करून नेण्याचा अथवा उचलण्याचा क्रिया केली जाते तो शब्द, व 'ई' मध्यें ज्या दिशेनें अथवा मार्गानें जाण्याची क्रिया घडते तो शब्द हे तृतीयेंत योजलेले आहेत

५ (अ) अभिमन्युः शौर्ये अर्जुनेन तुल्यः-समः-सदृशः वा ।

कर्णेन तुल्यः समः वा दाता न वर्तते ।

(आ) रामस्य सीतया वियोगः जातः ।

बालेन विप्रयोगः जनन्याः असह्यः ।

'अ' मध्यें ज्याच्याशी तुलना करणें असेल त्याचा व 'आ' मध्यें ज्याच्यापासून वियोग होतो त्याची तृतीया विभक्ति योजलेली आहे

६ बालः अविनयेन लज्जते ।

पुत्रस्य पराक्रमेण जनकः तुष्यति विस्मयते वा ।

वरील वाक्यांमध्यें ज्याची लाज वाटते व ज्याबद्दल संतोष अथवा विस्मय वाटतो त्याला तृतीया योजलेली आहे

७ पादेन खञ्जः । कर्णेन बधिरः । नयनेन काणः ।

शरीराच्या अवयवाचा दोष दाखविणारा शब्द त्या अवयववाचक शब्दाचे तृतीयान्त रूपाबरोबर योजतात.

८ अन्धस्य दीपेन न किमपि प्रयोजनम् ।
अलसस्य उद्योगेन किम्, किं कार्यम्, कः उपयोगः, कः गुणः, कः अर्थः वा ।

वरील वाक्यामध्ये उपयोग करणारा अथवा ज्याला उपयोग होतो तो अशा अर्थाचे शब्द षष्ठीत योजलेले आहेत. जसे—**अन्धस्य, अलसस्य**; व ज्या गोष्टीचा अथवा वस्तूचा उपयोग करावयाचा त्याची तृतीया योजलेली आहे. जसे—**दीपेन, उद्योगेन.**

## अभ्यास १

पुढील वाक्यांचा अथवा श्लोकांचा अर्थ करून तृतीयेचे विशिष्ट उपयोग स्पष्ट करा.—

१ यथा एकेन चक्रेण रथस्य गतिः न भवति तथा पौरुषेण विना दैवं न सिध्यति ।
२ नरेण देहः पुण्यरूपेण मूल्येन क्रीतः भवति ।
३ विद्यया अलङ्कृतः अपि दुर्जनः मणिना भूषितः सर्पः इव त्यागम् अर्हति ।
४ पुरुषः चतुर्भिः परीक्ष्यते श्रुतेन, शीलेन, कुलेन, कर्मणा च ।
५ उद्यमशीलानां नराणां दैवज्ञानेन न प्रयोजनम् ।
६ पुण्यैरेव हि लभ्यते सुकृतिभिः सत्संगतिर्दुर्लभा ।
७ को न याति वशं लोके मुखे पिण्डेन पूरितः ।
मृदङ्गो मुखलेपेन करोति मधुरध्वनिम् ॥
८ कोऽर्थः पुत्रेण जातेन यो न विद्वान् न भक्तिमान् ।
९ तपसा मनसा वाग्भिः पूजिता बलिकर्मभिः[१] ।
तुष्यन्ति शमिना नित्यं देवताः किं विचारितैः ॥
१० न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।
एवंरूपः शक्य अहं (शक्योऽहं) नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥

### टीपा

१ बलिकर्म—बळी देण्याचे कृत्य.

१० श्रीकृष्णानी अर्जुनाला उद्देशून म्हटलेला श्लोक
वेदयज्ञाध्ययनैः—वेदपठन, यज्ञक्रिया व शास्त्राध्ययन
नृलोके —मर्त्यलोक-मनुष्यलोक

## अभ्यास २

पुढील वाक्यामध्ये रिकाम्या जागी शेवटी कंसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्दाचें योग्य तें रूप घाला —

१ ब्राह्मण यज्ञार्थं ग्रामान्तरं छागं ——— अवहत्।
२ ——— बधिर नर अन्यैः सह उच्चस्वरेण भाषते।
३ धनिक हर्म्यं ——— क्रीतवान्।
४ ——— एतादृशेन ऐश्वर्येण न किमपि प्रयोजनम्।
५ ——— पीडिता देवा विष्णुम् उपागच्छन्।
६ ——— सदृशम् अन्यत् किं न विद्यते।
७ दुर्योधनस्य ऊरुद्वयं ——— सञ्चूर्णितम्।
८ कुबेरस्य शापात् यक्षस्य ——— वियोग जात।
९ कन्ययो गाने ——— सर्वे जना प्रीता।
१० जना ——— ——— आश्रमभूमिं गच्छन्ति।

(अभिनेता, गदा, रावण, रत्नसहस्र, कन्या, मुनि, धर्म, भार्या, भीम, प्राधान्य, रथ)

---

# पाठ ८.

## चतुर्थी—संप्रदान.

१ जनक पुत्राय पुस्तकं यच्छति।
मेघ जनेभ्य जलं यच्छति।
आचार्येण शिष्याय पारितोषिकं दीयते।

धेनुः गोपालाय दुग्धं वितरति ।
भक्तः ईश्वराय पुष्पाणि अर्पयति ।

वरील वाक्यांमध्ये देणें या अर्थाच्या क्रियापदांचा उपयोग केलेला आहे, व ज्याला द्यावयाचें त्याची चतुर्थी विभक्ति योजिली आहे. याला**च** संप्रदान म्हणतात.

२ बालः क्रीडार्थं समुद्रस्य तीरं गच्छति ।
अर्जुनः युद्धाय सज्जः भवति ।
देवाः गङ्गां शिवाय प्रार्थयन्त ।

वरील वाक्यांत क्रियेनें जें प्रयोजन आहे अथवा ज्याच्यासाठी क्रिया केली जाते, त्या अर्थाचा शब्द चतुर्थीत योजलेला आहे.

३ वानरेभ्यः फलानि रोचन्ते ।
ईश्वराय पूजा रोचते ।
बालकेभ्यः मोदकः स्वदते ।

वरील वाक्यांत, 'रुच्-आवडणें' ह्या अर्थाचीं क्रियापदें आहेत. ज्याला काही आवडतें त्याची चतुर्थी विभक्ति योजलेली आहे; असें-**वानरेभ्यः, ईश्वराय, बालकेभ्यः** । व जी वस्तु आवडते त्या अर्थाचा शब्द प्रथमेंत योजलेला आहे. असें-**फलानि, पूजा, मोदकः** । क्रियापदाचें रूप प्रथमान्त शब्दाला अनुरूप असें झालेलें आहे.

वरील संस्कृत वाक्यरचनेंत व त्याच अर्थाच्या मराठी वाक्यरचनेंत साम्य आहे. जसें—बालकेभ्यः मोदकः स्वदते । मुलांना खाऊ आवडतो.

४ जनकः बालकाय कुप्यति ।
मूर्खाः मित्राय अपि कुप्यन्ति ।
दुर्योधनः पाण्डवेभ्यः अद्रुह्यत् ।

क्रुध्-कुप्-रागावणें व द्रुह्-द्रोह करणें या अर्थाने धातूंचा उपयोग करताना ज्याच्यावर रागावयाचें अथवा ज्याचा द्रोह करावयाचा त्याची चतुर्थी योजली पाहिजे.

५ रामः गोविन्दाय शतं रूपकान् धारयति ।
नरः पितृभ्यः, देवेभ्यः, ऋषिभ्यः, भूतेभ्यः च ऋणं धारयति ।
शकुन्तला सखीभ्यां द्वे वृक्षसेचने अधारयत् ।

धृ-देणें असणें, ऋणी असणें या क्रियापदाचा उपयोग करताना ज्याचें देणें अथवा ऋण असेल त्याला चतुर्थी विभक्ति योजतात

६ बालः मोदकाय स्पृहयति ।
नृपः विजयाय स्पृहयति ।

स्पृह्-इच्छा करणें या क्रियापदाचा उपयोग करताना ज्या वस्तूची इच्छा करावयाची त्याला चतुर्थी योजतात

परंतु इष् (६ गण प. प)-इच्छ्-इच्छा करणें याचा उपयोग करताना द्वितीयाच योजतात जसे-नृपः विजयम् इच्छति ।

७ रामः जनकं जनकाय वा प्रणिपतति, प्रणमति, नमस्करोति वा ।
शिष्याः आचार्यं आचार्याय वा प्रणमन्ति नमस्कुर्वन्ति वा ।

प्र+नि+पत्, प्र+नम्, नमस्+कृ-नमस्कार करणे-पाया पडणें. याचा उपयोग करताना ज्याला नमस्कार करावयाचा त्याची द्वितीया किंवा चतुर्थी योजता येते परंतु द्वितीया योजण्याचा विशेष प्रघात आहे.

८ दूतः विजयस्य वार्तां नृपाय कथयति निवेदयति शंसति वा ।
गुरुः छात्रेभ्यः धर्मम् आख्याति-व्याचष्टे वा ।

कथ्, नि+विद् (प्रयोजक), शंस्, ख्या व चक्ष् म्हणजे सांगणें या क्रियापदाचा उपयोग करताना ज्याला सांगावयाचें त्याची चतुर्थी योजतात,

रामः मित्रं वार्तां कथयति अथवा मित्रस्य वार्तां कथयति ।

कथ् याचा उपयोग ज्याला सांगावयाचें त्याची द्वितीया किंवा षष्ठी योजूनही करतात.

## अभ्यास १

पुढील वाक्याचा अथवा श्लोकाचा अर्थ करून चतुर्थीचा विशिष्ट उपयोग स्पष्ट करा —

१ शिष्याणां विनोदाय गुरुः विचित्राः कथाः कथयति ।
२ तुष्टः दशरथः कैकेय्यै द्वौ वरौ अयच्छत् ।
३ सुग्रीवः सीतामार्गणाय वानरान् व्यसृजत् ।
४ यथा अभिरोचते वयस्याय तथा करोमि इति लवः चन्द्रकेतुम् अवदत् ।
५ रामाय सीतां प्रतियच्छ प्रत्यर्पय वा इति रावणः बिभीषणेन उपदिष्टः ।
६ पितृभ्यः प्रणिपत्य चन्द्रापीडः दिग्विजयाय प्रातिष्ठत ।
७ आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।
८ सर्वो लोकः स्पृहयति सुखप्राप्तये सत्यमेतद् ।
९ प्रायच्छद्भीमसेनाय मयो दिव्यां गदां तदा ।
१० इन्द्रे शस्त्राणि दिव्यानि समस्तानि धनंजय ।
तमेव प्रपद्यस्व स तेऽस्त्राणि प्रयच्छति ॥

### टीपा

३ सीतामार्गणम् — सीतेचा शोध
७ अर्जुनाने श्रीकृष्णाला विश्वरूपदर्शनाच्या वेळी विचारलेला प्रश्न
९ मय — राक्षसांच्या कारागिराचे नाव. यानेच पाण्डवांचे सभागृह बांधले
१० प्रपद्यस्व — शरण जा

## अभ्यास २

पुढील वाक्यातील रिकाम्या जागी खाली दिलेल्या शब्दांतील योग्य ते शब्द योजा —

१ श्वशुरः ——— आशीर्वादं यच्छति ।
२ भक्ताः एकाग्रेण चित्तेन ——— नमन्ति ।
३ नृपाः युद्धे ——— स्पृहयन्ति ।
४ परोपकारः रोचते ——— पुनः च ——— ।

३ लोभात् क्रोधः प्रभवति-जायते वा ।

हिमालयात् गङ्गा उद्भवति-प्रभवति-उत्पद्यते वा ।

प्र+भू, उद्+भू व जन् या धातूंचा उत्पन्न होणें या अर्थी उपयोग करावयाचा असता ज्याच्यापासून उत्पत्ति होते त्याची पंचमी योजतात. जन्, उद्+पद् इत्यादि 'जन्माला येणें' अशा अर्थांच्या क्रियापदांचा उपयोग ज्यापासून उत्पत्ति होते त्या अर्थाच्या शब्दाचा सप्तमी विभक्ति योजूनही करतात, जसें—रामः कौसल्यायां जातः ।

४ उपाध्यायात् रामः शास्त्रं पठति ।

द्रोणात् अर्जुनेन अस्त्रविद्या शिक्षिता ।

ज्याच्यापासून विद्या शिकावयाची त्या अर्थाच्या शब्दाची पंचमी विभक्ति योजतात जसें—उपाध्यायात्, द्रोणात् ।

५ मरणात् भीतिः जनानाम् ।

पापात् भयं सज्जनानाम् ।

भीति, भय अशा अर्थांच्या नामाचा, क्रियापदाचा अथवा धातुसाधिताचा उपयोग करावयाचा असता ज्याची भीति वाटते त्या अर्थांच्या शब्दाची पंचमी विभक्ति योजतात

६ नृपः प्रजाः सङ्कटात् रक्षति ।

ईश्वरः भक्तं नरकात् त्रायते ।

औषधं नरं व्याधेः रक्षति ।

त्रै, रक्ष्, अव्-रक्षण करणें—या अर्थांच्या क्रियापदांचा उपयोग करावयाचा असल्यास ज्याच्यापासून रक्षण करावयाचें त्या अर्थाच्या शब्दाची पंचमी विभक्ति योजतात

७ कृष्णात् अन्यः-परः-इतरः वा पाण्डवानां रक्षणाय न समर्थः ।

अन्य, पर, इतर—म्हणजे दुसरा, निराळा—यांचा उपयोग पंचम्यन्त नामाबरोबर करतात.

५ वीराः रणाङ्गणं ——— गच्छन्ति ।
६ मूढः नरः ——— ——— अपि कुप्यति ।
७ पशवः अपि ——————कृतज्ञतां धारयन्ति ।
८ सामान्यतः जनाः ——— ——— प्रयतन्ते केचित् तु —————— ।
९ नृपः —————— द्रुह्यति न तु —————— ।
१० दूतः —————— नृपस्य आज्ञां निवेदयति ।

( रक्षकेभ्यः, आत्मसुखाय, शत्रुभ्यः, अमात्याय, मित्रेभ्यः, साधुभ्यः, युद्धाय, ईश्वराय, विनयाय, परसुखाय ईश्वरम्, स्वार्थाय, मित्राय )

---

# पाठ ९.

## पंचमी—अपादान.

१ पथिकः ग्रामात् आगच्छति ।
फलं वृक्षात् पतति ।

वरील वाक्यामध्ये ज्याच्यापासून दूर सरणे ही क्रिया दाखविली आहे त्या शब्दाची पंचमी विभक्ति योजलेली आहे. याला अपादान म्हणतात

२ स. चौरः जाड्येन जाड्यात् वा बद्धः ।
किन्तु स. युक्त्या मुक्तः ।
आलस्यात् आलस्येन वा दारिद्र्यं वर्धते ।
उद्योगात् उद्योगेन वा तद् नश्यति ।
नृपः शूरतया शत्रुं जयति ।

वरील वाक्यामध्ये क्रियेचे कारणवाचक शब्द जाड्य, आलस्य व उद्योग हे नपुंसकलिंगी व पुंलिंगी असल्यामुळे तृतीयेत अथवा पंचमीत योजलेले आहेत, परंतु युक्ति, शूरता हे स्त्रीलिंगी शब्द फक्त तृतीयेत योजलेले आहेत

३ लोभात् क्रोधः प्रभवति-जायते वा ।
हिमालयात् गङ्गा उद्भवति-प्रभवति-उत्पद्यते वा ।

प्र+भू, उद्+भू व जन् या धातूंचा उत्पन्न होणें या अर्थी उपयोग करावयाचा असता ज्याच्यापासून उत्पत्ति होते त्याची पंचमी योजतात, जन्, उद्+पद् इत्यादि 'जन्माला येणें' अशा अर्थाच्या क्रियापदाचा उपयोग ज्यापासून उत्पत्ति होते त्या अर्थाच्या शब्दाची सप्तमी विभक्ति योजूनही करतात, जसें—रामः कौसल्यायां जातः ।

४ उपाध्यायात् रामः शास्त्रं पठति ।
द्रोणात् अर्जुनेन अस्त्रविद्या शिक्षिता ।

ज्याच्यापासून विद्या शिकावयाची त्या अर्थाच्या शब्दाची पंचमी विभक्ति योजतात, जसें—उपाध्यायात्, द्रोणात् ।

५ मरणात् भीतिः जनानाम् ।
पापात् भयं सज्जनानाम् ।

भीति, भय अशा अर्थाच्या नामाचा, क्रियापदाचा अथवा धातुसाधिताचा उपयोग करावयाचा असता ज्याची भीति वाटते त्या अर्थाच्या शब्दाची पंचमी विभक्ति योजतात.

६ नृपः प्रजाः सङ्कटात् रक्षति ।
ईश्वरः भक्तं नरकात् त्रायते ।
औषधं नरं व्याधेः रक्षति ।

त्रै, रक्ष्, अव्-रक्षण करणें—या अर्थाच्या क्रियापदाचा उपयोग करावयाचा असल्यास ज्याच्यापासून रक्षण करावयाचें त्या अर्थाच्या शब्दाची पंचमी विभक्ति योजतात.

७ कृष्णात् अन्यः-परः-इतरः वा पाण्डवानां रक्षणाय न समर्थः ।

अन्य, पर, इतर—म्हणजे दुसरा, निराळा—यांचा उपयोग पंचम्यन्त नामाबरोबर करतात.

## अभ्यास १

पुढील वाक्यांचा अथवा श्लोकाचा अर्थ करून पंचम्यन्त शब्दांचें प्रयोजन स्पष्ट करा —

१ स्वर्गात् भ्रष्टा गङ्गा शिवस्य शिरसि महावेगेन पतिता ।
२ अनन्तरं मार्जारभयात् मूषकः बिलात् न निःसरति ।
३ न भीतः मरणात् अस्मि । किन्तु लोकापवादात् मम भयम् ।
४ पतिव्रता स्त्री भर्तुः अन्यं पुरुषं मनसा अपि न कदापि चिन्तयति ।
५ रक्ष मां नरकात् घोरात् इति भक्तः पूजान्ते ईश्वरं प्रार्थयत ।
६ नयात् च्युतः राजा राज्यात् परिहीयते ।
७ विश्वामित्रात् अशिक्षत रामः अस्त्रविद्याम् ।
८ लोभात् क्रोधः प्रभवति लोभात्कामः प्रजायते ।
९ न हि संहरते ज्योत्स्नां चन्द्रश्चाण्डालवेश्मनः ।
१० शिरः शार्वं स्वर्गात् पशुपतिशिरस्तः क्षितिधरम्
महीध्रादुत्तुङ्गादवनिमवनेश्चापि जलधिम् ।
अधोऽधो गङ्गेयं पदमुपगता स्तोकमथवा
विवेकभ्रष्टानां भवति विनिपातः शतमुखः ॥

### टीपा

३ लोकापवाद — लोकनिन्दा ( लोक + अपवाद )
१० विवेकभ्रष्ट — ज्याची विचारशक्ति नष्ट झाली आहे असा
शतमुख विनिपात — शेकडो द्वारांनी अधःपात

## अभ्यास २

पुढील वाक्यांत योग्य ते शब्द रिकाम्या जागी घाला —

१ ———— अन्यः शिवचापस्य भङ्गं कर्तुं न समर्थः ।
२ ———— भीताः मुनयः यज्ञान् न कुर्वन्ति ।
३ जयद्रथं ———— त्रातुं दुर्योधनः ऐच्छत् ।
४ ———— नर्मदा प्रभवति ।

५ गुरुभ्यः छात्राः शास्त्रं ———— ।
६ ———— पतितं तोयं सागरं गच्छति ।
७ ———— भ्रष्टं नृपं लक्ष्मीः त्यजति ।
८ ———— पण्डितस्य कीर्तिः वर्धते ।
९ मृत्योः ———— कातरस्य न तु वीरस्य ।
१० रामः पुष्पकविमानेन ———— अयोध्यां निवृत्तः ।

---

## पाठ १०.

### सप्तमी—अधिकरण.

१ मनुजः गृहे वसति । सिंहः गुहायां वसति ।
रामः भूमौ तिष्ठति । बालः आसने उपविशति ।
सूदः स्थाल्याम् ओदनं पचति ।

वरील सर्व वाक्यांत ज्या ठिकाणी क्रिया घडते त्या स्थलवाचक शब्दाची सप्तमी विभक्ति योजलेली आहे. यालाच अधिकरण म्हणतात.

२ शुभे दिने नरः ग्रामं गच्छति ।
चैत्रमासे वसन्तोत्सवः क्रियते ।
प्रभाते नरः शयनं त्यजति ।

क्रिया घडण्याचे वेळी झाली हें दर्शविणारे कालवाचक शब्द सप्तमींत योजतात.

३ माता पुत्रे स्निह्यति । गुरुः छात्रेषु स्निह्यति ।
मित्रे स्नेहः कर्तव्यः । धने अतिशयितः अभिलाषः अयुक्तः ।
दुष्यन्तस्य शकुन्तलायाम् अनुरागः प्रीतिः वा ।
दीनेषु दयां करोति साधुः ।

स्निह्-प्रेम करणें या क्रियापदाचा त्याचप्रमाणे मनाचा भाव दर्शविणाऱ्या स्नेह, प्रीति, अभिलाष, दया, अनुकम्पा इत्यादि शब्दांचा उपयोग सप्तम्यन्त नामाबरोबर करतात.

४ बालाः मण्डूकेषु उपलान् क्षिपन्ति ।
योधाः शत्रौ बाणान् अस्यन्ति मुञ्चन्ति वा ।

क्षिप्, मुच्, अस् (४ ग प प) या धातूंचा 'फेकणें' या अर्थी उपयोग केला असतां ज्याच्यावर फेकावयाचें त्याची सप्तमी विभक्ति योजतात

५ रामः अस्त्रविद्यायां निपुणः कुशलः प्रवीणः वा ।
बालः वेदपठने प्रवीणः दृश्यते ।

निपुणः, प्रवीणः व इतर समानार्थक शब्दांचा उपयोग करतांना ज्यामध्यें प्रावीण्य दर्शविलें असेल त्याची सप्तमी विभक्ति योजतात

## अभ्यास १

पुढील वाक्यांचा अथवा श्लोकांचा अर्थ करून त्यांतील सप्तमीचे विशिष्ट उपयोग दाखवा —

१ रामायणपठने कुशलौ प्रवीणौ च तौ ।
२ राक्षसानां सैन्ये वानराः शिलाखण्डान् अवपन् ।
३ स्निह्यति खलु मे मनः अस्मिन् बाले इति वदति जनकः रामम् उद्दिश्य ।
४ प्रायः समापन्नविपत्तिकाले धियोऽपि पुंसां मलिनीभवन्ति ।
५ निर्गुणेष्वपि सत्त्वेषु दयां कुर्वन्ति साधवः ।
६ अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा ।
७ अतृणे पतितो वह्निः स्वयमेवोपशाम्यति ।
८ उदये सविता रक्तो रक्तश्चास्तमने तथा ।
सम्पत्तौ च विपत्तौ च महतामेकरूपता ॥
९ पाण्डवेषु दयां नित्यं करोति च पितामहः ।
अशक्तश्च रणे भीष्मो जेतुमेतान्महारथान् ॥
१० सम्प्राप्ते महायुद्धे योधाः शस्त्रास्त्रधारिणः ।
अस्यन्ति शत्रुसेनायां बाणान् प्राणापहारिणः ॥

### टीपा

४ समापन्नविपत्तिकाल — ओढवलेल्या संकटाचा समय
धिय — बुद्धि

९ दुयोधनानें वर्णादि वीराजवळ भीष्माचार्यांबद्दल म्हटलेला श्लोक.
१० समवृत्ते महायुद्धे—मोठें युद्ध चालू झालें असताना.
शस्त्रास्त्रधारिण —शस्त्रें व अस्त्रें धारण करणारे
प्राणापहारिण —प्राण हरण करणारे.

## अभ्यास

पुढील वाक्यांत रिकाम्या जागीं खालीं दिलेल्या शब्दांपैकी योग्य त्या शब्दांचीं रूप योजा —

१ ———— अभिलाष कृपणस्य । ———— तु उदारस्य ।
२ ———— सूर्यस्य आतप असह्य भवति ।
३ ———— तथा च ———— निपुण छात्र प्रिय भवति गुरूणाम् ।
४ दुष्टा बाला प्रक्षिपन्ति उपलान् ———— ।
५ ———— ———— अनुरज्यन्ति प्रजा ।
६ ———— जय न प्राप्यते ।
७ रामस्य जन्मोत्सव ———— क्रियते ।
८ यथा ———— भक्ति छात्रस्य तथा ———— आदर पुत्रस्य ।
९ क्षमा ———— च ———— च यतीनाम् एव भूषणम् ।
१० दैवम् एव कारण मनुष्याणा ———— च ।
(शत्रु, धनसञ्चय, मध्याह्न, विहग, दयाशील, मित्र, गुरु, महाबल, धनदान, नृप, चैत्रमास, पितृ, क्रीडा, वृद्धि, अध्ययन, श्रम)

---

# पाठ ११.

## षष्ठी—संबंध.

१ दशरथस्य पुत्रः रामः ।
श्रीविष्णोः दर्शनं पुण्यम् ।
रघूणां कुले अजः नाम नृपः अभवत् ।

वरील सर्व वाक्यांमध्ये षष्ठ्यन्त पदाचा संबंध नामाकडे आहे, क्रियापदाशीं नाहीं. म्हणून षष्ठीला सामान्यपणे कारकविभक्ति म्हणतां येत नाहीं. षष्ठी दोन नामांमधील अथवा सर्वनाम-नामांमधील संबंध दर्शविते.

२ गङ्गायाः दर्शनं पावनम्।
वारीणां स्पर्शः शीतलः।
विजयस्य घोषः नृपम् आनन्दयति।

वरील वाक्यात 'दर्शनम्' 'स्पर्शः' व 'घोषः' हीं धातुसाधित भाववाचक नामें योजलेलीं आहेत. या धातूंचीं कर्मपदें षष्ठींत योजावीं लागतात.

३ कौरवाणां सेनायाः नेता भीष्मः।
घटानां कर्तारः कुम्भकाराः इति उच्यन्ते।
प्रजानां रक्षितारः नृपाः सन्ति।

वरील वाक्यात धातूपासून 'तृ' प्रत्ययान्त 'क्रिया करणारा', अशा अर्थाचे शब्द योजलेले आहेत, व त्या धातूच्या कर्मपदवाचक शब्दांची षष्ठी विभक्ति योजलेली आहे. जसें—सेनाया, घटानां, प्रजानाम्

४ सेनापतेः प्रणाशात् सैनिकाः अनाथाः अभवन्।
सूर्यस्य प्रकाशः चण्डः।
निर्धनस्य जीवनम् अतिकष्टं भवति।

वरील वाक्यातही धातुसाधित नाम 'प्रणाशः, प्रकाशः, जीवनम्' हीं आहेत. परंतु तीं मूळ क्रियापदें अकर्मक असल्यामुळें त्या क्रियांच्या कर्तृपदांची षष्ठी विभक्ति झाली आहे. जसें—सेनापते, सूर्यस्य, निर्धनस्य

५ सुचरितः पुत्रः पितुः प्रियः भवति।
कायः कस्य न वल्लभः।
भक्त्या प्रीतः अस्मि तें हे वत्स।

वरील वाक्यात 'प्रिय', 'प्रीत' व त्यांच अर्थाचे इतर शब्द यांचा उपयोग करतांना ज्याला किंवा ज्याबद्दल प्रीति वाटते त्या अर्थाच्या शब्दांची षष्ठी विभक्ति योजिली आहे.

६ आज्ञाधारकस्य पुत्रस्य पित्रोः अवज्ञा अनुपपन्ना अयोग्या वा।
एतादृशः पराक्रमः त्वादृशस्य वीरस्य एव युज्यते।

उपपन्न, योग्य, युज्यते, अनुरूप, सदृश वगैरे योग्यतादर्शक शब्दांचा उपयोग षष्ठ्यन्त शब्दाबरोबर करतात

१० को हि शक्तो रणं जेतुं पाण्डवं रक्षसां तदा ।
यस्य गोप्ता जगद्गोप्ता शङ्खचक्रगदाधरः ॥

## टीपा

४ तस्य—अर्जुनस्य
७ दुष्यन्ताला उद्देशून म्हटलेलें वाक्य
८ विदुरानें कौरवांच्या नाशानंतर धृतराष्ट्राला उद्देशून म्हटलेला श्लोक
९ भरतानरूपी धर्मराजा अर्जुनाला उद्देशून म्हटलेला श्लोक
१० भीष्माचार्यांनीं दुर्योधनापाशीं अर्जुनासंबंधी म्हटलेला श्लोक

## अभ्यास २

पुढील वाक्यांत रिकाम्या जागीं योग्य शब्द घाला —

१ —— पुत्रः सौमित्रिः इति उच्यते ।
२ —— प्रमादात् शोकविरहः भवति दैन्यम् ।
३ कृपया —— द्वारं न तु स्तारं ।
४ भूपनय —— ज्ञाने विदुषां तु —— ।
५ ध्रुव —— प्रियः । नारायणः च अचलया —— तुष्टः ।
६ —— चिन्तनेन नरः भवतापं विस्तरति ।
७ ——— अध्ययनं कुर्वन्ति विप्राः ।
८ — आसनेषु बालाः उपविशन्ति पाठशालायाम् ।
९ गोभयुक्तः मत्स्यः —— बडिशं ग्रसते ।
१० ईश्वरस्य —— संकीर्तनेन नरः पुण्यं लभते ।

## अभ्यास ३

पुढील प्रत्येक वाक्यांत रिकाम्या जागीं कंसांत दिलेल्या रूपांपैकीं योग्य तें रूप योजा —

१ मारुतिः द्रोणगिरिं —— अवहत् । (स्कन्धे, स्कन्धेन, स्कन्धात्)
२ पुत्रः मातुः —— अध्यतिष्ठत् । (उत्सङ्गे, उत्सङ्गं, उत्सङ्गस्य)

३ भक्त सुगन्धीनि पुष्पाणि ——— अर्पयति । ( ईश्वराय, ईश्वरे, ईश्वरम् )
४ ——— दया कृत्वा अद्य त मार्गम् अदर्शयम् । (अन्धे, अन्धाय, अन्धस्य)
५ श्वशुर ——— बहुमूल्यानि वस्त्राणि प्रयच्छति । ( स्नुषायै, स्नुषाम्, स्नुषाया )
६ वनवासिना यतीनां ——— न किमपि प्रयोजनम् । ( संसारभावेषु, संसारभावेभ्य, संसारभावे )
७ हिंस्रा पशव ——— अधिवसन्ति । ( गुहासु, गुहा, गुहाभि )
८ निखिलाया पृथिव्या ——— सदृश गिरि न वर्तते । ( हिमालयेन, हिमालयस्य, हिमालय )
९ ——— कृपया क्रुद्धेन दुष्यन्तेन अन्ते स्वदोष ज्ञात । ( शकुन्तलायाम्, शकुन्तलाया, शकुन्तलायै )
१० उद्योगप्रिय नर ——— प्रभवति । ( दैवे, दैवाय, दैवस्य )

---

## पाठ १२.

### क्रियापदें—वर्तमान काळ.

( अ ) रामः चलति । रामः मोदते । वीरः युध्यते । रोगः नश्यति । शत्रुः म्रियते । बाहुः स्फुरति ।

( आ ) जनकं पुत्रः नमति । छात्रः पारितोषिकं लभते । कृपणः धनं लुभ्यति । पुत्रः जनकस्य वचनम् अनुरुध्यते । कुमारः मुखं क्षालयति । भक्तः ईश्वरं प्रार्थयते ।

'अ' मध्यें परस्मैपदी व आत्मनेपदी अशा दोन्ही पदांचीं अकर्मक क्रियापदें आलीं आहेत

'आ' मध्यें परस्मैपदी व आत्मनेपदी सकर्मक क्रियापदें आलीं आहेत क्रियापद सकर्मक आहे कीं अकर्मक आहे हें त्याचे उपयोगावरून समजलें पाहिजे वरील क्रियापदांचीं सर्व रूपं वर्तमान काळाचीं आहेत

## वर्तमान काळ

१ रामः पाठशालां गच्छति। राम शाळेत जातो-जात असतो.
बालाः कन्दुकेन क्रीडन्ति। मुलें चेंडूनें खेळतात खेळत असतात

संस्कृतमध्ये साध्या वर्तमानकाळावरून रीतिवर्तमान काळाचाही बोध होतो. वर्तमानकाळावरून क्रिया चालू आहे, संपली नाही असा अर्थ दर्शविला जातो म्हणून वर्तमानकाळाचा निश्चित बोध, 'अधुना, इदानीम्' इत्यादि क्रियाविशेषणाचे साहाय्याने अथवा संदर्भावरूनच होतो.

२ सत्संगतिः नराणां कल्याणं करोति।
सर्वः आत्मीयं कान्तं पश्यति।
संकटानि भाग्यरहितं जनम् अनुगच्छन्ति।

वरील वाक्यातील वर्तमानकाळाचा अर्थ सर्व वेळी उपयुक्त व खरा ठरणारा आहे म्हणून वर्तमानकाळ सर्व काळी खरी असणारी गोष्ट दर्शविण्याकरिता योजतात.

३ अयम् अहम् आगच्छामि। ( हा मी आलोंच )
अपि त्वम् इदं कार्यं करिष्यसि। करोमि एव। ( तू हें काम करशील का? करतोंच मी )

वरील वाक्यातील वर्तमानकाळी क्रियापदाचा अर्थ लवकरच येणाऱ्या भविष्यकालार्थी आहे.

४ कदा त्वम् आगतः। अयम् आगच्छामि ( तू केव्हां आलास? हा मी ( आताच ) आलों )
अपि रामेण अध्ययनं कृतम्। अयं सः अध्ययनं करोति।
( रामाने अभ्यास केला काय? हा त्यानं केलाच )

वरील वाक्यात नुकत्याच घडलेल्या गोष्टीबद्दल वर्तमान काळ योजलेला आहे.

५ हस्ती ब्रूते कः त्वम्। दमनकः पृच्छति कथम् एतद्।
वायसः ब्रूते प्रिये अलं भयेन।

वरील वाक्यात भूतकाळातील गोष्टी वर्णन करताना वर्तमानकाळाचा उपयोग केलेला आहे.

६ रजकस्य प्राङ्गणे गर्दभः बद्धः तिष्ठति ।
हिरण्यकः बिले स्वपिति ।

वरील वाक्यातील वर्तमानकाळ हा एकदाच घडणारी क्रिया न दर्शविता नित्यक्रम दर्शवितो

७ भासुरको नाम सिंहः प्रतिवसति स्म ।
कपिः तडागजले कमलं पश्यति स्म ।

वर्तमानकाळाचा 'स्म' या अव्ययाबरोबर उपयोग केला असता भूतकाळाचा अर्थ दर्शविला जातो

## अभ्यास १

पुढील वाक्यांचा अथवा श्लोकांचा अर्थ सांगा व वर्तमानकाळाचा विशिष्ट उपयोग स्पष्ट करा —

१ वृक्षस्य अधस्तात् विवरे वसन् सर्पः विहगानां बालापत्यानि खादति ।
२ वृद्धः वणिक् पुत्रं साटोपं पृच्छति स्म ।
३ मत्स्याः पृच्छन्ति स्म । भो बक कः अत्र रक्षणोपाय इति ।
बकः ब्रूते अस्ति रक्षणोपायः । [illegible] युष्मान् रक्षामि इति ।
४ बकः जलचरान् वदति यदि कश्चित् मम पृष्ठम् आरोहति तद् अहं तं तत्र नयामि इति ।
५ कुलीरः चिन्तयति । अहं सत्यानृतम् उपदेशं प्रयच्छामि । तथा च अन्ये पक्षा अपि सत्यं पृच्छन्ति इति ।
६ नीचः श्लाघ्यपदं प्राप्य स्वामिनं हन्तुमिच्छति ।
७ न सा सभा यत्र न सन्ति वृद्धा
वृद्धा न ते ये न वदन्ति धर्मम् ।
८ यः स्वभावो हि यस्यास्ति स नित्यं दुरतिक्रमः ।
श्वा यदि क्रियते राजा स किं नाश्नात्युपानहम् ॥

९ नियमयसि विमार्गप्रस्थितानात्तदण्ड
प्रशमयसि विवाद कल्पसे रक्षणाय।
१० गुणान्भूषयते रूप शील भूषयते कुलम्।
सिद्धिर्भूषयते विद्या भोगो भूषयते धनम् ॥

## टीपा

१ बालापत्यानि—लहान पिलें ( बाल + अपत्य )
३ रक्षणोपाय —रक्षणाचा उपाय ( रक्षण + उपाय )
५ सत्यानृत ( उपदेश )—खरा भासणारा ( उपदेश )
९ दुष्प्रभासकर्मी भागानी गहरेला खोच
विमार्गप्रस्थित —वाईट मार्गाला लागलेले
आत्तदण्ड —ज्यानें राजदण्ड हातात धरला आहे तो
राजदण्ड—सत्तेचें चिह्न समजला जातो

## अभ्यास २

पुढील वाक्यात रिकाम्या जागा वर्तमानकाळचे रूप योजा —

१ प्राज्ञ धुर्याणि वस्तूनि न अभ्युवाणि।
२ आलस्येन नर — ।
३ कस्यापि वटपादपस्य कोटर कृष्णसर्प ।
४ नकुल सन्मार्गेण गच्छति कृष्णसर्प च ।
५ पिता पुत्र वदति। आगच्छ मत्समीपम् इति। पुत्र प्रतिवदति। अयम् अहम् — इति।
६ शशक चटक प्रयाति एष नद्यागारे कोऽपि तपस्वी धर्मवादी । तद् एन पृच्छाव इति।
७ मम साहाय्य भवान् चेत् अहम् एतद् गहन सुखेन उत्तरामि।
८ सेवक स्वामिचित्त सदैव — ।
९ अपहित नर न कदापि कर्तव्यात् — ।
१० न्याय्य पक्ष सदा — ।

# पाठ १३.

## उपसर्ग.

१ १ वायुः पुष्पाणां सुगन्धं हरति। २ नृपः उद्याने विहरति ।
३ सैनिकः चोरं प्रहरति । ४ रामः राक्षसान् संहरति ।
५ साधुः दुर्जनं परिहरति। ६ मुनिः फलानाम् आहारं करोति ।

वरील सर्व वाक्यांत हृ–नेणें हें क्रियापद योजलेलें आहे. पहिल्या वाक्यांत मूळ क्रियापद योजलेलें आहे व बाकीच्या पांच वाक्यांत उपसर्ग जोडून क्रियापद योजलेलें आहे व त्या प्रत्येक ठिकाणीं उपसर्ग जोडल्यामुळें क्रियापदाचा अर्थ बदलला आहे.

उपसर्गेण धात्वर्थो बलादन्यत्र नीयते ।
प्रहाराहारसंहारविहारपरिहारवत् ॥

उपसर्गांच्या योगानें धातूचा अर्थ जोरानें दूर नेला जातो ( बदलला जातो ). जसें—प्रहार, आहार, संहार, विहार व परिहार

२ युद्धे रामः रावणं जयति ।
,, ,, ,, विजयते-पराजयते वा ।
रामः सीतया सह गच्छति ।
,, ,, सङ्गच्छते ।
पान्थः मार्गे तिष्ठति ।
,, मार्गं प्रतिष्ठते ।
कृष्णः गोपैः सह रमते ।
,, क्रीडायाः विरमति ।

वरील वाक्यांवरून असें दिसून येईल कीं मूळ क्रियापदाला उपसर्ग जोडला म्हणजे अर्थच बदलतो असें नाहीं तर पदही बदलतें. जसें—तिष्ठति–उभा

| | | | |
|---|---|---|---|
| उद् | –वर | –उद्गच्छति | –( वर जातो ) |
| उप | –जवळ | –उपगच्छति | –( जवळ जातो ) |
| निर् | –बाहेर | –निर्गच्छति | –( बाहेर जातो ) |
| परा | –दूर, पाठीमागें | –परावर्तते | –( माग वळतो ) |
| परि | –सभोंवतीं | –परिभ्रमति | –( सभोंवार फिरतो ) |
| प्र | –पुढें | –प्रक्रमते | –( पुढें जातो ) |
| प्रति | –उलट, मागें | –प्रतिवदति | –( उत्तर देतो ) |
| सम् | –एकत्र | –संगच्छते | –( मिळतो, भेटतो ) |
| वि | –विरुद्ध | –विस्मरति | –( विसरतो ) |
| वि | –दूर,दुसरीकडे | –विमोचति | –( दूर करतो ) |

## अभ्यास १

पुढील श्लोकाचा अर्थ करून, उपसर्गामुळे धातूचा अर्थ कसा बदलला आहे हें स्पष्ट करा —

१ चक्रवत्परिवर्तन्ते दुःखानि च सुखानि च ।

२ तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ।

३ गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ।

४ सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः ।
निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥

५ ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥

६ पतितोऽपि कराघातैरुत्पतत्येव कन्दुकः ।
प्रायेण साधुवृत्तानामस्थायिन्यो विपत्तयः ॥

७ वनस्पतेरपक्वानि फलानि प्रचिनोति यः ।
स नाप्नोति रसं तेभ्यो बीजं चास्य विनश्यति ॥

८ तां मृगीमिव सन्त्रस्तां दृष्ट्वा कृष्णां [illegible] ।
उदतिष्ठ [illegible] मृगौ नाव [illegible] पार्थः ॥

राहातो (प. प.), प्रतिष्ठते–निघतो (आ. प.), रमते–खेळतो (आ. प.), विरमति–थांबतो (प. प.)

३ बालः गृहं विशति–प्रविशति वा।
नृपः प्रासादात् उद्यानम् ईक्षते–प्रेक्षते वा।
धनिकः दीनाय धनं यच्छति–प्रयच्छति वा।

वरील वाक्यामध्यें क्रियापदांना जरी उपसर्ग लावलेला आहे तरी त्यांचे अर्थांत व पदांत फरक झालेला नाहीं

४ सततोद्योगेन धनं वि–प्र–वर्धते।
केचित् नराः स्वप्ने प्रलपन्ति।
बालः चित्रं निपुणं विलोकयति।

वरील वाक्यामध्यें मूळ क्रियापदांचा अर्थ उपसर्गामुळें बदलला नाहीं परंतु ज्यास्त परिणामकारक झाला आहे

नृपः सिंहासने समुपाविशति। (सम्+उप+आ+विश्)
औदरिक बहु अन्नम् अभ्यवहरति। (अभि+अव+हृ)
सुसंस्कृता वाणी कल्याणम् अभ्याहरति (अभि+आ+हृ)

वरील वाक्यांतील क्रियापदांवरून असें दिसून येईल कीं संस्कृतमध्यें धातूला एकाहून अधिक उपसर्ग जोडता येतात

५ उपसर्ग जोडले असता अकर्मक धातू सकर्मक होतात पाठ ६, नियम ४ पहा

मुख्य उपसर्ग पुढें दिले आहेत —

अति–पलीकडे – अतिगच्छति – अतिक्राम्यति–(पलीकडे जातो)
अधि–वर, वरती – अधिरोहति – (वर चढतो)
अनु–पाठीमागून – अनुगच्छति – अनुसरति–(पाठीमागून जाता)
अप–दूर – अपनयति – (दूर नेतो)
अभि–कडे – अभिगच्छति – अभिपतति–(हल्ला करतो)
आ–कडे बाजूला – आरूपति – (बाजूला ओढतो)
आ–उलट – आगच्छति – (येतो)

| | | |
|---|---|---|
| उद् –वर | –उद्गच्छति | –( वर जातो ) |
| उप –जवळ | –उपगच्छति | –( जवळ जातो ) |
| निर् –बाहेर | –निर्गच्छति | –( बाहेर जातो ) |
| परा –दूर, पाठीमागें | –परावर्तते | –( मागें वळतो ) |
| परि –सभोंवती | –परिभ्रमति | –( सभोंवार फिरतो ) |
| प्र –पुढें | –प्रक्रमते | –( पुढें जातो ) |
| प्रति –उलट, मागें | –प्रतिवदति | –( उत्तर देतो ) |
| सम् –एकत्र | –सम्गच्छते | –( मिळतो, भेटतो ) |
| वि –विरुद्ध | –विस्मरति | –( विसरतो ) |
| वि –दूर,दुसरीकडे | –वियोजयति | –( दूर करतो ) |

## अभ्यास १

पुढील श्लोकाचा अर्थ करुन, उपसर्गांमुळ धातूचा अर्थ कसा बदलला आहे हें स्पष्ट करा —

१ चक्रवत्परिवर्तन्ते दुःखानि च सुखानि च ।

२ तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ।

३ गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ।

४ सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।
निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥

५ ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥

६ पातितोऽपि कराघातैरुत्पतत्येव कन्दुकः ।
प्रायेण साधुवृत्तानामस्थायिन्यो विपत्तयः ॥

७ वनस्पतेरपक्वानि फलानि प्रचिनोति यः ।
स नाप्नोति रसं तेभ्यो बीजं चास्य विनश्यति ॥

८ तां मृगीमिव सन्त्रस्तां दृष्ट्वा कृष्णां सभोपमाम् ।
उदतिष्ठन्मुदा सूतो नावं कन्येव पारगः ॥

९ एते हि समुपासीना विहगा जलचारिणः ।
नावगाहन्ति सलिलमप्रगल्भा इवाहवम् ॥

१० वर्तमाने तथा युद्धे घोररूपे भयङ्करे ।
मोहयित्वा परान्द्रोणो युधिष्ठिरमुपाद्रवत् ॥

## टीपा

२ तेऽपि—भक्ताः अपि
श्रुतिपरायणाः—वेदशास्त्रात गढून गेलेले.
३ गतासुः—ज्याचा प्राण गेला आहे तो. ( गत + असु )
४ प्रकृतिसंभवाः ( गुणाः )—मूळ स्वभावामध्यें ज्याची उत्पत्ति आहे ते.
महाबाहो—हे अर्जुन.
५ श्रीकृष्णानीं म्हटलेला श्लोक.
६ पराघातः—दुसऱ्याचा आघात ( पर + आघात )
साधुवृत्तः—ज्याचें आचरण चांगलें आहे असा.
८ कृष्णा—द्रौपदी
पारगः—पलीकडे जाण्याची इच्छा करणारा ( पार + गन्तुम् इच्छुः )
९ अप्रगल्भः—प्रौढ दशेस न पोंचलेला. [illegible] हस्तवर्णनातील श्लोक आहे.

## अभ्यास २

पुढील वाक्यांत कंसात दिलेल्या क्रियापदांना योग्य ते उपसर्ग जोडून वाक्यें पुरी करा —

१ भक्ताः कमलिनीं ——— ——— ( भ्रम् ) ।
२ प्रयागे भागीरथी यमुना च ——— ( गम् ) ।
३ नाटकस्य आरम्भे सूत्रधारः पुष्पाणि ——— ——— ( कृ ) ।
४ चोरः रात्रौ गृहं प्रविशति बहुमूल्यानि वस्तूनि च ——— ( हृ ) ।
५ तपोधनाः मुनयः क्रोधं ——— ( यम् ) ।
६ ईश्वरः संसारसागरात् भक्तान् ——— ( धृ ) ।
७ प्रभाते ऋषयः मन्त्रैः अर्घ्येण च सूर्यं ——— ( स्था ) ।
८ छात्राः त्रीन् वेदान् चतस्रः विद्याः च ——— ——— ( इ ) ।
९ युद्धे सैनिकाः परस्परं ——— ( पत् ) ।
१० सर्वाः सम्पदः सोद्योगं नरं ——— ( या ) ।

# पाठ १४.

## कर्मणि व भावे प्रयोग—वर्तमान काळ.

| प्रथम वाक्यसमूहः । | द्वितीय वाक्यसमूह । |
|---|---|
| १ बालः ईश्वरं नमति । | बालेन ईश्वरः नम्यते । |
| मुनिः फलानि भक्षयति । | मुनिना फलानि भक्ष्यन्ते । |
| त्वं कथां कथयसि । | त्वया कथा कथ्यते । |
| गुरुः माम् उपदिशति । | गुरुणा अहम् उपदिश्ये । |

वरील वाक्यांच्या प्रत्येक जोडीमध्यें अर्थभेद दिसत नाहीं, परंतु रचनेंत भेद दिसतो

पहिल्या विभागांतील बालः, मुनिः, त्वम्, गुरुः ही प्रथमान्त कर्तृपदें दुसऱ्या विभागांत तृतीयेंत योजलेलीं आहेत ईश्वरं, फलानि, कथाम्, माम् हीं द्वितीयान्त कर्मपदें प्रथमेत योजलेलीं आहेत. क्रियापदाचीं रूपं प्रथमान्त कर्मपदाप्रमाणें पुरुष व वचन यामध्यें झालीं आहेत क्रियापदाच्या मूळ रूपाला 'य' हें चिन्ह व आत्मनेपदी प्रत्यय जोडलेले आहेत व क्रियापदाचा काळ कायम राहिला आहे

वरील वाक्यांतील क्रियापदें सकर्मक आहेत प्रथम वाक्यसमूहांतील कर्मपदें द्वितीय वाक्यसमूहांत प्रथमेंत योजून त्याप्रमाणें क्रियापदाचें रूप बदलतें म्हणून हा कर्मणि प्रयोग होय प्रथम वाक्यसमूहांतील क्रियापदाचा पुरुष व वचन हीं प्रथमान्त कर्तृपदाप्रमाणें झालेलीं आहेत म्हणून तो कर्तरि प्रयोग होय

| प्रथम वाक्यसमूह । | द्वितीय वाक्यसमूह । |
|---|---|
| कर्तरि प्रयोग । | कर्मणि प्रयोग । |
| कर्तृपद—प्रथमा विभक्ति | तृतीया विभक्ति |
| उदा०—बाल, मुनि, त्व, गुरु | बालेन, मुनिना, त्वया, गुरुणा |
| कर्मपद—द्वितीया विभक्ति | प्रथमा विभक्ति |
| उदा०-ईश्वर, फलानि, कथा, माम् | ईश्वर, फलानि, कथा, अहम् |

वर दर्शविल्याप्रमाणें कर्तृपद व कर्मपद यांचे विभक्तींत जरी फरक होतो तरी वचनात बदल होत नाहीं.

| | |
|---|---|
| क्रियापद–**प्रथमान्त** कर्तृपदाप्रमाणें पुरुष व वचन यामध्ये असतें व त्याचा गण व पद मूळप्रमाणेंच असतात. | **प्रथमान्त** कर्मपदाप्रमाणें पुरुष व वचन यामध्ये असतें व मूळ गण व पद कांहीं असलें तरी धातूला 'य' व आत्मनेपदी प्रत्यय जोडलेले असतात. |

कर्तरिप्रयोगाचें कर्मणिप्रयोगांत रूपान्तर करताना अथवा कर्मणिप्रयोगाचें कर्तरिप्रयोगात रूपांतर करताना काळ अथवा अर्थ कायम ठेवावा लागतो.

२ बालः पाठशालां गच्छति । बालेन पाठशाला गम्यते ।
नृपः विजयेन मोदते । नृपेण विजयेन मुद्यते ।
समुद्रः क्षुभ्यति वर्षासु । समुद्रेण क्षुभ्यते वर्षासु ।

वरील वाक्यांच्या प्रत्येक जोडीमध्यें अर्थभेद दिसत नाहीं; दोन्ही विभागांतील वाक्याचा अर्थ सारखाच आहे. परंतु या वाक्यातील क्रियापदें अकर्मक आहेत. मूळ वाक्यांतील प्रथमान्त कर्तृपदें दुसऱ्या विभागामध्यें तृतीयेंत योजिलीं आहेत व क्रियापदांचीं रूपें मूळ धातूला 'य' व तृतीयपुरुषी एकवचनी आत्मनेपदी प्रत्यय जोडून केलेली आहेत. या वाक्यामध्यें क्रियेचा भाव हा महत्त्वाचा असतो म्हणून या प्रयोगाला भावे प्रयोग असें म्हणतात.

३ भिक्षुकः धनिकं द्रव्यं याचते–प्रार्थयते वा ।
भिक्षुकेण धनिकः द्रव्यं याच्यते–प्रार्थ्यते वा ।
गोपालः धेनुं क्षीरं दोग्धि । गोपालेन धेनुः क्षीरं दुह्यते ।
आचार्यः शिष्यान् प्रश्नान् पृच्छति ।
आचार्येण शिष्याः प्रश्नान् पृच्छ्यन्ते ।
श्रीकृष्णः अर्जुनं धर्मं शास्ति–ब्रूते वा ।
श्रीकृष्णेन अर्जुनः धर्मं शिष्यते–उच्यते वा ।
गोपी दधि नवनीतं मथ्नाति । गोप्या दधि नवनीतं मथ्यते ।

वरील वाक्यांतील याच्, दुह्, प्रच्छ्, शास्, ब्रू, मन्थ् या द्विकर्मक

क्रियापदाच्या कर्मणि प्रयोगात गौण कर्मपदाचा प्रथमा विभक्तींत उपयोग केलेला आहे. जसें—धनिकः, धेनुः, शिष्याः, अर्जुनः व दधि. परंतु मुख्य कर्मवाचक शब्द द्वितीयेंतच राहिले आहेत. जसें—द्रव्यम्, क्षीरम्, प्रश्नम्, धर्मम्, नवनीतम्.

४ सेनापतिः सेनां समराङ्गणं नयति याचें
सेनापतिना सेना „ नीयते।
भृत्यः भारं गृहं वहति याचें
भृत्येन भारः गृहं उह्यते।
बलीवर्दाः हलं क्षेत्रं हरन्ति–कर्षन्ति वा याचें
बलीवर्दैः हलं क्षेत्रं ह्रियते–कृष्यते वा।

वरील वाक्यांतील क्रियापदें नी, वह्, हृ व कृष् हीं द्विकर्मक आहेत. परंतु या वाक्यांचें कर्मणि प्रयोगांत रूपान्तर करतांना मुख्य कर्मपद प्रथमेंत आलें आहे. जसें—सेना, भारः, हलम् व गौण कर्म तसेंच राहिलें आहे. जसें—समराङ्गणम्, गृहम्, क्षेत्रम्.

५ (१) क्षुधितः बालः पक्वानि फलानि भक्षयति। कर्तरि प्र०
क्षुधितेन बालेन पक्वानि फलानि भक्ष्यन्ते। कर्मणि प्र०
(२) प्रायः ललनाः मनोहराम् अपि तनुं अलङ्कारैः भूषयन्ति। कर्तरि प्र०
प्रायः ललनाभिः मनोहरा अपि तनुः अलङ्कारैः भूष्यते। कर्मणि प्र०
(३) क्रीडाङ्गणे विविधैः प्रकारैः बालाः क्रीडन्ति। कर्तरि प्र०
क्रीडाङ्गणे विविधैः प्रकारैः बालैः क्रीड्यते। भावे प्र०

वरील कर्तरि प्रयोगातील वाक्यांचें कर्मणि अथवा भावे प्रयोगांत रूपान्तर करतांना वर दिलेले नियमच अवलंबिलेले आहेत. मात्र कर्तृपदाचें अथवा कर्मपदाचें रूप बदलतांना त्याच्या विशेषणांचेंही रूप बदललेलें आहे. जसें—क्षुधितः–क्षुधितेन, मनोहराम्–मनोहरा, व इतर शब्द जसेच्या तसेच

४ ईश्वरस्य प्रसादेन दैववशात् नराः घोराणि संकटानि उत्तरन्ति ।
५ वैतालिकाः नृपस्य कीर्तिं गायन्ति ।
६ सायङ्काले क्रीडाङ्गणे बालाः विविधाभिः क्रीडाभिः रमन्ते ।
७ रात्रौ आकाशे तारकाः प्रकाशन्ते ।
८ भृत्याः शीर्षेण गुरुं भारं वहन्ति ।
९ वर्षाकालस्य आरम्भे उन्मत्ताः मयूराः नृत्यन्ति हर्षेण ।
१० गर्विताः नराः गुरुजनानाम् आगमने अपि न उत्तिष्ठन्ति ।

---

# पाठ १५.

## सर्वनामें—( अस्मद्, युष्मद्, तद्, एतद् )

१ शकुन्तला दुष्यन्तं वदति । अहं तव भार्या । अपि त्वं तव वचनं विस्मरसि मां च त्यजसि इति ।
तदा सः तां प्रतिवदति । मया त्वं न परिणीता । अतः अहं त्वां न स्मरामि । न कोऽपि सम्बन्धः मम तव च इति ।
अतः सा दैवं निन्दति ।

वरील वाक्यामध्ये अस्मद्, युष्मद् व तद् ही प्रथम, द्वितीय व तृतीय-पुरुषवाचक सर्वनामें योजलेली आहेत. त्यांच्या अहम्, त्वम्, तव, मम, माम्, सः, ताम्, सा इत्यादि रूपावरून असे लक्षात येईल की प्रथमपुरुषवाचक 'अस्मद्' व द्वितीयपुरुषवाचक 'युष्मद्' यांची रूपें सर्व लिंगांत एकच तऱ्हेची होतात. परंतु तद् याची मात्र निरनिराळ्या लिंगांत निरनिराळी होतात. जसें 'शकुन्तला' स्त्रीलिंगी नामाबद्दल 'अस्मद्' याचें प्रथमेचें एकवचन 'अहम्' असें झालें आहे व 'दुष्यन्त' या पुल्लिंगी नामाबद्दलही तसेंच झालें आहे. त्याचप्रमाणें 'त्वम्, तव' ही 'युष्मद्' या सर्वनामाची रूपें स्त्रीलिंगी व पुल्लिंगी नामांबद्दल सारखीच झाली आहेत. परंतु 'तद्' याचें पुल्लिंगी

प्रथमेचें एकवचन 'स' असें झालें आहे व स्त्रीलिंगी प्रथमेचे एकवचन 'सा' असें झालें आहे

२ स. बाल. मम मित्रम्। एषा लता बहूनि कुसुमानि धारयति। तस्यां नगर्यां बहवः पण्डिताः वसन्ति। एतस्मिन् उद्याने विशालः वटवृक्षः दृश्यते। तस्य पुष्पस्य वर्णः रक्तः। एतस्य कुसुमस्य नीलः।

वरील वाक्यामध्यें 'हा' व 'तो' या दर्शक सर्वनामाच्या अर्थांचीं 'एतद्' व 'तद्' हीं दर्शक सर्वनामें उपयोगात आणलेलीं आहेत त्यांचीं रूपें पुढें येणाऱ्या नामाच्या रूपाप्रमाण लिंग, विभक्ति व वचन यामध्यें झालीं आहेत

जसें–बाल–पुल्लिंगी, प्रथमा, ए वचन, म्हणून तद् याचें स हें पु प्र ए व उद्याने–नपुंसकलिंगी सप्तमी एकवचन, म्हणून एतस्मिन् हें न स ए. व

३ मम पुस्तकम् एतद्—मे एतद् नव्हे
मम च तव च सख्यं वर्तते—मे च ते च नव्हे
तव एव इदं पुस्तकम्—ते एव ... नव्हे
युष्माकं वा अस्माकं वा कार्यं भवति—व. वा नः वा . नव्हे
हे बाला. युष्माकम् एष.अपराधः—हे बाला. वः एष. ..नव्हे
विष्णो अस्मान् रक्ष—विष्णो न. रक्ष...नव्हे
परंतु विष्णो दयालो न. रक्ष बरोबर आहे

वरील वाक्यामध्यें मम, तव, युष्माकम्, अस्माकम्, अस्मान् वगैरे अस्मद् व युष्मद् या सर्वनामाचीं रूपं आलीं आहेत याबद्दल येणारीं वैकल्पिक रूपं 'मे, ते, व., न., नः' हीं वरील वाक्यात उपयोगात आणतां येणार नाहींत, कारण हीं वैकल्पिक रूपें वाक्याच्या अथवा कवितेच्या चरणाच्या आरंभीं, च, वा, एव या अव्ययांनीं जोडलीं असतांना, अथवा संबोधनवाचक नामानंतर लगेच उपयोगात आणतां येत नाहींत परंतु संबोधनार्थी पदानंतर जर संबोधनार्थी विशेषण आलें असेल तर मात्र वैकल्पिक रूपें योजतां येतील. जसें—'विष्णो' यापुढें 'दयालो' हें संबोधनार्थी विशेषण असतांना 'न' हें रूप योजतां येतें.

## अभ्यास १

पुढील वाक्यांचा अर्थ करा व सर्वनामाचा उपयोग स्पष्ट करून दाखवा:—

१ पुरा एतस्यां नगर्यां कालिदासः अवसत्। तेन नाटकानि काव्यानि च लिखितानि। तेषु ग्रन्थेषु शाकुन्तलं नाटकं प्रसिद्धम्। अतः सः आदरास्पदं अभवत्। ईश्वरः सर्वान् नः रक्षतु इति सः सर्वदा प्रार्थयत।

२ तापसी वनदेवतां कथयति। रामः अद्य तापसं अभिगमिष्यति इति। वनदेवता वदति। एतस्मिन् एव वने सः तापसः निवसति। अतः रामः इदं वनम् आगच्छति। अहो महत् मे भाग्यम् इति।

## अभ्यास २

(अ) पुढील वाक्यांत अस्मद्, युष्मद्, तद् किंवा एतद् या सर्वनामांची योग्य ती रूपे घाला.—

अयोध्यायां दशरथः नृपः वसति। ——— चत्वारः पुत्राः। ———
रामः ज्येष्ठः। एकदा ——— नगरीं विश्वामित्रः ऋषिः आगच्छति वदति च।
हे नृप ——— रामलक्ष्मणौ यज्ञस्य रक्षणाय ——— याचे। —
प्रार्थनां मा अवमन्यस्व इति। तदा ——— नृपः प्रतिवदति — —
पुत्रौ ——— बहु प्रियौ। कथम् अहं ——— ——— यच्छामि — इति।
किन्तु वसिष्ठः ——— उपदिशति। ——— पुत्रौ यच्छ।
विश्वामित्राय निःशङ्कम् इति। तदा दशरथः तथा करोति। विश्वामित्रः अपि
——— सह गच्छति।

(आ) पुढील वाक्यांत अस्मद् व युष्मद् या सर्वनामांची वैकल्पिक रूपें कोणती येतील ती सांगा.—

१ अस्माकम् एव अयम् अपराधः न तव।
२ युष्मभ्यं वा अस्मभ्यं वा अद्य गुरुः कथां कथयति।
३ तव च मम च उपरि अन्ये छात्राः न वदन्ते।
४ हे विष्णो अस्मान् रक्ष। हे ईश्वर दयालो मम प्रार्थनां शृणु।

# पाठ १६.

## विशेषणें.

१ तुङ्गेषु वृक्षेषु विविधाः खगाः वसन्ति ।
गजस्य शुण्डा दीर्घा ।
रमणीये उद्याने मनोहराणि पुष्पाणि विलसन्ति ।

वरील वाक्यामध्यें तुङ्गेषु, दीर्घा, रमणीये व मनोहराणि हीं विशेषणाचीं रूपें आहेत तीं गुण दर्शविताता हीं सर्व गुणविशेषणें अकारान्त आहेत, त्यांचीं रूपें ज्या नामाचीं तीं विशेषणें आहेत, त्याप्रमाणें लिंग, वचन व विभक्ति यामध्यें झालीं आहेत पुल्लिंगामध्यें 'नृप' प्रमाण, स्त्रीलिंगामध्यें आ जोडून 'माला' शब्दाप्रमाणें व नपुसकलिंगामध्यें 'वन' शब्दाप्रमाणें झालीं आहेत स्त्रीलिंगामध्ये कांहीं विशेषणांना ई हा प्रत्यय जोडून 'नदी' शब्दाप्रमाणें रूप केलीं जातात. कांहीं विशेषणांना स्त्रीलिंगामध्यें दोन्ही प्रत्यय लावून रूपें करतात. जसें सुन्दर–सुन्दरा–री, चण्ड–चण्डा–ण्डी, पुराण–पुराणा–णी, नील–नीला–ली, विशाल–विशाला–ली, साधारण–साधारणा–णी, परतु कल्याण–कल्याणी, सारङ्ग–सारङ्गी, तरुण–तरुणी, गौर–गौरी, शाश्वत–शाश्वती.

२ सुरभीणि कुसुमानि चित्तम् आह्लादयन्ति ।
शुचिः आचारः स्तुत्यः भवति ।
शुच्या मत्या नरः आदरम् अर्हति ।
रामः सुरभिभिः पुष्पैः ईश्वरं पूजयति ।

वरील वाक्यामध्यें ह्रस्व इकारान्त सुरभि व शुचि या विशेषणाचा उपयोग केलेला आहे त्यांचीं रूपें पुल्लिंगामध्यें 'हरि' प्रमाण, स्त्रीलिंगामध्यें 'मति' प्रमाण व नपुसकलिंगामध्ये 'वारि' प्रमाण झालीं आहेत नपुसकलिंगामध्यें चतुर्थी एकवचनापासून सप्तमी एकवचनापर्यंत व षष्ठी व सप्तमी द्विवचन यांचीं रूपें 'हरि' प्रमाणेंही करता येतात

३ बहूनां वृक्षाणां स्थानं वनम्।

दिनस्य पूर्वार्धे वृक्षाणां छाया गुरुः गुर्वी वा भवति।

परन्तु पट्वः वा कन्याः पारितोषिकाणि लभन्ते।

गुरुणा भारेण भृत्यस्य शीर्षं नमति।

वरील वाक्यात गुरु, पटु व बहु या उकारान्त विशेषणाची रूपें योजलेली आहेत ती पुल्लिंगामध्यें 'भानु' प्रमाणें, स्त्रीलिंगामध्यें 'धेनुप्रमाणें' अथवा 'ई' जोडून 'नदी' प्रमाणें झालीं आहेत व नपुंसकलिंगामध्यें 'मधु' प्रमाण होतात. नपुंसकलिंगामध्यें चतुर्थीएकवचन तें सप्तमीएकवचन व षष्ठी व सप्तमी द्विवचन यांचीं रूपें 'भानु' प्रमाणेंही होतात

टीप —उकारान्त विशेषणाच्या उपान्त्य जोडवर्ण असेल तर स्त्रीलिंगामध्यें ई जोडून रूप केलें जात नाहीं जसें पाण्डु, साधु।

४ कर्णः इव दाता विरलः।

परमेश्वरस्य स्तोतॄणां यतीनां दर्शनं पुण्यम्।

बहवः ग्रन्थकर्तारः तथा च ग्रन्थकर्त्र्यः अपि भारतवर्षे वर्तन्ते।

अप्रियस्य अपि पथ्यस्य वक्तॄणि मित्राणि दुर्लभानि।

सैन्यस्य नेतारः अभिगन्तॄन् पराजयन्त।

वरील वाक्यात तृ-प्रत्ययान्त धातुसाधित कर्तृदर्शक विशेषणें योजलेलीं आहेत. दातृ, स्तोतृ, कर्तृ, वक्तृ, नेतृ व अभिगन्तृ यांचीं रूपें पुल्लिंगामध्यें व नपुंसकलिंगामध्यें 'कर्तृ' प्रमाणें व स्त्रीलिंगामध्यें 'ई' जोडून 'नदी' प्रमाण झालीं आहेत

## अभ्यास १

पुढील वाक्याचा अथवा श्लोकाचा अर्थ करा व विशेषणाचा उपयोग स्पष्ट करा —

१ निसर्गपट्वी बुद्धिर्नरं सङ्कटादुद्धरति।

२ कल्याणा मतिर्विनीतता च भूतिः साधूनाम्।

३ गुरुणि कार्ये नियुक्तः सामान्यो जनः कदाचिद्व्यग्रो भवति।

४ गुर्वी राज्यधुरा पुत्रे निवेशिता वृद्धेन नृपेण ।
५ सुरभिणः कुसुमस्य नैसर्गिकी स्थितिर्मूर्ध्नि वर्तते ।
६ समाननस्य शोभमिनेत्रद्विपाणयुगल कियन्मनोहर वर्तते इति केनापि न्मृगेणोक्त स्वप्रतिबिम्ब जले दृष्ट्वा ।
७ भोक्तार यज्ञतपसा सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृद सर्वभूताना ज्ञात्वा मा शान्तिमृच्छति ॥
८ बहूना जन्मनामन्ते ज्ञानी मा प्रतिपद्यते ।
९ अथवा मृदु वस्तु हिंसितु मृदुनैवारभते प्रजान्तक ।
१० लोभश्चेदगुणेन कि पिशुनता यद्यस्ति कि पातकै
सत्य चेत्तपसा च कि शुचि मनो यद्यस्ति तीर्थेन किम् ।

## टीपा

१ निसर्गमृदु—स्वभावत कुमार
४ राज्यधुरा—राज्याची जबाबदारी ( राज्यस्य धू॰ )
७ व ८ अर्जुनाला उपदेश करताना श्रीकृष्णानी म्हटलेले श्लोक

## अभ्यास २

पुढील वाक्यातील रिकाम्या जागी रकान्यात दिलेल्या विशेषणापैकी योग्य त्या विशेषणाचे योग्य रूप योजा —

१ वृक्षस्य पर्णानि ————— ।
२ ————— ज्योत्स्नायां जना विहरन्ति ।
३ ————— पशूना निवास अरण्ये ।
४ बाला ————— क्रीडाङ्गणे क्रीडन्ति ।
५ ————— वायु पथिकान् पीडयति ।
६ ————— छायाया विश्राम्यन्ति पान्था ।
७ ————— स्वर वायसस्य ।
८ ————— नार्य भर्तु साहाय्य कुर्वन्ति ।

९ ——— कुसुमानि वृक्षान् भूषयन्ति ।
१० ——— कमलानां सुगन्धं वायुः हरति ।
( कर्कश, धवल, प्रफुल्ल, हरित, विविध, हिंस्र, शीतल, विशाल, चतुर, प्रबल )

## अभ्यास ३

पुढील वाक्यांत विशेषणांचा योग्य रूपें योजा व अर्थ करा:—

१ अस्मिञ्जगति बहवः ( उपदेष्टृ ) सन्ति किन्तु यथोपदेशं ( व्यवहर्तृ ) अभावः ।
२ ( शुचि ) आचारेण नरः आदरार्हः भवति ।
३ ( सुरभि ) मालाया गन्धः सर्वेषां प्रियः ।
४ ( अनुकूल ) दैवेन शत्रवः अपि मित्राणि भवन्ति ।
५ ( विधातृ ) इच्छा केन लङ्घ्यते ।
६ निसर्गेण ( पटु ) बुद्ध्या नरः संकटानि लीलया एव तरति ।
७ ( कर्तृ ) मृत्पिण्डतः करोति यद् यद् इच्छति ।
८ श्रावणस्य ( प्रहर्तृ ) तस्य हृदयात् बाणः आकृष्टः ।
९ उमा वधूः भवान् ( दातृ ) ( याचितृ ) इमे वयम् ।
१० जनकानां रघूणां च सम्बन्धः कस्य न प्रियः ।
यत्र ( दातृ ) ( ग्रहीतृ ) च स्वयं कुशिकनन्दनः ॥

---

# पाठ १७.

## संख्याविशेषणें १ ते १९.

एक, द्वि, त्रि, चतुर्, पञ्चन्, षष्, सप्तन्, अष्टन्, नवन्, दशन्, एकादशन्, द्वादशन्, त्रयोदशन्, चतुर्दशन्, पञ्चदशन्, षोडशन्, सप्तदशन्, अष्टादशन्, नवदशन् ।

१ एकः वृक्षः, द्वौ वृक्षौ, बहवः वृक्षाः ( त्रयः, चत्वारः... )
एका लता, द्वे लते, बहव्यः लताः ( तिस्रः, चतस्रः... )

४ गुर्वी राज्यधुरा पुत्रे निवेशिता वृद्धेन नृपेण ।
५ सुरभित्वं कुसुमस्य नैसर्गिकी स्थितिर्भूत्वा न वर्तते ।
६ मृगाननस्य शोभायै एतद्विषाणयुगलं कियन्मनोहरं वर्तते इति तेनापि मृगेणात्तं स्वप्रतिबिम्बं जले दृष्ट्वा ।
७ भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥
८ बहूनां जन्मनामन्ते ज्ञानी मां प्रतिपद्यते ।
९ अथवा मृदु वस्तु हिंसितुं मृदुनैवारभते प्रजान्तकः ।
१० लोभश्चेदगुणेन किं पिशुनता यद्यस्ति किं पातकैः
सत्यं चेत्तपसा च किं शुचि मनो यद्यस्ति तीर्थेन किम् ।

## टीपा

१ निसर्गसिद्धी—स्वभावतः सुंदर
४ राज्यधुरा—राज्याची जबाबदारी ( राज्यस्य धूः )
७ व ८ अर्जुनाला उपदेश करताना श्रीकृष्णांनी म्हटलेले श्लोक

## अभ्यास २

पुढील वाक्यातील रिकाम्या जागी कंसात दिलेल्या विशेषणापैकी योग्य त्या विशेषणाचे योग्य रूप योजा —

१ वृक्षस्य पर्णानि ________ ।
२ ________ ________ ज्योत्स्नायां जना विहरन्ति ।
३ ________ पशूनां निवासः अरण्ये ।
४ बालाः ________ क्रीडाङ्गणे क्रीडन्ति ।
५ ________ ________ वायुः पथिकान् पीडयति ।
६ ________ छायायां विश्राम्यन्ति पान्थाः ।
७ ________ स्वरः वायसस्य ।
८ ________ नाराः मनुः साहाय्यं कुर्वन्ति ।

९ ——— कुसुमानि वृक्षान् भूषयन्ति ।

१० ——— कमलानां सुगन्धं वायु हरति ।

( कर्कश, चपल, प्रफुल्ल, हरित, विविध, हिंस्र, शीतल, विशाल, चतुर, प्रबल )

## अभ्यास ३

पुढील वाक्यात विशेषणाचा योग्य रूपें योजा व अर्थ करा —

१ अस्मज्जगति बहव (उपदेष्टृ) सन्ति किन्तु यथोपदेश (व्यवहर्तृ) अभाव ।

२ (शुचि) आचारेण नर आदरार्ह भवति ।

३ (सुरभि) मालाना गन्ध सर्वेषां प्रिय ।

४ (अनुकूल) दैवेन शत्रव अपि मित्राणि भवन्ति ।

५ (विधातृ) इच्छा केन लङ्घ्यते ।

६ निरलस (पटु) बुद्ध्या नर सङ्कटानि लीलया एव तरति ।

७ (कर्तृ) मृत्पिण्डत करोति यद् यद् इच्छति ।

८ रावणस्य (प्रहर्तृ) तस्य हनूमान् नाम आहूत ।

९ उभा बाहू भवान् (दातृ) (याचितृ) इमे वयम् ।

१० जनकाना रघूणा च सम्बन्ध कस्य न प्रिय ।
यत्र (दातृ) (ग्रहीतृ) च स्वयं कुशिकनन्दन ॥

---

# पाठ १७.

## संख्याविशेषणें १ ते १९.

एक, द्वि, त्रि, चतुर्, पञ्चन्, षष्, सप्तन्, अष्टन्, नवन्, दशन्, एकादशन्, द्वादशन्, त्रयोदशन्, चतुर्दशन्, पञ्चदशन्, षोडशन्, सप्तदशन्, अष्टादशन्, नवदशन् ।

१. एकः वृक्षः, द्वौ वृक्षौ, बहवः वृक्षाः (त्रयः, चत्वारः... )
एका लता, द्वे लते, बह्व्यः लताः (तिस्रः, चतस्रः.. )

**एकं पुष्पम्, द्वे पुष्पे, बहूनि पुष्पाणि (त्रीणि, चत्वारि...)**

वरील उदाहरणावरून असें दिसून येईल की, एक, द्वि, त्रि व चतुर्, ही पहिलीं चार संख्याविशेषणें तीन्ही लिंगामध्यें निरनिराळ्या तऱ्हेनें चालतात. एक हें एकवचनामध्यें, द्वि हें द्विवचनामध्य व त्रि व चतुर् हीं बहुवचनामध्यें योजतात.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २ | पञ्च | वृक्षाः — | लताः — | कुसुमानि वा। |
| | षट्-ड् | " | " | " |
| | सप्त | " | " | " |
| | अष्ट ऽौ | " | " | " |
| | नव | " | " | " |
| | दश | " | " | " |

वरील उदाहरणावरून असें दिसून येईल की पञ्चन् (५) पासून दशन् (१०) पर्यंतचीं संख्याविशेषणें कोणत्याही लिंगाच्या नामाबरोबर योजलीं तरी एकाच तऱ्हेनें व बहुवचनात चालतात.

३ एकादश रुद्राः। द्वादश आदित्याः। चन्द्रस्य षोडश कलाः। अष्टादश पुराणानि। पक्षस्य पञ्चदश दिवसाः-दिनानि वा। पक्षस्य रात्रयः अपि पञ्चदश।

वरील उदाहरणावरून असें दिसून येईल की एकादशन् (११) ते नवदशन् (१९) पर्यंतचीं संख्याविशेषण पुढें येणारें नाम कोणत्याहि लिंगाचें असलें तरी एकाच तऱ्हेनें व बहुवचनात चालतात

## क्रमवाचक संख्याविशेषणें.

प्रथम। द्वितीय। तृतीय। चतुर्थ। पञ्चम। षष्ठ। सप्तम। अष्टम। नवम। दशम। एकादश। द्वादश। त्रयोदश। चतुर्दश। पञ्चदश। षोडश। सप्तदश। अष्टादश। नवदश।

४ रामायणे षष्ठं काण्डं युद्धकाण्डं वर्तते।
देवक्याः अष्टमम् अपत्यं कृष्णः आसीत्।

चैत्रस्य नवमे दिने श्रीरामस्य जन्मोत्सवः क्रियते।
दशरथस्य चतुर्थः पुत्रः भरतः प्रथमस्य श्रीरामस्य भक्तः।
श्रावणस्य कृष्णपक्षे अष्टम्यां तिथौ कृष्णः जातः।
एकादश्यां तिथौ निराहाराः जनाः विष्णुं पूजयन्ति।

वरील वाक्यांमध्ये **प्रथम, चतुर्थ,** षष्ठ, अष्टम इत्यादि क्रमवाचक संख्याविशेषणें योजलेली आहेत तीं सर्व अकारान्त आहेत. पुल्लिंगामध्यें त्यांची रूपें '**नृप**' प्रमाणे, नपुंसकलिंगामध्यें '**घन**' प्रमाणें व स्त्रीलिंगामध्यें **प्रथम, द्वितीय, तृतीय** यांना आ जोडून '**माला**' प्रमाणें व चतुर्थ ते नवदश-पर्यंत ई जोडून 'नदी' प्रमाणें होतात

द्वितीय व तृतीय यांची चतुर्थी ते सप्तमी एकवचनात सर्वनामाप्रमाणेही रूपें होतात.

## संख्यावाचक क्रियाविशेषणें.

५. (अ) सकृत्, द्विः, चतुः, पञ्चकृत्वः, अष्टकृत्वः   शतकृत्व.
(आ) एकैकशः, द्विशः, त्रिशः, चतुश्शः, शतशः, सहस्रशः...
(इ) एकधा, द्विधा द्वेधा, त्रिधा त्रेधा, चतुर्धा, पञ्चधा, षोढा षड्धा, सप्तधा,.. शतधा, सहस्रधा.. ...

(अ) सप्ताहस्य पञ्चकृत्वः बालः पाठशालां गच्छति।
दिवसस्य त्रिः केचित् नराः स्नानं कुर्वन्ति।

(आ) भारतीययुद्धे सहस्रशः वीराः हताः।
सैनिकाः द्विशः चतुश्शः वा मार्गेण गच्छन्ति।

(इ) विष्णुः त्रेधा विचक्रमे।
पतिं विना किं न मम हृदयं शतधा विदीर्णम् इति आक्रोशात् काचित् स्त्री।

वरील अ, आ व इ विभागामध्यें संख्यावाचक क्रियाविशेषणाचे प्रकार दिलेले आहेत

'अ' मध्ये 'किती वेळां' या अर्थाचीं क्रियाविशेषणें योजलेलीं आहेत. एखाद्या विशिष्ट काळांतील अमुक वेळां असा अर्थ दर्शवावयाचा असल तेव्हां त्या विशिष्ट कालवाचक शब्दाला षष्ठी विभक्ति योजतात. जसें—सप्ताहस्य, दिवसस्य.

'आ' मध्ये एक एक, दोन दोन, तीन तीन, शेंकडों हजारों असा अर्थ दर्शविणारीं संख्यावाचक क्रियाविशेषणें उपयोगांत आणलेलीं आहेत. तीं 'शस्' हा प्रत्यय संख्यावाचक शब्दाला जोडून तयार केलीं जातात.

'इ' मध्यें 'अमुक प्रकारानीं' असा अर्थ दर्शविणारी 'धा' प्रत्यय जोडून तयार केलीं जाणारीं संख्यावाचक क्रियाविशेषणें उपयोगांत आणलेलीं आहेत.

## अभ्यास १

पुढील वाक्यांत योग्य तीं संख्यावाचक विशेषणाचीं रूपें योजा —

१ चैत्रस्य शुक्लपक्षे — तिथौ श्रीरामः जातः । वैशाखस्य——दिने च परशुरामः ।

२ ——वेदानां ——अङ्गानि सन्ति ।

३ शङ्करः मदनं—— नेत्रात् जातेन अग्निना भस्मसात् अकरोत् ।

४ रावणस्य——मुखानि, ब्रह्मणः च मुखानि ।

५ देवी दुर्गा——भुजैः राक्षसान् मारयति ।

६ मोक्षस्य मार्गाः सन्ति । मोक्षः तु ——पुरुषार्थः ।

७ ——रिपुषु कामः ——मत्सरः तु——रिपुः भवति ।

८ अप्सरसां——कुलानि गन्धर्वाणां तु ——कुले ।

९ ——वस्तूनां समूहः त्रितयम् ——वस्तूनां षट्कं च ।

१० बालकस्य नामसंस्कारः दिने क्रियते ।

## अभ्यास २

पुढील वाक्यांचा अथवा श्लोकांचा अर्थ सांगून त्यांतील संख्याविशेषणांचा उपयोग स्पष्ट करा —

१ मासस्य द्वौ पक्षौ पक्षस्य च पञ्चदश दिनानि सन्ति ।

२ पञ्च वै तेन मे दत्ता वराः शृणुत तान्मम ।

३ षडिमानि विनश्यन्ति मुहूर्तमनवेक्षणात् ।
गावः सेवा कृषिर्भार्या विद्या वृषलसंगतिः ॥

४ एकः क्षमावतां दोषो द्वितीयो नोपपद्यते ।
यदेनं क्षमया युक्तमशक्तं मन्यते जनः ॥

५ ततस्तृतीये दिवसे सत्यवत्यात्मजो मुनिः ।
युधिष्ठिरं समभ्येत्य वाग्मी वचनमब्रवीत् ॥

६ दर्शेव तु सदाचारैः योऽनित्यानतिरिच्यते ।
पितृन्दश तु मासेषु सर्वान्वा पृथिवीपतिः ॥

७ द्वादशेऽहनि तेभ्यः स कृतशौचो नराधिपः ।
श्राद्धानि विधिवत्प्रादाद्दक्षिणावन्ति पाण्डवः ॥

८ ततो नवं रथं शुभ्रमारोहच्च युधिष्ठिरः ।
युक्तं षोडशभिर्गोभिः पाण्डुरैः शुभलक्षणैः ॥

९ वयं वा द्वादशाब्दानि युष्माभिर्द्यूतनिर्जिताः ।
प्रविशेम महारण्यं रौरवाजिनवाससः ॥

१० चतुर्दशानां नैष्फल्यात्पुनर्नव च पञ्च च ।
प्राहिणोन्निशितान्बाणास्ते चाभज्यन्त वर्मणः ॥

## टीपा

२ सावित्रीनें म्हटलेला श्लोकार्ध.

३ अनवेक्षणम्—दुर्लक्ष, काळजी न वाहणें.

५ तृतीये दिवसे—राज्यारोहणानन्तर अशौच सुरू झाल्यावर तिसऱ्या दिवशीं.

७ द्वादशेऽहनि—धृतराष्ट्राच्या मरणानंतर बाराव्या दिवशीं.
नराधिपः—पाण्डवः युधिष्ठिरः
कृतशौचः—शौचम्=शुद्धता. ज्यानें (नातेवाइकांच्या मृत्यूमुळें आलेलें, सोयरसुतक पाळून) शुद्धता केलेली आहे तो.

९ द्यूताच्या वेळीं युधिष्ठिरानें दुर्योधनाशीं केलेला डाव.

१० अर्जुनानें द्रोणाचार्यांवर टाकलेल्या बाणासंबंधीं हा श्लोक आहे.

# पाठ १८.

## भूतकालः—प्रथमभूतकालः ( अनद्यतनः )

१ ह्य. अहं मार्गे मित्रम् अपश्यम् ।
गते संवत्सरे पर्जन्य. प्रभूतं जलम् अवर्षत् ।
कस्मिंश्चित् अरण्ये कोऽपि सिंहः गुहायाम् अवसत् ।
जना. कृष्णस्य क्रीडायां कौशलम् पैक्षन्त ।

वरील वाक्यातील अपश्यम्, अवर्षत्, अवसत् व पैक्षन्त हीं क्रियापदे भूतकालीन क्रिया दर्शवितात ती फार प्राचीन काळचा अथवा चालू दिवसांत घडलेली क्रिया दर्शवीत नाहींत, तर आजच्या पूर्वी घडलेली क्रिया दर्शवितात म्हणून या भूतकाळाला अनद्यतन भूतकाळ असे नाव आहे

वरील नियमाविरुद्ध संस्कृत ग्रन्थांतून प्रथमभूतकाळाचा उपयोग कोणताही भूतकाळ दर्शविण्याकरिता केला जातो ही प्रथमभूतकाळी रूपें व्यंजनारंभी धातूच्या पूर्वी ' अ ' व स्वरारंभी धातूच्या पूर्वी ' आ ' जोडून केलीं जातात

२ सर्वे पशव. सिंहस्य समीपं यथाक्रमम् अगच्छन् ।
( सगळे पशु सिंहाजवळ क्रमानुसार जात असत )
सः बाल. प्रतिदिनं कन्दुकेन अक्रीडत् ।
( तो मुलगा दररोज चेंडूनें खेळत असे )

वरील वाक्यावरून असें दिसून येईल कीं साध्या भूतकाळाच्या रूपावरून रीतिभूतकाळाचाही बोध होतो

३ अर्जुनः कृष्णं शरणं प्रत्यपद्यत ।
पौरा. वनवासार्थं प्रस्थितं रामम् अन्वसरन् ।

वरील भूतकाळाच्या रूपावरून असें दिसून येईल कीं उपसर्गसहित धातूंची प्रथमभूतकाळी रूपें तयार करताना इतर क्रियापदांप्रमाणें अ अथवा आ पूर्वी जोडून रूपें तयार करतात व नंतर त्या रूपापूर्वी संधिनियमानुसार उपसर्ग जोडतात जसे पद्—च य आ प—अपद्यत, प्रति+अपद्यत—प्रत्यपद्यत ।

## अभ्यास १

पुढील वाक्यांतील अथवा श्लोकांतील भूतकालवाचक क्रियापदाचा अर्थ स्पष्ट होईल अशा रीतीनें त्याचें भाषान्तर करा —

१ यतो जलचरान्हत्वाहारवृत्तिमकरोत्।
२ नृपस्तस्मिन्पाणे इमानि नामाक्षराण्यपश्यत्।
३ वस्तुलसमर्था लता सीताया मार्गं रामायादर्शयन्।
४ विदेहेश्वरः प्रहारवर्मा हतावशेषेण सैन्येन सह स्वपुरगमनमकरोत्।
५ देवशर्मापि वित्तनाशात्क्षुत्क्षामकण्ठो नष्टनिद्रस्तत्क्षणं चौरान्निर्गमपश्यत्।
६ गतमर्धे दिवसस्य तस्मात्स्नानभोजनं सेवितुं राजान्ति पुरं प्राविशत्।
■ चन्द्रापीड पत्रलेखामात्महृदयादव्यतिरिक्तां सर्वविश्रम्भेष्वमन्यत।
८ अत्र व्यस्तक्रन्दमानाह सह सखीजनेन न्यवसम्।
९ तत्क्षणमहमवर्णनयोग्यां कामप्यवस्थामन्वभवम्।
१० वरश्च नरशार्दूलो लोकेष्वप्रतिमो भुवि।
अतिष्ठन्मनुजेन्द्राणां मूर्ध्नि देवपतिर्यथा॥

### टीपा

१ आहारवृत्तिं कृ—खाण्याची सोय करणें
४ हतावशेष (सैन्यम्)—मारल्यानंतर शिल्लक राहिलेलें.
५ क्षुत्क्षामकण्ठ—भुकेनें ज्याची मान बारीक झाली आहे असा
(क्षुत्+क्षाम+कण्ठ)
नष्टनिद्र—ज्याची झोप नाहींशी झाली आहे तो, किंवा ज्याला झोंप येत नाहींशी
(नष्ट+निद्रा)
७ सर्वविश्रम्भेषु—विश्वासानें सांगावयाच्या सर्व गोष्टींमध्यें
९ कामपि (अवस्थाम्)—अवर्णनीय
१० देवपति—इन्द्र

## अभ्यास २

पुढील वाक्यांत प्रथम भूतकाळाचीं (कंसांत दिलेल्या धातूचीं) रूपें योजा —

१ रणाङ्गे अतिघोरं शरवर्षं ——— (प्र+सृ)।
२ हस्त मूषक जात पतित शिरम् ——— (श्रु)।
३

३ शङ्खनाद् शत्रो सैनिकाना हृदयानि ——— (वि+दॄ)।
४ रघु दिग्विजयाय महता सैन्येन सह ——— (प्र+स्था)।
५ भीष्मस्य पराजयात् अनन्तर दुर्योधन कर्णेन शकुनिना च सह
— (मन्त्र्)।
६ पुत्रस्य मृत्यो वार्तया अर्जुन ——— (वि+राद्)।
७ शल्यस्य वचन कर्णस्य हृदयस्य मर्माणि —— (कृन्त्)।
८ सर्वे सभ्या चित्रे लिखिता इव दुःशासनेन कृत द्रौपदीवस्त्रहरणम्
——— (दृश्)।
९ यम सावित्र्यै पञ्च वरान् (प्र+दा)।
१० परशुराम पितु जमदग्ने आज्ञाम् (अनु+स्था)।

## अभ्यास ३

पुढ दर्शविलेल्या पद्धतीप्रमाणे कर्तृपदवाचक, कर्मपदवाचक व क्रियापदवाचक अशा दिलेल्या शब्दावरून वाक्यें बनवा —




जसें —जम्बूक या कर्तृपदापासून पुढील वाक्य बनविता येईल




एकदैको धूर्तो जम्बूकः किमपि रुचिरं मांसखण्डं वायसादलभत ।

कर्तृपदवाचक शब्दः—कविः, रावणः, व्याघ्रः, हरिणः, याचकः.
कर्मपदवाचक शब्दः—वनम्, शरान्, पुष्पाणि, सेनाम्, जलम्.
क्रियापदवाचक शब्दः—आनयत्, अन्वभवत्, पीडयन्ति, अपश्यन्, दण्डयति.

---

## पाठ १९.

### आज्ञार्थ व आशीर्वादार्थ.

१ हे राम चतुर्दश वर्षाणि त्वं वने वस इति कैकेयी अवदत् ।
गृहं गच्छत पुस्तकानि च आनयत इति गुरुः छात्रान् आदिशत् ।
चाण्डालकन्यकाम् अन्तः प्रवेशय इति शूद्रकः राजा प्रतीहारीम् आज्ञापयत् ।

वरील तीन वाक्यांमध्यें हुकूम दर्शविणारीं क्रियापदें—**वस, गच्छत, आनयत, प्रवेशय**—हीं आज्ञार्थामध्यें योजलेलीं आहेत. हीं सर्व द्वितीयपुरुषी आहेत. खरा आज्ञार्थाचा उपयोग द्वितीय पुरुषांतच होतो.

२ वयम् अधुना क्रीडाम । अयं हि सन्ध्याकालः ।
पान्थाः मार्गे छायाम् आश्रयन्तु जलं च पिबन्तु ।
बालाः गृहं गच्छन्तु पाठान् पठन्तु च ।

वरील वाक्यांमध्यें प्रथमपुरुषी व तृतीयपुरुषी आज्ञार्थाचीं रूपें योजलेलीं आहेत. परंतु त्यांचा अर्थ आज्ञा नसून परवानगी मागणें अथवा देणें असा होतो, अथवा इच्छा प्रदर्शित करणें असाही होतो.

३ १ त्रायस्व मां नरकात् घोरात् रक्ष रक्ष परमेश्वर ।
२ भवतु सर्वेषां कल्याणम् अनुभवन्तु च सर्वे सुखम् ।

३ भज गोविन्दं भज गोविन्दं मूढमते।

४ वत्स चिरं जीव विजयी च भव।

वरील वाक्यांतील पहिल्या वाक्यांत आज्ञार्थाचा उपयोग प्रार्थना करण्याकरितां, दुसऱ्यांत शुभेच्छा प्रदर्शित करण्याकरितां, तिसऱ्यांत उपदेश करण्याकरितां व चौथ्यांत आशीर्वाद देण्याकरिता केलेला आहे.

४ इदम् आसनम् अलङ्क्रियताम्।

गम्यताम् अनेन मार्गेण।

निवेद्यताम् इयं वार्ता नृपाय।

वरील वाक्यांत आज्ञार्थाचा कर्मणि प्रयोगांत उपयोग केलेला आहे व कोणतीही गोष्ट करावयास नम्रपणें सांगण्याचा तो एक प्रकार आहे.

५ मा तपः आचर इति जननी पार्वतीम् अकथयत्।

मां मा मारय इति मूषकः सिंहं प्रार्थयत।

बालक मा रुदिहि। इयं ते माता आगच्छति।

वरील वाक्यांतील गौण वाक्यांत क्रियापदें आज्ञार्थांत योजलेली आहेत परंतु निषेधार्थक भाव दर्शविण्याकरितां 'न' हे नेहमीचें क्रियाविशेषण न योजतां 'मा' हें निषेधार्थक अव्यय योजलेलें आहे. आज्ञार्थामध्यें निषेधार्थी 'मा' हें अव्यय योजण्याचा प्रघात आहे.

## आशीर्वादार्थ.

६ कैटभः नः अपायात् पायात्।

देयात् एष च रामलक्ष्मणधनुर्ज्याघोषमन्त्रः जयम्।

वर्धिषीष्ठाः स्वराज्ये त्वं मोदिषीष्ठाः च शाश्वतम्।

वरील तीन वाक्यांमध्यें पायात्, देयात्, वर्धिषीष्ठाः व मोदिषीष्ठाः ही आशीर्वादार्थाची रूपें योजलेली आहेत. आशीर्वादार्थाबद्दल आज्ञार्थ अथवा विध्यर्थही योजण्याचा प्रघात आहे. आशीर्वादार्थाचा मुख्य उपयोग आशीर्वाद देणें किंवा इच्छा प्रकट करणें हा आहे. वरील रूपांतील पहिलीं दोन परस्मैपदी रूपें आहेत व शेवटचीं दोन आत्मनेपदी आहेत.

७ घानिषीष्ट त्वया कोपः ग्राहिषीष्ट समुन्नतिः ।
अपहृषीरन् सर्वदुःखानि ईशकृपया ।

वरील दोन वाक्यांमध्यें घानिषीष्ट ( हन् या धातूचें ), ग्राहिषीष्ट ( ग्रह् या धातूचें ) व अपहृषीरन् हें ( अप+हृ या धातूचें ) अशीं कर्मणि आशीर्वादार्थाचीं रूपें योजलेलीं आहेत, हें वाक्याच्या रचनेवरून ध्यानात येईल. हीं सर्व आत्मनेपदी प्रत्यय लावून तयार केलेलीं आहेत.

## अभ्यास १

पुढील वाक्यांतील व श्लोकांतील आज्ञार्थांचा व आशीर्वादार्थांचा उपयोग स्पष्ट होईल अशा रीतीनें अर्थ सांगा:—

१ जीवतु शतवर्षान् भवतु च तव सत्यं वचनम् ।
२ हे मातः किमन्यदाशास्महे । केवलं वीतमत्सरा भूयाः ।
३ राजानः परिपालयन्तु वसुधां धर्मे स्थिताः सर्वदा ।
४ ददतु तरवः पुष्पैरर्घ्यं फलैश्च मधुश्च्युतः ।
५ हे राजानस्त्यजत सुकविप्रेमबन्धे विरोधम् ।
६ छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ।
७ सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
८ मा कुरु धनजनयौवनगर्वं हरति निमेषात्कालः सर्वम् ।
९ स्वेदार्द्रं सततं निधाय स्वपदं मौर्व्यां स्थिरा तव ।
१० विश्वस्मै नियतं निरवधिसुखानि त्रिपुरहो
मुदं देयाद् देवो हरिरनिशं मृत्युञ्जय हरः ।

### टीपा

२ वीतमत्सरा—द्वेष न करणारी.
भूयाः—भू धातूचें आशीर्वादार्थी ( द्वि. पु. ए. व. ) रूप.
४ मधुश्च्युतः—मध गळणारे, मध ठिबकणारे ( मधु+श्च्युत्—प. ग. प. प. ठिबकणें )
५ सुकविप्रेमबन्ध—चांगल्या कवींवरील प्रेमबंध.
६ व ७ श्रीकृष्णानी अर्जुनाला केलेल्या उपदेशांतील ओळी.
१० निरवधिसुखानि—ज्या सुखांची मर्यादा नाहीं अशीं सुखें.

### अभ्यास २

(अ) पुढील धातूंचीं आज्ञार्थी रूपे योजून इच्छा दर्शविणारीं वाक्यें तयार करा —इष्, अनु+मन्, वि+श्रम्

(आ) पुढील धातूंचीं आज्ञार्थी रूपें योजून आशीर्वाद दर्शविणारीं वाक्यें तयार करा —लभ्, प्र+भू, वृध्

(इ) पुढील धातूंचीं आज्ञार्थी रूपें योजून आज्ञा दर्शविणारीं वाक्यें तयार करा —आ+गम्, युध्, दा

(ई) पुढील रूपें योजून वाक्यें बनवा —स्थेयात्। मा विरम। मा दण्डय। शृणोतु।

---

## पाठ २०.

### कर्मणि भूतकाळ व कर्मणि भूतकालवाचक धातुसाधितें.

१ रामः अध्ययनम् अकरोत्। रामेण अध्ययनम् अक्रियत-कृतम् वा।
बालः आम्रे अभक्षयत्। बालेन आम्रे अभक्ष्येताम्-भक्षिते।
भिक्षुकः धनिकं धनं अयाचत। भिक्षुकेण धनिकः धनम् अयाच्यत-याचितः वा।
रामः सीता वनम् अनयत्। रामेण सीता वनम् अनीयत-नीता वा।

वरील चार वाक्यांतील क्रियापद सकर्मक असून त्याचा भूतकाळांत उपयोग केलेला आहे. त्याचप्रमाणें त्याचा कर्मणि प्रयोग कर्तृपद तृतीयेंत योजून, कर्मपद प्रथमेंत योजून व कर्मणि त-हेचें भूतकाळी व नवीन प्रथमान्त पदाशीं जुळणारें क्रियापदाचें रूप योजून केला आहे, व त्याशिवाय कृतम्, भक्षिते, याचितः, व नीता ही कर्मणि भूतकालवाचक धातुसाधित विशेषणें उपयोगांत आणलेलीं

आहेत, व त्यांचीं रूपेंही इतर अकारान्त विशेषणांप्रमाणें प्रथमान्त नामाशीं लिंग, वचन व विभक्ति यांत जुळतीं झालीं आहेत. जसें अध्ययनम्—न. प्र. ए. व., म्हणून कृतम्—न. प्र. ए. व., सीता—स्त्री. प्र. ए. व., म्हणून गता—स्त्री. प्र. ए. व.

यावरून असें दिसून येईल कीं, कर्मणिभूतकालवाचक धातुसाधित विशेषणें सकर्मक क्रियापदांचीं योजणें असल्यास वाक्याची रचना कर्मणि प्रयोगाप्रमाणें करावी लागते व नवीन प्रथमान्त नामाप्रमाणें कर्मणिभूतकालवाचक विशेषणाचें रूप लिंग, वचन व विभक्ति यांमध्यें योजावें लागतें.

२ रामः वनम् अगच्छत्। रामः वनं गतः।
परशुरामः रामस्य पराक्रमेण अक्रुध्यत्। परशुरामः रामस्य पराक्रमेण क्रुद्धः।
पुत्रस्य विजयेन जननी अमोदत। पुत्रस्य विजयेन जननी मुदिता।
अर्जुनः रणाङ्गणे तूष्णीम् अतिष्ठत्। अर्जुनः रणाङ्गणे तूष्णीं स्थितः।

वरील वाक्यांतील क्रियापद अकर्मक आहेत म्हणून त्या क्रियापदांपासून साधिलेलीं कर्मणिभूतकालवाचक विशेषणें—गतः, क्रुद्धः, मुदिता व स्थितः—हीं कर्तरि प्रयोगाचे वाक्यांत क्रियापदांऐवजीं योजलेलीं आहेत. म्हणून अकर्मक धातूंचीं कर्मणिभूतकालवाचक धातुसाधित विशेषण उपयोगांत आणल्यास त्या वाक्याची रचना कर्तरिप्रयोगाप्रमाणें असावी व क. भू. का. धा. विशेषणाचें रूप कर्तृपदाप्रमाणें लिंग, वचन व विभक्ति समान असावें.

३ हरिः लक्ष्मीम् आश्लिष्यत्। हरिः लक्ष्मीम् आश्लिष्टः।
विष्णुः शेषम् अध्यशेत। विष्णुः शेषम् अधिशयितः।
दुष्यन्तः इन्द्रस्य अर्धासनम् अध्यतिष्ठत्। दुष्यन्तः इन्द्रस्य अर्धासनम् अधिष्ठितः।
भक्तः शिवम् उपास्त। भक्तः शिवम् उपासितः।

बाल वृक्षम् आरोहत् । बाल वृक्षम् आरूढ ।

राम पञ्चवटीम् अध्यवसत् । राम पञ्चवटीम् अध्युषित ।

वरील वाक्यातील श्लिष् हें सकर्मक क्रियापद आहे व इतर क्रियापदांना उपसर्ग जोडल्यामुळें त्यांना सकर्मकासारखा उपयोग केला आहे त्या धातूपासून झालेल्या कर्मणिभूतकालवाचक धातुसाधित विशेषणाचा उपयोग करताना कर्माण रचना न करता कर्तरि रचनाच कायम ठेवण्यात आली आहे

४ राम ग्रामम् अगच्छत् । रामेण ग्रामम् अगम्यत गतम् वा ।
खगा आकाशे उदडयन्त । खगै आकाशे उदडीयत उड्डीनम् वा ।
नर व्याघ्रात् अबिभेत् । नरेण व्याघ्रात् अभायत भीतम् वा ।
आम्र बालाय अरोचत । आम्रेण बालाय अरुच्यत रुचितम् वा ।

वरील वाक्यामधील क्रियापदें अकर्मक आहेत अकर्मक धातूच्या कर्मणि भूतकालवाचक धातुसाधित विशेषणाचा योग्य उपयोग कोणता हें वरील दुसऱ्या नियमात दर्शविण्यात आले आहे वरील वाक्यांचे भाव प्रयोगात रूपांतर कसे होतें हें प्रत्येक वाक्यापुढे दर्शविलें आहे त्याचप्रमाणें भावे प्रयोगांतील क्रियापदाऐवजी कर्मणिभूतकालवाचक धातुसाधिताचा नपुंसकलिंगी प्रथमेच्या एकवचनात उपयोग करता येतो जसें गतम्, उड्डीनम् परंतु ही तऱ्हा संस्कृत ग्रन्थातून क्वचितच आढळून येते म्हणून अकर्मक क्रियापदाच्या भूतकाल वाचक धातुसाधित विशेषणाचा उपयोग करावयाचा असल्यास तर वरील दुसऱ्या नियमात सांगितल्याप्रमाणे कर्तरि रचनाच कायम ठेवून करावा

५ भीष्मेण कृता प्रतिज्ञा दुर्योधनम् आनन्दयत् ।
सकृत् अपि पठित विष्णो नाम नर रक्षति ।
कुदालयाभ्या दर्शितेन चातुर्येण सर्वे जना व्यस्मयन्त ।
आसने उपविष्ट यति शिष्य प्रश्नम् अपृच्छत् ।

वरील वाक्यातही कृता, पठितम्, दर्शितेन, उपविष्टम् इत्यादि

## अभ्यास २

पुढील श्लोकांतील भूतकालवाचक धातुसाधितांचें प्रयोजन स्पष्ट करून अर्थ लिहा :—

१ उन्नद्धं तदलघु रघुस्वामिनः सच्चरित्रम्
क्रुद्धेनीतस्त्रिभुवनजयी हास्यमार्गं दशास्यः।

२ राज्यं येन पटान्तलग्नतृणवत् त्यक्तं गुरोराज्ञया
पाथेयं परिगृह्य कार्मुकवरं घोरं वनं प्रस्थितः।

३ कुम्भो न कूपमपि शोषयितुं समर्थः
कुम्भोद्भवेन मुनिनाम्बुधिरेव पीतः।

४ लब्धं जन्म सह श्रिया स्वयमपि त्रैलोक्यभूषाकरः
स्थित्यर्थं परमेश्वरं प्रति गतस्तेनापि मूर्ध्ना धृतः।

५ वृद्धस्तावच्चिन्तामग्नः परमे ब्रह्मणि कोऽपि न लग्नः।

६ अहं हि संमतो राज्ञो य एवं मन्यते कुधीः।
बलीवर्दः स विज्ञेयो विषाणपरिवर्जितः॥

७ दुर्योधनस्तु राजेन्द्र सैन्यमध्ये व्यवस्थितः।
कर्णदुःशासनश्रेष्ठैर्वृतो राजा महारथैः॥

८ एवं विनिहतो राजन्नेको बहुभिराहवे।
क्षोभयित्वा चमूं सर्वां नलिनीमिव कुञ्जरः॥

९ मया गुरुश्च द्रोणेन चक्रव्यूहो विनिर्मितः।
न च वस्तस्य भेत्तास्ति विना सौभद्रमर्भकम्॥

१० त्वया नाथेन गोविन्द ध्रुव एव जयो मम।
प्रभवो अस्य मेऽव्य त्वं लोके भूतभविष्यकृत्॥

### टीपा

१ अलघु—फार मोठें.
दशास्यः—रावण. (दश + आस्य) ज्याला दहा तोंडें आहेत तो.

२ रामाला उद्देशून लिहिलेला श्लोक. येन—रामेण.
पटान्तलग्नतृणकं (राज्यम्)—वस्त्राच्या आंचल्यात अडकलेल्या गवताच्या काडी-प्रमाणें (तुच्छ) भासणारें.
(पट + अन्त + लग्न + तृण) 'क' प्रत्यय 'सारखा' या अर्थी लावला.

७ त्रैलोक्यभूषणः—तीन्ही लोकांना शोभा आणणारा.
८ एव.—अभिमन्यूला उद्देशून.
९ अभिमन्युवधानंतर अर्जुनानें भावाला उद्देशून म्हटलेला शोक.
१० अर्जुनानें कृष्णाला उद्देशून म्हटलेला शोक.

---

# पाठ २१.

## ल्यबन्त व णमुल् अव्ययें.

### ल्यबन्त अव्ययें ( पूर्वकालवाचक धातुसाधित अव्ययें ).

१ ( प्रथमं ) बालः गृहं गच्छति ( पश्चात् ) क्रीडति च।
बालः गृहं गत्वा क्रीडति।

( „ ) शिष्यः कमलम् आनयत् ( पश्चात् ) मुनये च अयच्छत्।
शिष्यः कमलम् आनीय मुनये अयच्छत्।

( „ ) वायसः मयूरस्य पिच्छानि गृह्णाति ( पश्चात् ) स्वशरीरे च धारयति।
वायसः मयूरस्य पिच्छानि गृहीत्वा स्वशरीरे धारयति।

( „ ) त्वं गुरुं नम ( पश्चात् ) पठनम् आरभस्व च।
त्वं गुरुं नत्वा पठनम् आरभस्व।

( „ ) बालाः गृहं गच्छेयुः ( पश्चात् ) क्रीडेयुः च।
बालाः गृहं गत्वा क्रीडेयुः।

वरील वाक्यें दोन प्रकारांनीं लिहिलेलीं आहेत पहिल्या वाक्यांत दोन क्रियापदें आहेत व त्यांच्या रूपान्तरामध्यें पहिल्या क्रियापदाबद्दल त्वान्ताचा उपयोग करून एकच मुख्य क्रियापद ठेविलें आहे. पहिल्या वाक्यांतील पूर्व

झालेल्या क्रियांबद्दल ल्यबन्ताचा उपयोग केलेला आहे व शेवटील क्रिया क्रियापदानेच दर्शविलेली आहे. शिवाय प्रत्येक वाक्यातील दोन्ही क्रियांचा कर्ता एकच आहे. म्हणून ज्या वेळेस एका वाक्यामध्यें एकाहून अधिक क्रिया एका कर्त्याशीं जोडलेल्या असतात त्या वेळी शेवटच्या क्रियेपेक्षां पूर्वीच्या पुऱ्या झालेल्या क्रियांबद्दल ल्यबन्तें योजून शेवटच्या क्रियेबद्दल क्रियापद अथवा कर्मणि भूतकालवाचक धातुसाधित योजतात. शिवाय असें दिसून येईल की क्रियापदें कोणत्याही काळाचीं अथवा अर्थाचीं असलीं तरी ल्यबन्ताचा उपयोग करता येतो.

२ गोपालः अध्ययनं करोति रामः च क्रीडति ।

गोपाल. मार्गेण चलति श्लोकं च पठति ।

वरील दोन्ही वाक्यामध्यें ल्यबन्ताचा उपयोग करता येणार नाहीं. कारण पहिल्या वाक्यात दोन्ही क्रियांचे कर्ते भिन्न आहेत व दुसऱ्यात दोन्ही क्रियांचा कर्ता जरी एकच आहे, तरी त्या दोन्ही क्रिया एकाच वेळीं चालू आहेत. पहिली पूर्ण झाल्यावर दुसरी चालू राहाते असें नाहीं.

३ पितरौ प्रणम्य बाल. गुरुगृहं प्रस्थित. ।

विश्रान्तिसुखम् अनुभूय पान्थ. मार्गम् आक्रामत् ।

शत्रुं विजित्य नृप. राजधानीं न्यवर्तत ।

वरील वाक्यामध्ये प्रणम्य, अनुभूय व विजित्य हीं ल्यबन्तें योजलेलीं आहेत. मात्र धातूला उपसर्ग जोडला असल्यामुळे त्या बद्दल य हा प्रत्यय जोडलेला आहे. असें प्र+नम्+य. अनु+भू+य. परंतु धातु ह्रस्वस्वरान्त असल्यास य बद्दल त्य असा प्रत्यय जोडलेला आहे. असें वि+जि+त्य.

## णमुल् अव्ययें (अम् प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययें).

१ भक्तः स्मारं स्मारं विष्णुं नमति ।

रिपो. आगमनं श्रावं श्रावं नृपः सैन्येन सह प्रस्थित. ।

सुरा पायं पायं नर. रोगग्रस्त. भवति ।

वरील वाक्यातील स्मार स्मारम्, श्राव श्रावम्, पाय पायम् हीं अम्-प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययें क्रिया पुन्हा पुन्हा करणें हें दर्शविण्याकरितां

दोन वेळा उपयोगात आणिलेली आहेत याचा उपयोग फार क्वचितच केलेला दिसून येतो. याचा अर्थ ल्यबन्त अव्ययासारखाच होतो

५ माता पुत्रं नामग्राहं ( नाम गृहीत्वा ) आह्वयति ।

सः चोरः यष्टिघातं ( यष्टिभिः हत्वा ) हतः ।

राक्षसाः विप्रवेदं जघ्नुः ( यावतः विप्रान् ते अविदुः तावतः )।

वरील वाक्यामध्यें 'अम्' प्रत्ययान्त णमुल् अव्ययें कर्मवाचक अथवा साधनवाचक शब्दाशीं जोडून उपयोगात आणलेली आहेत जसें-'ग्राहम्' हे रूप 'नाम' या कर्मवाचक पदाशी जोडून लिहिलेलें आहे याचप्रमाणें 'आ+दिश्' याचेंही 'आदेशम्' हें रूप 'नाम' या कर्मपदाशीं जोडून लिहितात जसें-नामादेशम्। 'ग्राहम्' हे रूपही केश, हस्त इत्यादि शब्दाशीं निकट संबंध दर्शवितांना योजतात, जसें केशग्राहं-हस्तग्राहं युध्यन्ते सैनिकाः ।

'घातम्' व 'हतः' अशी एकाच धातूचीं दोन रूपें एकच अर्थ दर्शविण्या करितां योजलेली आहेत. तसेंच 'पेषम्' हें 'पिष्' धातूचें रूपही चूर्ण, शुष्क इत्यादि शब्दांना जोडून योजतात, चूर्णपेषं पिनष्टि ।

'वेदम्' हें विद् धातूचें अम्-प्रत्ययान्त रूप 'विप्र' या कर्मपदाला जोडून लिहिलेलें आहे त्याचा अर्थ जेवढे विप्र माहीत आहेत त्या सर्वांना असा होतो त्याचप्रमाणें दृश् या धातूचें 'दर्शम्' हे रूपही ज्या नामाला जोडून लिहितात त्या नामानें दर्शविलेल्या सर्व वस्तु पाहून असा अर्थ होतो जसें-कन्यादर्शम् जेवढ्या मुली पाहिल्या तेवढ्या सर्व

## अभ्यास १

पुढील श्लोकांतील ल्यबन्त अथवा णमुल् पदाची उपयुक्तता दाखवून अर्थ करा —

१ छिद्रं निरूप्य सहसा प्रविशत्यगाढं

सर्वं खलस्य चरितं मशकः करोति ।

२ कोऽर्थान्प्राप्य न गर्वितो विषयिणः कस्यापदोऽस्तं गताः

स्त्रीभिः कस्य न खण्डितं भुवि मनः को नाम राज्ञां प्रियः ।

६ गजान् ———— वीरा योद्धुं प्रारभन्त ।
७ परिणाम ———— एव. प्राज्ञेन कोऽपि यत्नः कार्यः ।
८ शिखण्डिनं ———— अर्जुनेन भीष्मे शराः मुक्ताः ।
९ सेनापतिना सैनिकाः काम ———— आहूताः ।
१० पाण्डवस्य शरीरं ———— अपिनद् भीमसेनः ।

---

## पाठ २२.

### हेत्वर्थक तुमन्त अव्ययें.

१ बालाः क्रीडाङ्गणं प्रतिदिनं गच्छन्ति । क्रीडा तेषां हेतुः ।
बालाः क्रीडाङ्गणं क्रीडितुं गच्छन्ति ।
पान्थः तडागं प्रति गच्छति । जलपानं तस्य हेतुः ।
पान्थः जलं पातुं तडागं प्रति गच्छति ।
वानराः समुद्रस्य उपरि सेतुम् अबध्नन् ।
लङ्कां प्रति गमनं तेषां हेतुः ।
वानराः समुद्रस्य उपरि सेतुम् अबध्नन् लङ्कां गन्तुम् ।

वरील तीनही वाक्यांच्या रूपान्तरामध्यें 'क्रीडा तेषां हेतुः' याबद्दल 'क्रीडितुम्' हें तुमन्त रूप, 'जलपानं तस्य हेतुः' याबद्दल 'पातुम्' हे तुमन्त रूप व 'लङ्का प्रति गमनं तेषां हेतुः' याबद्दल 'गन्तुम्' हे तुमन्त रूप योजलेलें आहे. अर्थात् हीं तुमन्त रूपें हेतु दर्शवितात म्हणून यांस हेत्वर्थक तुमन्त धातुसाधित अव्यय म्हणतात.

तुमन्त अव्ययाऐवजी त्याच धातूपासून झालेलें नाम चतुर्थीत योजलें तरी तोच अर्थ होतो. जसें—क्रीडितुम् याबद्दल क्रीडायै, जल पातुम् याबद्दल जलपानाय, गन्तुम् याबद्दल गमनाय असें म्हणता येईल. यावरून असें दिसून येईल कीं तुमन्ताचा उपयोग सामान्यतः कर्तृपद अथवा कर्मपद म्हणून करतां येणार नाहीं.

२ दमयन्ती नलं भर्तारं प्राप्तुम् ऐच्छत् ।
श्रीकृष्णः कंसेन सह योद्धुम् अशक्नोत् समर्थः वा ।

वाल्मीकिना आदिष्टौ कुशलवौ रामायणं गातुम् आरभेताम् ।
एतां दु:खपूर्णां वार्तां कथयितुम् अहं न उत्सहे ।
कन्दुकेन क्रीडितुं बाला: जानन्ति ।
भवान् मम साहाय्यं कर्तुम् अर्हति ।

वरील वाक्यांवरून असे दिसून येईल या इच्छिणें, समर्थ करणे, आरंभ करणे, सहन करणें, जाणणें व योग्यता असणें अशा अर्थाच्या क्रियापदांबरोबर तुमन्ताचा कर्मपदासारखा उपयोग करता येतो.

२ (अ) अयम् एव कालः नृपम् उपस्थातुम् ।
(आ) एतानि पुस्तकानि वाचयितुं सन्ति ।
(इ) दैवम् अन्यथा कर्तुं विद्वान् अपि न समर्थः ।
(ई) श्लोकं पातुं प्रवीण: निपुण: वा कुमार ।

वरील वाक्यांत 'अ' मध्यें कालवाचक शब्दाबरोबर तुमन्ताचा उपयोग केलेला आढळतो, 'आ' मध्यें अस्–विद्–वृत् म्हणजे असणें या क्रियापदाबरोबर ज्याकरिता वस्तु असतात तें दर्शविण्याकरिता तुमन्ताचा उपयोग केलेला आढळतो, 'इ' मध्यें समर्थ, योग्य इत्यादि विशेषणाबरोबर—ज्या क्रियेकरता सामर्थ्य, योग्यता वगैरे दर्शविणें असेल—त्या धातूच्या तुमन्ताचा उपयोग केलेला दिसतो, व 'ई' मध्यें प्रवीण, निपुण इत्यादि विशेषणाचा उपयोग ज्या क्रियेमध्यें नैपुण्य दाखवावयाचें असेल त्या क्रियेच्या तुमन्त रूपाबरोबर केलेला दिसतो.

वरील सर्व विवेचनावरून हें लक्षांत येईल की तुमन्त अव्यय हें त्याच अर्थाच्या धातुसाधित नामाच्या चतुर्थीच्या रूपासारखें आहे. फक्त वर '१' मध्यें तुमन्ताचा उपयोग कर्मपदासारखा केलेला दिसतो. सामान्यपणें तुमन्ताचा कर्तृपद अथवा कर्मपद असा उपयोग करता येत नाहीं. म्हणून पुढील वाक्यांत दर्शविल्याप्रमाणे तुमन्तरूप कर्तृपद अथवा कर्मपद म्हणून न वापरतां त्याच धातूपासून झालेलें भाव वाचक नाम कर्तृपद अथवा कर्मपद म्हणून योजावें. जसें—रामाला गाणें आवडतें–रामाय गानं (गातुम् नव्हे) रोचते । आईबापाची आज्ञा पाळणें हें मुलाचें कर्तव्य आहे–पित्रो: आज्ञापालनम् (आज्ञां पालयितुम् नव्हे) पुत्रस्य धर्मः भवति । राजानें दूताचें बोलणें ऐकिलें–नृप: दूतस्य वचनं (वक्तुम् नव्हे) अशृणोत् ।

## अभ्यास १

पुढील वाक्यांतील अथवा श्लोकांतील तुमन्त अव्ययानें प्रयोजन स्पष्ट करून अर्थ सांगा:—

१ अर्हति भवानागन्तुं. वत्साहं निर्गन्तुमित्युक्तं मार्जारिकाभ्यां वानरं प्रति ।

२ अत्तुं वाञ्छति शाम्भवो गणपतेराखुं क्षुधार्तः फणी ।

३ दग्धुं विश्वं दहनकिरणैर्नोदिता द्वादशार्काः ।

४ अथवा मृदु वस्तु हिंसितुं मृदुनैवारभते प्रजान्तकः ।

५ तदपोहितुमर्हसि प्रिये प्रतिबोधेन विषादमाशु मे ।

६ कुम्भो न तृणमपि शोषयितुं समर्थः ।

७ न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।

८ द्वाःस्थं प्राह महाप्राज्ञो धृतराष्ट्रो महीपतिः ।
विदुरं द्रष्टुमिच्छामि तमिहानय मा चिरम् ॥

९ शब्दादीन् विषयान् भोक्तुं चरितुं दुश्चरं तपः ।
पर्याप्तोऽसि प्रजाः पातुमौदासीन्येन वर्तितुम् ॥

१० रामः कुशं निरूप्य चिन्तयति:—
भ्रातुः लोकानिव परिवृतः कायवानथर्ववेदः
क्षात्रो धर्मः श्रित इव तनुं ब्रह्मकोशस्य गुप्त्यै ।

### टीपा

३ दहनकिरणाः—आगीसारखे अथवा पेटणारे किरण.

५ अज राजानें मृत राणी इन्दुमती हिला उद्देशून म्हटलेला श्लोकार्ध.

७ श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात.

१० कायवान्—देह धारण करणारा.
ब्रह्मकोषः—वेदरूपी खजिना.

## अभ्यास २

पुढील वाक्यांत हेत्वर्थक तुमन्त रूपें घालून तीं पुरीं करा:—

१ हे बाल अयम् एव समयः अध्येतुं न तु ——— ।

२ स्वर्णं नरम् अकामं ——— मित्राणि आगच्छन्ति ।

३ अभियुक्तेन अपि नरेण दैवम् अन्यथा ——— न शक्यते ।
४ बालम् अभिमन्युं ——— सर्वेऽपि पाण्डववीराः न समर्थाः ।
५ युधिष्ठिरः असत्यं ——— न ऐच्छत् ।
६ मूर्खः वज्रमणीन् शिरीषकुसुमप्रान्तेन ——— सन्नह्यते ।
७ ,, क्षाराम्बुधेः माधुर्यं मधुबिन्दुना ——— ईहते ।
८ शकुनेः साहाय्येन अहं पाण्डवानां श्रियम् ——— उत्सहे इति दुर्योधनः धृतराष्ट्राय अकथयत् ।
९ एकं च वासो मम मन्दबुद्धे सभां — नार्हसि मामनार्य ।
१० न धर्मसौक्ष्म्यात् सुभगे शक्नोमि ते प्रश्नमिमं यथावत् ।

### टीपा

६ शिरीषकुसुमप्रान्तः—शिरीष फुलाच्या पाकळीची धार किंवा कडा.
वज्रमणिः—हिरा.

१० द्रौपदीला उद्देशून भीष्माचार्यांनी म्हटलेलें वाक्य.

---

## पाठ २३.

### अव्ययें.

१. अश्वः शीघ्रं धावति । वृद्धः नरः शनैः शनैः चलति ।
बालः श्लोकान् सुष्ठु पठति । माता बालके भृशं स्निह्यति ।

वरील वाक्यांवरून असें दिसून येईल कीं क्रिया कशी घडते हें दर्शविणारीं **शीघ्रम्**, **शनैः शनैः**, **सुष्ठु** व **भृशम्** यासारखीं क्रियाविशेषण अव्ययें वाक्य तितकीं क्रियापदाजवळ योजतात. त्यांचें नेहमीं एकच ठरीव रूप असतें. अशा तऱ्हेचीं कांहीं अव्ययें पुढें दिलीं आहेत.

इत्थम्—एवम्—अशा प्रकारें; वृथा—व्यर्थ; अतीव—अतिशय; अनेकशः—बहुशः—पुष्कळ वेळां; केवलम्—केवळ; दूरम्—फार दूर; दृढम्—घट्ट; बाढम्—बरें; अवश्यम्—अवश्य; मृषा—खोटेपणानें; उच्चैः—वर, वरती, गंभीरपणानें, मोठ्यानें; नीचैः—

त्वरा, द्रुतम्–जलदीनें, अकस्मात्–इत्यकस्मात, सत्वरम्–जलद, नित्यम्–नेहमीं, पुनर्–पुन्हा, प्राय –प्रायेण–बहुधा, सर्वथा–सर्व प्रकारें, निर्भरम्–भृशम्–अतिशय, हठात्–बलात्–जोरानें, मिथ –एकत्र, स्वयम्–स्वत .

वरील अव्ययामध्यें दूरम् , दृढम् , सत्वरम् वगैरे अव्यर्थे मूळचा विशेषण असून त्यांची द्वितीयेचें एकवचनाची रुपे अव्ययाप्रमाणें योजलेली आहेत,

२ अहम् अधुना पाठं पठामि । ह्यः रामः मम गृहम् आगत. । पुरा कालिदासः नाम कविः अभवत् । मुनि. अरण्ये चिरं वसति । अत्र प्रभवति भागीरथी । विद्वान् सर्वत्र पूज्यते ।

वरील वाक्यात अधुना, ह्यः, पुरा व चिरम् हीं कालवाचक क्रियाविशेषण अव्ययें व अत्र, सर्वत्र हीं स्थलवाचक क्रियाविशेषण अव्ययें उपयोगात आणलेली आहेत ती वाक्याच्या आरभी किंवा वाक्यात क्रियापदाच्या जवळ योजण्याचा प्रघात आहे काही कालवाचक अव्ययें पुढे दिली आहेत

अद्य–आज, श्व –उद्या, प्रातर्–सकाळी, सायम्–सध्याकाळीं, दिवा–दिवसा, नक्तम्–रात्री, तदा–त्या वेळीं, तावत्–तोंपर्यंत, इदानीम्–हल्ली, तदानीम्–त्या वेळा, अन्येद्यु –अपरेद्यु –दुसरे दिवशीं, सदा–सर्वदा–सदोदीत, पूर्वेद्यु –पूर्वीच्या दिवशीं, अन्तरान्तरे–मध्यतरी

कांही स्थलवाचक क्रियाविशेषण अव्ययें—इह–या ठिकाणीं, अमुत्र–परलोकात, तत्र–तेथें

३ कुत्र वर्तते महर्षिः । क्व गता शकुन्तला ।
कदा निवर्तते कण्वः । कथं भवति शकुन्तलाप्राप्तिः ।

वरील वाक्यामध्यें कुत्र, क्व, कदा, कथम् हीं प्रश्नार्थक क्रियाविशेषणें योजलेली आहेत ती बहुधा वाक्याच्या आरभीं योजतात

■ रामः एव शिवचतुर्भङ्गं कर्तुं समर्थः । रामच शकराचे ......
अहं गच्छामि एव मित्रगृहम् अधुना । मी ... आतांच
अद्य एव त्वं पाठशालां गच्छ । आजच तू, .. ...

वरील वाक्यावरून हें लक्षात येईल कीं एव या अव्ययाचा उपयोग

करावयाचा झाल्यास ज्या शब्दावर जोर द्यावयाचा असेल त्याच्यापुढें 'एव' चा उपयोग करतात

५ सः बालः सर्वदा सस्मितं वदति ।
कन्या पितृगृहं सानन्दं गच्छति ।
बालः गुरुषु सविनयं व्यवहरति ।

वरील वाक्यात **सस्मितं** ( स्मितेन सह ), **सानन्द** ( आनन्देन सह ) व **सविनयं** ( विनयेन सह ) हे सहबहुव्रीहि समास अव्ययाप्रमाणें योजलेले आहेत व त्यांची द्वितीया एकवचनाची रूपें अव्ययाप्रमाणें योजलेलीं आहेत संस्कृतमध्यें सहबहुव्रीहि समास अव्ययाप्रमाणें योजण्याचा प्रघात आहे

## अभ्यास १

*पुढील वाक्यांतील व श्लोकांतील अव्ययांचा अर्थ स्पष्ट होईल अशा रीतीनें भाषान्तर करा —*

१ विपत्काले विस्मय एव कापुरुषलक्षणम् । तदत्र धैर्यमवलम्ब्य प्रतीकारश्चिन्त्यताम् ।
२ अधुना च पुण्यपरम्परया भवदाश्रय स्वयं एव मया प्राप्त ।
३ तालिका पश्चाच्चिरादिवागत्य तथावस्थिता महाश्वेता शनैरपादात् ।
४ प्रायो गच्छति यत्र भाग्यरहितस्तत्रैव यान्त्यापद ।
५ एक एव सुहृद्धर्मो निधनेऽप्यनुयाति य ।
शरीरेण समं नाशं सर्वमन्यत्तु गच्छति ॥
६ इदानीं लोकेऽस्मिन्नुपमशिखाना पुनरय
नखाना पाण्डित्य प्रकटयतु कस्मिन्मृगपति ।
७ कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभि प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥
८ कस्यात्यन्त सुखमुपनत दु खमेकान्ततो वा
नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ।
९ अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा
न्याय्यात्पथ प्रविचलन्ति पद न धीरा ।

१० वृथा वृष्टिः समुद्रेषु वृथा तृप्तस्य भोजनम् ।
वृथा दानं समर्थस्य वृथा दीपो दिवापि च ॥

## टीपा

१ कापुरुषलक्षणम्—क्षुद्र मनुष्याची खूण.

२ अभार्षीत्—भृ धातूचें लुङ्भूतकाळी तृ. पु. ए. व

६ अनुपमाकृतयः. (गजाः)—ज्यांच्या देहाच्या आकृतीला उपमा नाहीं असे ( हत्ती ).

७ प्रतियोत्स्यामि ( द्वितीय भविष्यकाळ प्र. पु. ए. व )—उलट लढेन. युध् हा आत्मनेपदी धातु या ठिकाणीं परस्मैपदी म्हणून योजलेला आहे तो अपवाद समजावा.
अहम्—अर्जुनाबद्दल.

८ चक्रनेमिक्रमः—चाकाच्या धावेचा क्रम.

## अभ्यास २

(अ) पुढील वाक्यांत योग्य तीं अव्ययें योजा —

१ हे सारथे अश्वाः ——— धावन्ति । रश्मीन् संयच्छ ।

२ शशकः चिन्तयति । अद्य मां सिंह ——— मारयति ।
अतः ——— गच्छामि अहं तस्य समीपम् ।

३ हे दुर्योधन पाण्डवान् हन्तुं त्वं ——— यतसे ।

४ चिरात् दृष्टं पुत्रं जननी ——— पर्यष्वजत् ।

५ ——— अहं सुखेन आयामि ——— च शान्तिं लभे इति नरः ज्ञातुम् इच्छति ।

(आ) पुढील अव्ययें संस्कृत वाक्यांत योजा —
नित्यम्, मिथः, वारम्, अन्येद्युः, स्वयम् ।

# पाठ २४.

## अव्ययें.

( शब्दांच्या विशिष्ट विभक्तींबरोबर येणारीं )

१ धिक् इमां मदीयां बुद्धिम्। धिक् संसारस्य असारताम्।
कृष्णं सर्वतः गोपाः तिष्ठन्ति।
सूत्रधारम् उभयतः नटौ तिष्ठतः।
ग्रामं समया-निकषा वा उद्यानं वर्तते।
रामम् अन्तरेण अयोध्या शून्या अदृश्यत।
प्रयोगम् अन्तरेण पश्चात् सर्वं कथयामि।
अपराधं विना-अपराधेन विना-अपराधात् विना जनकः
पुत्रं न ताडयति।
रामः लङ्कायाः अयोध्यां प्रति निवृत्तः।

वरील वाक्यांवरून असें दिसून येईल कीं, **धिक्**-धिक्कार असो, **सर्वतः**-सर्व बाजूंना, **उभयतः**-दोन्ही बाजूंना, **समया-निकषा**-जवळ, **अन्तरेण**-शिवाय किंवा संबंधी, **प्रति**-कडे या अव्ययाचा ज्या शब्दाशीं संबंध असेल त्या शब्दाची द्वितीया योजून याचा उपयोग करतात. **विना**-शिवाय या अव्ययाचा उपयोग ज्या शब्दाशीं संबंध असेल त्याची द्वितीया, तृतीया अथवा पंचमी योजून करतात.

२ बाल रोदनेन अलम् अथवा अलं रुदित्वा।
मित्र क्रोधेन अलं कृतं वा।
रामेण सह लक्ष्मणः वनं प्रस्थितः।
जनकेन सार्धम्-समम्-साकम् वा पुनः प्रतिदिनं
समुद्रतीरं गच्छति।

वरील वाक्यावरून असें दिसून येईल कीं अलम्-कृतम् म्हणजे पुरे या

अव्ययाचा उपयोग जी क्रिया करावयाची ती क्रिया दर्शविणाऱ्या नामाच्या तृतीयेबरोबर केला जातो अथवा ती क्रिया दर्शविणाऱ्या धातूच्या त्वन्ताबरोबर केला जातो. त्याचप्रमाणे 'सह, साकम्, सार्धम् व समम्' म्हणजे 'बरोबर' या अव्ययाचा उपयोग ज्याच्याबरोबर क्रिया करावयाची त्याची तृतीया विभक्ति योजून करतात.

३ श्रीगणेशाय नमः । विष्णवे नमः । गुरुभ्यः नमः ।
मित्राय स्वस्ति । अग्नये स्वाहा । पितृभ्यः स्वधा ।

नमः–नमस्कार असो, स्वस्ति–कल्याण असो, स्वाहा–देवांना आहुति देताना म्हणावयाचा शब्द व स्वधा–पितरादिकांना अर्घ्य देताना म्हणावयाचा शब्द हे चतुर्थ्यन्त नामाबरोबर योजतात.

४ विष्णुः दैत्येभ्यः अलम् । कृष्णः अर्जुनस्य रक्षणाय अलम् ।
प्रजाः त्रातुम् नृपः अलम् ।

वरील वाक्यावरून असे दिसून येईल की अलम् याचा अर्थ जेव्हा 'समर्थ असणे, बरोबरीचा असणे' असा असतो तेव्हा त्याचा उपयोग चतुर्थ्यन्त नामाबरोबर अथवा तुमन्त अव्ययाबरोबर केला जातो.

५ उद्यानात् बहिः वापी वर्तते ।
आगमनात् प्रभृति–आरभ्य बालः चिन्ताकुलः दृश्यते ।
विवाहात् अनन्तरं, परं, ऊर्ध्वं वा स्त्री पतिम् अनुसरति ।
प्रयोजनात् ऋते मन्दः अपि न प्रवर्तते ।

बहिः–बाहेर, प्रभृति-आरभ्य–पासून, अनन्तरं-परं-ऊर्ध्वम्–नंतर व ऋते–शिवाय या अव्ययांचा उपयोग पंचम्यन्त नामाबरोबर करतात.

६ वृक्षस्य उपरि फलानि दृश्यन्ते ।
,, अधः–अधस्तात् पर्णानि पतन्ति ।
प्राणानां कृते शूरः रणाङ्गणात् न पलायते ।
जनकस्य पश्चात् पुत्रः सिंहासनम् आरोहति ।
प्रासादस्य पुरतः उद्यानं वर्तते ।

शालागृहस्य पश्चिमतः क्रीडाङ्गणं वर्तते।
देवालयस्य समीपे-समीपं वा वटवृक्षः दृश्यते।

उपरि-वर, अधः अधस्तात्-खाली, कृते-करिता, पश्चात्-नंतर, पुरतः-पुढें, पश्चिमतः-मागें, पश्चिमेकडे, समीपे समीपम्-जवळ, या अव्ययाचा उपयोग षष्ठ्यन्त नामाबरोबर करतात

७ ग्रामात्-ग्रामस्य वा दूरम्-अन्तिकम् वा महारण्यं वर्तते।

दूर व अन्तिक ( जवळ ) याचा उपयोग पञ्चम्यन्त अथवा षष्ठ्यन्त नामाबरोबर करतात

## अभ्यास १

पुढील वाक्यांतील व श्लोकांतील शब्दयोगी अव्ययाचा उपयोग स्पष्ट होईल अशा रीतीनें त्यांचा अर्थ करा —

१ अलमनेन प्रश्रयेण। न निष्प्रयोजनमधिकारवन्तः प्रभुभिराहूयन्ते।
२ धिगस्मान्सर्वान् ये वयमेकाकिना बहुना सह युध्यामहे।
३ शैशवात् प्रभृति पोषिता प्रिया कथमह मृत्यवे ददाम्।
४ आरब्धयज्ञानां यतीनां रक्षणायालं रामः।
५ मार्मिकः को मरन्दानामन्तरेण मधुव्रतम्।
६ स्वस्त्यस्तु ते निर्गलिताम्बुगर्भं शरद्घनं नार्दति चातकोऽपि।
७ साहं तपः सूर्यनिविष्टदृष्टिरूर्ध्वं प्रसूतेश्चरितुं यतिष्ये।
८ कियन्तस्ते सन्तः सुकृतपरिपाकप्रणयिनः
विना स्वार्थं येषां भवति परकृत्यव्यसनिता।
९ कल्पान्तेष्वपि न प्रयाति निधनं विद्याख्यमन्तर्धनम्
येषां तान्प्रति मानमुज्झत नृपाः कस्तैः सह स्पर्धते।
१० साकं ग्रावगणैर्लुठन्ति मणयस्तीरेऽर्कबिम्बोपमा
नीरे नीरचरैः समं स भगवान्निद्राति नारायणः।

### टीपा

१ चाणक्यानें चन्द्रगुप्ताला उद्देशून म्हटलेलें वाक्य
२ श्रीरामानी सीतेचा त्याग करताना म्हटलेलें वाक्य

६ यक्षानें मेघाला उद्देशून म्हटलेला श्लोकार्ध.
निर्गलिताम्बुगर्भः ( घन: )—ज्याच्या पोटांतील पाणी गळून गेलें आहे तो
( निर्गलित + अम्बु + गर्भ )

७ लक्ष्मणानें सीतेला अरण्यांत सोडल्यानंतर त्याच्याबरोबर सीतेनें पाठविलेल्या निरोपांतील एक वाक्य.

८ शुभपरिपाकधन्यायिन:—आपल्या चांगल्या कृत्याच्या परिणामाची इच्छा धरणारे किंवा परिणामाचा आनंद मानणारे
परकृत्यव्यसनिता—दुसऱ्याचें कार्य पार पाडण्याचें व्यसन असण्याचा गुण.

९ अन्तर्धनम्—शरीरांत राहाणारें द्रव्य

१० क्षीरसागराचें वर्णन—अर्कबिम्बोपमा—सूर्यबिम्बाप्रमाणें दिसणारे.
( अर्क + बिम्ब + उपमा )

## अभ्यास २

पुढील वाक्यांत योग्य तीं शब्दयोगी अव्ययें योजा —

१ यदा धृष्टद्युम्नेन केशेषु गृहीत्वा द्रोण: हत: तदा अश्वत्थामा वदति । ——— ममास्त्राणि ——— बाहू ——— पराक्रमम् इति ।

२ दुर्गं ——— शत्रु: स्वसैनिकान् अस्थापयत् ।

३ साहस ——— श्रिय: लाभ: अशक्य: यत: साहसे श्री: प्रतिवसति इति उच्यते ।

४ ——— रुदित्वा—रोदनेन वा । इयम् अहम् आगता । इति जननी पुनश्चैव कथयति ।

५ ग्रामात् ——— विस्तीर्णा वृक्षवाटिका वर्तते ।

६ दिग्विजयात् ——— राजधानीं न्यवर्तत नृप: रघु: ।

७ शौर्यात् ——— राक्षसा न कदापि व्यवहरन्ति ।

८ आश्विनप्रतिपद: ——— नवरात्रोत्सव: क्रियते ।

९ देवालयस्य ——— दीपस्तम्भो वर्तते ।

१० रे बाल त्वं श्रान्त: असि । एष परिश्रम: तव उत्कर्षाय ——— ।

---

# पाठ २५.

## अव्ययें ( दोन वाक्यें अथवा शब्द जोडणारीं ).

च व वा याचा उपयोग पूर्वीं स्पष्ट केला आहे पाठ ५-नियम ६

१ रामः वने इतस्ततः अभ्रमत् किन्तु-परं-परन्तु सीता न अपश्यत् ।

रामः वने इतस्ततः अभ्रमत् सीता तु न अपश्यत् ।

**किन्तु, परं** अथवा **परन्तु** या उभयान्वयी अव्ययाचा उपयोग विरोधात्मक वाक्यामध्ये करतात परंतु त्याच अर्थी **तु** या अव्ययाचा उपयोग वर दुसऱ्या वाक्यात दर्शविल्याप्रमाणे दोन्ही वाक्यामध्ये न करता दुसऱ्या विरोधी वाक्यात पहिल्या शब्दानंतर करतात

२ नरः धनं लभते यतः सः उद्योगं करोति ।

नरः उद्योगं करोति अतः सः धनं लभते ।

परंतु

नरः धनं लभते सः हि उद्योगं करोति ।

कार्यकारणभाव दर्शविणा या दोन वाक्यामध्ये **यतः** किंवा **अतः** ही अव्यय योजतात **यतः** हें कारणवाचक वाक्याच्या आरंभीं येतें व **अतः** हें कारणवाचक वाक्यानंतर येते परंतु त्याच अर्थाचें **हि** हें अव्यय मात्र कारणवाचक वाक्याच्या आरंभा न येता त्या वाक्यात कोठें तरी येतें.

३ त्वम् अधुना गृहं गच्छ इति गुरुः शिष्यम् अवदत् ।

मूषकः सिंहं प्रार्थयत महाराज मा मा जहि इति ।

दोघांही बोलतान म्हटलेले शब्द जसेच्या तसेच दर्शविणें झाल्यास त्या उच्चारलेल्या शब्दानंतर **इति** या अव्ययाचा उपयोग करतात

४ यदा रामः गृहं निवर्तते तदा त्वं बहिः गच्छ ।

यदि रामः अधुना गृहं निवर्तते तर्हि त्वं बहिः गच्छ ।

**यावत् रामः गृहं निवर्तते तावत् त्वं बहिः गच्छ ।**
**यथा जनाः त्वां न उपहसन्ति तथा त्वं व्यवहर ।**
**यत्र यत्र निर्धनः गच्छति तत्र तत्र उपहासास्पदं भवति जनानाम् ।**

**यदा-तदा** (जेव्हा तेव्हा), **यदि तर्हि** (जरतर), **यावत् तावत्** (जोपर्यंत-तोपर्यंत), **यथा-तथा** (जसें-तसें), **यत्र यत्र तत्र तत्र** (जेथें जेथें तेथें तेथें) या अव्ययांचा उपयोग एकमेकांवर अवलंबून असणाऱ्या दोन वाक्यांबरोबर करतात. गौण वाक्याबरोबर अर्थानुरूप यदा, यदि, यावत्, यथा, यत्र यत्र हीं योजतात व मुख्य वाक्याबरोबर त्यांच्या जोडीचीं तदा, तर्हि, तावत्, तथा, तत्र तत्र यांचा उपयोग करतात

## अभ्यास १

पुढील श्लोकांचा अर्थ सांगून त्यांतील उभयान्वयी अव्ययांचा उपयोग स्पष्ट करा —

१ यथा ह्येकेन चक्रेण न रथस्य गतिर्भवेत् ।
तथा पुरुषकारेण विना दैवं न सिध्यति ॥

२ यावत्प्रतापनिधिराक्रमते न भानु-
रह्नाय तावदरुणेन तमो निरस्तम् ।

३ सहतास्तु हरन्त्येते मम जालं विहङ्गमाः ।
यदा तु निपतिष्यन्ति वशमेष्यन्ति ते तदा ॥

४ यत्र विद्वज्जनो नास्ति श्लाघ्यस्तत्राल्पधीरपि ।
निरस्तपादपे देशे एरण्डोऽपि द्रुमायते ॥

५ एकस्य तु खस्य न यावदन्तं गच्छाम्यहं पारमिवार्णवस्य ।
तावद्द्वितीयं समुपस्थितं मे छिद्रेष्वनर्था बहुलीभवन्ति ॥

६ यदि न स्यान्नरपतिः सम्यङ्नेता ततः प्रजा ।
अकर्णधारा जलधौ विप्लवेतेह नौरिव ॥

उदयति यदि भानुः पश्चिमे दिग्विभागे
विकसति यदि पद्मं पर्वतानां शिखाग्रे ।
प्रचलति यदि मेरुः शीततां याति वह्निः
न चलति खलु वाक्यं सज्जनानां कदाचित् ॥

८ अनन्तरत्नप्रभवस्य यस्य हिमं न सौभाग्यविलोपि जातम् ।
एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः ॥

९ सुखं हि दुःखान्यनुभूय शोभते घनान्धकारेष्विव दीपदर्शनम् ।
सुखात्तु यो याति नरो दरिद्रतां धृतः शरीरेण मृतः स जीवति ॥

१० सन्तः स्वतः प्रकाशन्ते गुणा न परतो नृणाम् ।
आमोदो न हि कस्तूर्याः शपथेन विभाव्यते ॥

## टीपा

२ प्रतापनिधिः—प्रखर उष्णतेचा साठा.

४ निरस्तपादपः (देशः)—ज्यातील झाडें उध्वस्त केलेली आहेत असा.
द्रुमायते—वृक्षाप्रमाणें मानला जातो. (द्रुम पासून नामधातूचें रूप).

६ अनर्गला—जिला कुलूप घालणारा नाहीं अशी.

८ हिमालयाचें वर्णन:—यस्य—हिमालयस्य, अनन्तरत्नप्रसवः—अगणित रत्नांचें उत्पत्तिस्थान.
सौभाग्यविलोपि (हिमम्)—सौन्दर्याचा लोप करणारें.
गुणसन्निपातः—गुणांचा समूह.

## अभ्यास २

पुढील वाक्यांत योग्य तीं अव्ययें योजा:—

१ ——— नरः उद्यमं करोति तर्हि स यशस्वी भवति ।

२ यतः पादतलगता छाया दृश्यते ——— तर्कयामि मध्याह्नसमयः सम्प्राप्तः ।

३ ये ——— मा प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।

सूक्ष्म रीतीनें पाहिल्यास असे दिसून येईल की दोन्ही क्रिया एकाच वेळीं चालू आहेत व एकाच कर्त्याशीं संबद्ध आहेत. पहिल्या वाक्यात आण्याची व निरीक्षण करण्याची अशा दोन्ही क्रिया एकदम चालू आहेत. अशा वेळीं पहिल्या क्रियेबद्दल वर्तमानकालवाचक धातुसाधिताचें कर्त्याशीं जुळणारें रूप योजून शेवटच्या क्रियेबद्दल क्रियापदाचें रूप योजतात. म्हणून वर्तमानकालवाचक धातुसाधिताचा उपयोग जेव्हा एकाहून अधिक क्रिया एकाच कर्त्याशीं संबद्ध असतात व त्या सर्व क्रिया एकाच वेळीं चालू असतात तेंव्हा शेवटचे क्रियेखेरीज इतर क्रियांबद्दल करता येतो.

२ स्वर्गात् अवतरन्तीं गङ्गां शङ्करः जटासु अधारयत्।
चिरात् स्वदेशम् आगच्छतः मित्रस्य दर्शनम् आह्लादकं भवति।
पार्वतीं तपसः निवारयन्ती मेना ताम् एवम् अवदत्।
वनं गच्छता रामेण युवराजपदं त्यक्तम्।
राजपुरुषाः पलायमानात् चोरात् धनम् अलभन्त।

वरील वाक्यामध्यें '**अवतरत्, आगच्छत्, निवारयत्, गच्छत्** व **पलायमान**' या वर्तमानकालवाचक धातुसाधिताचा उपयोग सामान्य विशेषणाप्रमाणें केला आहे. त्यामुळें त्यांच्याशीं संबद्ध असणाऱ्या नामाप्रमाणें त्यांचा हीं लिंग, वचन व विभक्ति यामध्यें झाली आहेत व त्यांचा अर्थ त्या त्या क्रिया करणारा असा झाला आहे. परंतु,

बालः क्रीडन् अस्ति।
सैनिकाः युध्यमानाः आसन्।

असा उपयोग करता येत नाहीं. त्याऐवजीं **क्रीडति, अयुध्यन्त** असा क्रियापदाचा उपयोग करावा लागतो. वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणाचा असा या क्रियापदाबरोबर विधिविशेषणासारखा उपयोग करता येत नाहीं.

३ ह्यः मया अग्निना दह्यमानं गृहं दृष्टम्।
क्रीडायां नैपुण्येन जनैः स्तूयमानः नरः पारितोषिकम् अलभत।

ज्वरार्तेन नरेण पीयमानस्य औषधस्य परिणामः हितावहः ।

वरील वाक्यांमध्यें दह्यमान, स्तूयमान, पीयमान हीं कर्मणि वर्तमान-कालवाचक धातुसाधितें विशेषणाप्रमाणेंच योजलेलीं आहेत. याचा अर्थ क्रिया केली जाणारा असा होतो.

४ गजः सकलं वस्तुजातं विदारयन् आस्ते ।
भक्तः ईश्वरस्य नाम स्मरन् सर्वदा तिष्ठति ।
सिंहः बहुपशुघातं कुर्वन् स्थितः ।

वरील वाक्यांमध्यें वर्तमानकालवाचक धातुसाधितांचा उपयोग आस् व स्था या क्रियापदांबरोबर केलेला आहे व त्यामुळें 'ती क्रिया करण्याची सवय असणें अथवा ती क्रिया सतत चालू असणें' असा अर्थ दर्शविला जातो.

## अभ्यास १

पुढील वाक्यांचा व श्लोकांचा त्यांतील वर्तमानकालवाचक धातुसाधितांचा उपयोग स्पष्ट करून अर्थ सांगा :—

१ एकदा कश्चिच्छृगालः स्वेच्छया नगरोपान्ते भ्राम्यन्नीलीभाण्डे पतितः ।
२ एवमभिधीयमानः पुण्डरीकः किंचिदुपजातलज्ज इव कपिञ्जलं प्रत्यवदत् ।
३ दुश्चरं तपश्चरतो विश्वामित्राद् भीत इन्द्रः समाधिभेदनिमित्तमप्सरसं प्राहिणोत् ।
४ त्रयाणां लोकानामपि हृदयतापं परिहरन्
अयं धीरं धीरं ध्वनति नवनीलो जलधरः ।
५ द्वे कर्मणी नरः कुर्वन्नस्मिँल्लोके विरोचते ।
अब्रुवन् परुषं किंचिदसतोऽनर्चयंस्तथा ॥
६ प्रतिदानमयं श्यामः क्षोभ्यमाणो न लक्ष्यते ।
शातकुम्भ इवाम्भस्थो विदीर्णः सन् विभाव्यते ॥
७ अधोऽधः पश्यतः कस्य महिमा नोपचीयते ।
उपर्युपरि पश्यन्तः सर्व एव दरिद्रति ॥
८ तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।
विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥

९ अविदित्वात्मनः शक्तिं परस्य च समुत्सुकः ।
गच्छन्नभिमुखो नाशं याति वह्नौ पतङ्गवत् ॥
१० गुणवदगुणवद्वा कुर्वता कार्यमादौ
परिणतिरवधार्या यत्नतः पण्डितेन ।

## टीपा

६ आमकुम्भः—मातीचें कच्चें भांडें.
अम्भःस्थः—पाणी धारण करणारें
८ तम्—अर्जुनम्. अश्रुपूर्णाकुलेक्षणः (अर्जुनः)—अश्रूंनीं डबडबले आहेत डोळे ज्याचे तो. (अश्रु + पूर्ण + आकुल + ईक्षण)

## अभ्यास २

पुढील वाक्यांत निर्दिष्ट रिकाम्या जागीं वर्त० का० धातुसाधिताचीं रूपें योजा.—

१ विष्णुं मनसा ——— ध्रुवस्य पुरतः नारायणः आविरभवत् ।
२ रथस्थः वीरः शत्रुसैन्यं ——— आस्त ।
३ परमेश्वरस्य महिमानं ——— अर्जुनेन संजयः प्रदर्शितः ।
४ विरोचनेन ——— जतुगृहात् पाण्डवाः सुरक्षितं निर्गताः ।
५ पित्रा बहुशः ——— पुत्रः अनीतिमार्गं न अत्यजत् ।
६ द्रोणचापात् विनिःसृतैः बाणैः ——— पार्थाः सम्मुखं स्थातुम् असमर्थाः ।
७ द्रोणेन सह अयुद्ध्वा अर्जुनः सर्वतः शरान् ——— जयद्रथम् अभ्यगच्छत् ।
८ द्रोणः यथाविधि मन्त्रं ——— भास्वरं वर्म अबध्नात् ।
९ रामे राज्यं ——— प्रजासु अकालमृत्युः न अभवत् ।
१० ——— अपि सभ्यानाम् दुःशासनः द्रौपद्याः वासः चकर्ष ।

# पाठ २७.

## कर्तरिभूतकालवाचक धातुसाधित विशेषणें.

१ कंसः वसुदेवं कारागृहे स्थापितवान् अस्थापयत् वा ।
बालः उद्यानात् पुष्पाणि आनीतवान् आनयत् वा ।
पान्थाः तडागस्य जलं पीतवन्तः अपिबन् वा ।
त्वम् अध्ययनम् आरब्धवान् आरभथाः वा ।

वरील वाक्यांची रचना कर्तरि भूतकाळची असून त्यांमध्ये प्रथमभूतकाळच्या क्रियापदांचीं रूपें अथवा कर्तरिभूतकालवाचक धातुसाधितांचीं रूपें कर्तृपदाला अनुरूप अशीं योजलेलीं आहेत. कर्तरिभूतकालवाचक धातुसाधित विशेषणें कर्मणिभूतकालवाचक धातुसाधित विशेषणाला वत् हा प्रत्यय जोडून केलेलीं आहेत व त्यांचीं रूपें वत् प्रत्ययान्त विशेषणाप्रमाणें झालीं आहेत. शिवाय वरील वाक्यांतील क्रियापदें सकर्मक आहेत तेव्हां सकर्मक धातूंचीं कर्तरि-भूतकालवाचक धातुसाधितांचीं रूपें योजावयाचीं झाल्यास कर्तरि प्रयोगाप्रमाणें वाक्यरचना असावी लागते.

२ रामः ग्रामम् अगच्छत्-गतः-गतवान् ।
सैनिकाः रणाङ्गणे-अतिष्ठन्-स्थिताः-स्थितवन्तः ।
नृपः विजयेन अमोदत-मुदितः-मुदितवान् ।

वरील वाक्यांमध्यें अकर्मक क्रियापदें योजलेलीं आहेत. अकर्मक धातूंचीं कर्तरिभूतकालवाचक धातुसाधित विशेषणें कर्तरि रचना कायम ठेऊन उपयोगात आणतां येतात हें मागें दाखविल्याप्रमाणें आलेंच आहे. पाठ २०, नियम १. तेव्हां अशा अकर्मक धातूंचीं कर्तरिभूतकालवाचक धातुसाधितें—'वत्' प्रत्यय कर्मणिभूतकालवाचक धातुसाधितास लावून तयार करून—वाक्यांत योजण्याचा फायदा नाहीं. म्हणून बहुतकरून संस्कृत वाङ्मयांत नेहमीं सकर्मक क्रियापदांचीं कर्तरिभूतकालवाचक धातुसाधितें अधिकच उपयोगात आलेलीं दिसतात. मात्र व्याकरणदृष्ट्या तीं रूपें चूक नाहींत. त्याचप्रमाणें

पुढील वाक्यरचनाही संस्कृत वाङ्मयामध्ये उपयोगात आणलेली दिसून येत नाही जसें—

**रामेण ग्रामं गतम्। सैनिकैः रणाङ्गणे स्थितम्।**
**नृपेण विजयेन मुदितम्।**

यावरून असे दिसून येईल की कर्तरिभूतकालवाचक धातुसाधित विशेषण प्रथमभूतकाळाचा अर्थ दर्शवितात

## अभ्यास १

पुढील वाक्यांतील व श्लोकांतील कर्तरिभूतकालवाचक धातुसाधितांचा प्रयोग स्पष्ट करून त्यांचा अर्थ करा —

१ महाश्वेतायाः पिता महोत्सवेन तस्याः जन्माभिनन्दितवान् ।
२ असमर्थो मे तस्मिन् क्षणे तेन हेतुना मोहच्छन्नस्य सर्वमपि नाहं ज्ञातवता ।
३ महाश्वेता तस्मिन्नेव सरस्तीरे तरलिकाद्वितीया तां क्षपां क्षपितवती ।
४ अशोकवनं प्राप्तं हनुमन्तं भर्तुः कुशलं सीता पृष्टवती ।
५ अपि दृष्टवानसि मम प्रियां वने कथयामि तदुपलक्षणं शृणु ।
मयि जीवति मत्तात कथमहमवासवम् ।
६ पितृपितामहं राज्यं प्राप्तवान् स्वेन कर्मणा ।
वायुरग्निमिवासाद्य प्रशमयत्यनयं स्थितः ॥
८ एवमुक्तस्तया वायुरन्तरिक्षादभाषत ।
नैषा कृतवती पापं नल सत्यं ब्रवीमि ते ॥
९ व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद् गुह्यमहं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥
१० आचार्यं मन्यसे कृष्णमथवा कुरुनन्दन ।
द्रोणे तिष्ठति वार्ष्णेयं कस्मादानतवानसि ॥

### टीपा

२ पुण्डरीकाच्या मृत्यूनंतर महाश्वेतेने म्हटलेले वाक्य
५ पुरूरवा राजाने उर्वशीचे बाबतीत राजहंसाला विचारलेला प्रश्न

# पाठ २८.

## विध्यर्थ.

१ छात्राः प्रतिदिनं गुरुं नमेयुः ।
व्यवहारान् नृपः पश्येत् विद्वद्भिः ब्राह्मणैः सह ।
ब्राह्मणः दिवसस्य त्रिः सन्ध्याम् उपासीत ।

वरील वाक्यामध्यें नम्, दृश् व उप+आस् या क्रियापदांचीं विध्यर्थी रूपें योजिलीं आहेत. त्या क्रियापदांचा अर्थ विधि अथवा नियम घालून देण्याकडे होतो. म्हणून कोणताही नियम घालावयाचा असल्यास विध्यर्थाचा उपयोग केला जातो.

२ लभेत सिकतासु तैलमपि यत्नतः पीडयन् ।
अद्य पर्जन्यः वर्षेत् अतः बहिः मा गच्छ ।
सततोद्योगित्वात् अयं बालः विजयवान् भवेत् ।

वरील विध्यर्थी क्रियापदें नियमदर्शक नसून संभव दर्शविणारीं आहेत, म्हणून कोणत्याही क्रियेचा संभव दर्शविणें झाल्यास विध्यर्थाचा उपयोग करतात.

३ हे मित्र त्वं मम प्रियाम् एवं ब्रूयाः ।
अस्मिन् महासङ्कटे ईश्वरः नः रक्षेत् ।
भवान् इमां दुःखप्रदां वार्तां न कथयेत् इति अहम् आशंसे ।
अत्रभवन्तः इदम् आसनम् अलङ्कुर्युः इति नः तर्कः ।

वरील वाक्यामध्यें विध्यर्थाचा उपयोग प्रार्थना, इच्छा, अपेक्षा व तर्क या अर्थी केलेला आहे.

४ अपि नाम रामभद्रः इदं वनम् अलङ्कुर्यात् ।
अपि जीवेत् सः ब्राह्मणशिशुः ।

वरील वाक्यांत विध्यर्थाचा उपयोग अपेक्षा अथवा इच्छा दर्शविण्याकरितां 'अपि नाम' व 'अपि' या अव्ययांबरोबर केला आहे.

५ यदि तातः अनुमन्येत तर्हि अहं मित्रं द्रष्टुं गच्छेयम्।
यदि पर्जन्यः वर्षेत् तर्हि बहिर्गमनम् अशक्यं स्यात्।

वरील प्रत्येक वाक्यात दोन दोन वाक्यें एकमेकावर अवलंबून आहेत व तीं यदि व तर्हि या अव्ययांनी जोडलेली आहेत. गौण व मुख्य अशा दोन्ही वाक्यांमध्ये भविष्यकालवाचक अर्थ विध्यर्थाच्या रूपानीं दर्शविलेला आहे म्हणून भविष्यकालवाचक अर्थांच्या एकमेकावर अवलंबून असणाऱ्या गौण व मुख्य वाक्यांमध्ये विध्यर्थी क्रियापदांचा उपयोग करता येतो.

६ धाराधरः गर्जति चेत् त्वं बहिः न गच्छेः।
यदि स्वामी अधुना आगच्छति आगमिष्यति वा तर्हि अहं
तस्मै इमां शुभवार्तां निवेदयामि-निवेदयिष्यामि वा।

वरील वाक्यांतील गौण व मुख्य वाक्यामध्ये भविष्यकाळाचा वर्तमानकाळवाचक अथवा द्वितीयभविष्यकालवाचक क्रियापदांचा उपयोग केलेला आहे, तसा एका क्रियेच्या क्रियापदाबद्दल एकमेकावर अवलंबून असणाऱ्या गौण व मुख्य वाक्यांत वर्तमानकालवाचक अथवा द्वितीयभविष्यकालवाचक क्रियापद वापरतात.

७ श्वः कार्यमद्य कुर्वीत पूर्वाह्णे चापराह्णिकम् ।
न हि प्रतीक्षते मृत्युः कृतमस्य न वा कृतम् ॥
८ उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥
९ त्यजेत्कुलार्थे पुरुषं ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् ।
ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ॥
१० मृगा एव तव सहचरा रामगिर्याश्रमस्थ
अध्यापन कुशलमलके पृच्छति त्वां च्युतस्त ।

## टीपा

४ दानमानादिशोषम्—दान, मान इत्यादि गोष्टीरूपी पाणी.
६ प्रतिनिधिमूल्यजनस्थितम्—इच्छाचा मूल मनुष्याचे मन
१० यक्षाने [illegible] [illegible] [illegible] [illegible] सांगितलेल्या निरोपातील वाक्य.

## अभ्यास २

पुढील वाक्यात कंसात दिलेल्या धातूंची विध्यर्थी रूपे योजा —

१ प्राणात्यये विवाहे च अनृतमपि नरः (ब्रू) इति नातिविदां मतम् ।
२ नृपः प्रजाभ्यः युक्तान् करान् (ग्रह्–आ+दा) ।
३ नरः भयात् कामात् लोभात् वा धर्मं न (त्यज्) ।
४ प्रजाहिते तत्परः नृपः अनुमार्गं कूपान् (खन् प्र) वासगृहाणि च (रच्) ।
५ व्यवहारं परिज्ञाय एव नरः अपरिचिते नरे (वि+श्वस्) ।
६ अविचारेण न कामपि क्रियां नरः (वि+धा) ।
७ भृत्यः स्वामिकार्यं सर्वभावेन (अनु+स्था) ।
८ अनुग्रहात् प्राक् गुरुः शिष्यं (परि+ईक्ष्) ।
९ (उत्सद्) इमे लोका न (कृ) कर्म चेत् अहम् ।
सङ्करस्य च कर्ता (अस्) (उप+हन्) इमाः प्रजाः ॥
१० न बुद्धिभेदं (जन् प्र) अज्ञानां कर्मसङ्गिनाम् ।
(जुष् १० ग) सर्वकर्माणि विद्वान् युक्तः समाचरन् ॥

# पाठ २९.

## सर्वनामें ( पुढें चालू ).

### दर्शक सर्वनामें ( अदस्, इदम् )

१. अमुष्य विप्रः रसनाग्रनर्तकी।
पुरा अस्याम् पुर्यां कालिदासः नाम कविः अवसत्।
अमीषां क्षुद्राणां प्राणिनां कृते जन्तुः अहितं न आचरेत्।
क गतः असौ विहगतस्करः।
इयम् अमृतवर्तिः नयनयोः।
मधुरम् आसां कन्यकानां दर्शनम्।

वरील वाक्यांत अदस् व इदम् या तो, ती, तें व हा, ही, हें या त्यांच्या दर्शक सर्वनामांचा उपयोग केलेला आहे. दर्शक सर्वनामांचा उपयोग दुसऱ्या विशेषणाप्रमाणेही होतो म्हणून तीं ज्या नामाबद्दल येतात अथवा ज्या नामाशीं त्याचा संबंध असतो त्या नामाप्रमाणें त्यांचीं लिंग व वचन यामध्यें रूपें होतात व विभक्ति योग्य ती वापरतात. दर्शक सर्वनामाच्या उपयोगाविषयीं पुढील श्लोक उपयुक्त आहे

इदमस्तु सन्निकृष्टं समीपतरवर्ति चैतदो रूपम्।
अदसस्तु विप्रकृष्टं तदिति परोक्षे विजानीयात्॥

एतद् व इदम् यांची वैकल्पिक रूपें—एनेन, एनयो इ०—ज्या नामाबद्दल तीं वापरावीं तें पूर्वीच्या वाक्यांत आधीं असल्यास उपयोगांत आणतां येतात.

### संबंधी सर्वनाम ( यद् )

२ बुद्धिर्यस्य बलं तस्य।
या विद्यायाः अधिदेवता तस्यै सरस्वत्यै नमः।
यं देशं धीरः श्रयते सः तस्य स्वदेशः भवति।
वनानि तानि निबिडसान्द्राणि येषां समन्तात् रामः
सीतया सह अवसत्।

वरील तिन्ही वाक्यांमध्यें यद् या संबंधी सर्वनामाचीं रूपें योग्य [illegible]

आलेलीं आहेत. संबंधी सर्वनाम व मुख्य वाक्यांतील पूर्वगामी शब्द यामध्यें लिंग व वचन या दोन गोष्टींमध्यें साम्य असतें, परंतु विभक्ति मात्र गौण वाक्यांत योग्य असेल ती संबंधी सर्वनामाची होते, व पूर्वगामी शब्दाची मुख्य वाक्यांत योग्य असेल ती होते. कांहीं ठिकाणीं विभक्तींत सुद्धां साम्य असू शकतें. जसें—दुसऱ्या वाक्यांत 'ना' हें प्रथमान्त रूप एकवचनी रूप कर्तृपद म्हणून आवश्यक आहे, परंतु मुख्य वाक्यांत पूर्वगामी शब्दाचा संबंध 'नमः' या अव्ययाशीं असल्यामुळें त्याची चतुर्थी विभक्ति योजावी लागली. मात्र लिंग व वचन हीं सारखींच राहिलीं. पहिल्या वाक्यामध्यें संबंधी सर्वनाम व पूर्वगामी शब्द या दोहोंमध्यें विभक्तींतही साम्य आहे. कारण गौण वाक्य व मुख्य वाक्य यामध्यें तसा प्रकार आहे.

३ अहं न विश्वसिमि यद् त्वम् एवं वदेः ।

आश्चर्यं खलु इदं यद् पशवः अपि मनुजस्य स्वरूपं तर्कयन्ति ।

यद् या सर्वनामाचा उपयोग मराठींतील 'की' या अव्ययाच्या अर्थी केला जातो.

४ यद् शैत्यं सा प्रकृतिः जलस्य ।

यद् क्रौर्यम् इति वदन्ति सः हिंस्राणां पशूनां धर्मः ।

वरील वाक्यांतील गौण वाक्यांत यद् हें सर्वनाम नपुंसकलिंगी आहे. परंतु त्याच्याबद्दल मुख्य वाक्यांतील दर्शक सर्वनाम विधेयपूरकांतील नामाच्या लिंगाप्रमाणें योजलेलें आहे. जसें—प्रकृतिः-स्त्री-सा । धर्मः-पु-सः ।

## प्रश्नार्थक सर्वनाम ( किम् )

५ किं दूरं व्यवसायिनाम् ।
लिखितम् अपि ललाटे प्रोज्झितुं कः समर्थः ।
कैः न पपौ कविताकामिनी कौतुकाय ।
सता केन उद्दिष्टं विषमम् असिधाराव्रतम् इदम् ।

वरील वाक्यांत 'किम्' या प्रश्नार्थक सर्वनामाचा उपयोग 'कोण, काय' या अर्थी तीनही लिंगांमध्यें केलेला आहे. विभक्ति व वचन ज्या त्या वाक्याला योग्य तें उपयोगांत आणिलें आहे. जसें—पहिल्या व दुसऱ्या वाक्यांत त्याचा उपयोग कर्तृपदाच्या ठिकाणीं केला असल्यामुळें प्रथमा विभक्ति योजलेली आहे व

# पाठ ३०.

## विशेषणें ( पुढें चालू ).

१ तस्मिन् महोत्सवे बहवः गायकाः गायिकाः च मिलिताः ।
तरलिका सन्देशहारिका दासी अभवत् ।
मामकाः पाण्डवाः च एव किम् अकुर्वत सञ्जय ।

वरील वाक्यांत धातूला अक अथवा क लावून तयार झालेलीं साधित विशेषणें योजलेलीं आहेत. तीं पुल्लिंगामध्यें व नपुंसकलिंगामध्यें नृप व वन या शब्दांप्रमाणें चालवतात व स्त्रीलिंगामध्यें सामान्यतः अक च्या ऐवजीं इका असें रूपान्तर होऊन माला शब्दाप्रमाणें चालवितात.

इतर उदाहरण —कारक-कारिका दारक-दारिका स्वक-स्विका
अपवाद —क्षिपक-क्षिपका सेवक-सेवका

२ विद्या भोगकरी यशःसुखकरी विद्या गुरूणां गुरुः ।
पाण्डवानाम् अग्रेसरः अर्जुनः ।
गङ्गा जनानां तापहरी ।
प्रातर् अवगाहनं हितकरम् ।

ज्या संयुक्त विशेषणांच्या शेवटीं **चर, कर, हर, सर** इत्यादि क्रियापदांपासून बनलेले शब्द असतील त्यांचीं स्त्रीलिंगी रूपें '**आ अथवा ई**' जोडून होतात व तीं '**माला व नदी**' या शब्दांप्रमाणें चालवतात. पुल्लिंगामध्यें '**नृप**' प्रमाणें व नपुंसकलिंगामध्यें '**वन**' प्रमाणें चालवतात.

३ वसिष्ठस्य भार्या भगवती अरुन्धती ।
भारतवर्षे बहव्यः ज्ञानवत्यः स्त्रियः अभवन् ।
न किंचित् अगम्यं धीमतां नाम ।
सर्वे आयुष्मन्ति अपत्यानि वाञ्छन्ति ।

वरील वाक्यांत नामांना **वत्** व **मत्** प्रत्यय जोडून होणारीं मत्वर्थीय विशेषणें योजलेलीं आहेत, त्यांचीं रूपें पुल्लिंगामध्यें '**भगवत्**' प्रमाणें स्त्रीलिंगामध्यें '**ई**' प्रत्यय जोडून '**नदी**' प्रमाणें व '**जगत्**' प्रमाणें नपुंसकलिंगामध्यें रूपें होतात

४ ईश्वरस्य प्रसादेन नराः नार्यः च सुखभाजः भवन्ति ।
पुनात् अपि धनभाजां नराणां भीतिः ।

वरील वाक्यांत 'ज्' कारान्त विशेषणें योजलेली आहेत. त्यांची रूपें पुल्लिंगामध्यें व स्त्रीलिंगामध्यें 'वाच्' प्रमाणें होतात व नपुंसकलिंगामध्यें 'जगत्' प्रमाणें होतात.

५ वनौकसः मुनयः । दिवौकसः अप्सरसः ।
जलौकांसि सत्त्वानि ।

'स्' कारान्त विशेषणें पुल्लिंगामध्यें व स्त्रीलिंगामध्यें 'चन्द्रमस्' शब्दा-प्रमाणें चालवतात व नपुंसकलिंगामध्यें 'मनस्' शब्दाप्रमाणें चालवतात.

६ पुण्यकृतः नराः नार्यः च स्वर्गं गच्छन्ति ।
शस्त्रभृतां रक्षसां विनाशाय रामः अवतीर्णः ।

'कृत्, भृत्, हृत्' वगैरे त्कारान्त क्रियापदापासून झालेले शब्द ह्या विशेषणांत मोडतात. ते पुल्लिंगामध्यें व स्त्रीलिंगामध्यें 'मरुत्' प्रमाणें व नपुंसकलिंगामध्यें 'जगत्' प्रमाणें चालवतात

नपुंसकलिंगी योजतात व जेव्हा केवळ पु. व स्त्री. नामे असतील तेव्हा विशेषण पुल्लिंगी योजतात. मात्र वचन सर्व नामें मिळून दर्शविलेल्या अर्थानुरूप असते.

## अभ्यास १

पुढील श्लोकांचा अर्थ करा व विशेषणांचा उपयोग स्पष्ट करा —

१ धन्योऽन्य एव धनमद्वता नेक्षसे यन्मुखानि ।

२ दारिका हृदयदारिका पितुः ।

३ बलिना सह योद्धव्यमिति नास्ति निदर्शनम् ।

४ वार्ता च कौतुकवती विमला च विद्या लोकोत्तरः परिमलश्च कुरङ्गनाभेः ।
तैलस्य बिन्दुरिव वारिणि दुर्निवारमेतत्त्रयं प्रसरति स्वयमेव लोके ॥

५ आश्च पुष्पफला लोकानुग्रिता शाश्वता समाः ।
शुचीना श्रीमता गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥

६ राजतः सलिलादग्नेश्चोरतः स्वजनादपि ।
भयमर्थवतां नित्यं मृत्योः प्राणभृतामिव ॥

७ तच्छ्रुत्वा द्रौपदी वाक्यमुवाच व्याकुलेन्द्रिया ।
क्षुधिता क्लीमती प्राणा पता भीमार्जुनावुभौ ॥

८ किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥

९ पप्रच्छ स निपुणं भीष्मं धर्मभृतां वरः ।
हेतुमागमने तस्य ज्ञाप सर्वं न्यवेदयत् ॥

१० क्षीरिण्यः सन्तु गावो भवतु वसुमती सर्वसम्पन्नसस्या ।
पर्जन्यः कालवर्षी सकलजनमनोनन्दिनो वान्तु वाताः ॥
मोदन्तां जन्मभाजः सततमभिमता ब्राह्मणाः सन्तु सन्तः ।
श्रीमन्तः पान्तु पृथ्वीं प्रशमितरिपवो धर्मनिष्ठाश्च भूपाः ॥

### टीपा

१० सर्वसम्पन्नसस्या—सर्व प्रकारच्या धान्यांनी युक्त.
प्रशमितरिपु॰ ( भूप )—ज्याने शत्रूंचा नाश केला आहे तो

## अभ्यास २

पुढील वाक्यांत खाली दिलेल्या विशेषणांपैकीं योग्य विशेषणाचीं रूपें योजा —

१ धृष्टद्युम्नेन निहत द्रोण दृष्ट्वा सर्व वीरा अब्रुवन् 'धिक् अस्मान् ——— ' इति ।

२ रामस्य मूर्च्छासमये अहल्याया सीताया हस्तस्पर्श ——— जात ।

३ नैतत् चित्र यत् ——— मानवा कृतघ्ना भवन्ति यत तिर्यञ्च अपि कृतम् उपकार न विस्मरन्ति ।

४ कण्व शाकुन्तला पतिगृह विसृज्य वदति 'अस्मादृश ——— अपि तनयावियोगदु खेन पीड्यन्ते' इति ।

५ राक्षसाना वृत्ति यज्ञाना ——— आसीत् ।

६ लङ्का प्राप्य मारुति ——— राक्षसा हत्वा अशोकवन प्राविशत् ।

७ ——— बालिकाभ्य पारितोषिकाणि दत्तानि गुरुणा ।

८ महाश्वेतया निवेदिता कथा चन्द्रापीडस्य ——— जाता ।

९ प्रसन्नसलिला उत्फुल्लकमला च सरसी ——— दृश्यते ।

१० ——— कुकर्माणि भूभार जनयन्ति ।

(तापहर, अरण्यौकस्, विघ्नकर, यशोभाज्, द्वाररक्षक, दुर्विनाविन्, दाक्षघ्न्, आश्चर्यकर, पापघ्न्, मनोहर)

---

# पाठ ३१.

## सति सप्तमी व सतः षष्ठी.

१ यदा सेनापतिः हतः तदा सैनिकाः न्यवर्तन्त अथवा सेनापतौ हते सैनिकाः न्यवर्तन्त ।

यावत् स न आगच्छति तावत् त्वं क्रीड अथवा अनागते तस्मिन् त्वं क्रीड ।

**यदा सूर्यः अस्तं गच्छति तदा अन्धकारः प्रसरति** अथवा
**अस्तंगते सूर्ये अन्धकारः प्रसरति ।**

वरील वाक्यें दोन दोन प्रकारांनी लिहिलेलीं आहेत. पहिल्या प्रकारामध्ये यदा अथवा यावत् असलेलीं गौण वाक्यें तदा अथवा तावत् असलेल्या मुख्य वाक्याशा संबद्ध आहेत. दुसऱ्या प्रकारामध्यें यदा–तदा, यावत्–तावत् हे शब्द नसून वाक्यामध्यें एकेकच क्रियापद आहे, व गौण वाक्याबद्दल त्यांतील कर्तृपद व क्रियापदापासून झालेलें कर्मणिभूतकालवाचक धातुसाधित विशेषण हे दोन्हीं शब्द एकमेकांशीं जुळतील अशा रीतीनें सप्तमींत योजलेले आहेत. अशा रीतीचा हा जो दुसरा प्रकार त्याला ' सति सप्तमी ' रचना असें म्हणतात. हा प्रकार केव्हा उपयोगांत आणता येतो हें पाहू.

१. गौण क्रियेनें मुख्य क्रियेचा काळ दर्शविला पाहिजे. २. गौण क्रिया व मुख्य क्रिया यांचे कर्ते भिन्न पाहिजेत. व ३. गौण वाक्यांतील क्रिया मुख्य वाक्यांतील क्रिया घडण्यापूर्वी पुरी झाली असली पाहिजे. म्हणून गौण वाक्य बदल कर्तृपद सप्तमींत व क्रियापद अकर्मक असेल तर कर्मणिभूतकाल-वाचक धातुसाधित सप्तमांत योजून वाक्य बनवावें लागतें व गौण वाक्यांतील क्रियापद सकर्मक असेल तर मूळ कर्तृपद तृतीयेंत, कर्मपद सप्तमींत व कर्मणि भूतकालवाचक धातुसाधित सप्तमींत योजावें लागतें.

२ **शत्रुणा सेनापतौ हते** अथवा **सेनापतिं हतवति सति सैनिकाः पलायन्त ।**

**भीष्मेण अर्जुनवधे प्रतिज्ञाते** अथवा **अर्जुनवधं प्रतिज्ञातवति भीष्मे दुर्योधनः निश्चिन्तः आसीत् ।**

वरील वाक्यामध्यें सति सप्तमीची रचना दोन प्रकारांनीं केलेली आहे. ज्या वेळेस ' हत व प्रतिज्ञात ' हीं सकर्मक कर्मणिभूतकालवाचकें योजलेलीं आहेत त्या वेळीं कर्मणि प्रयोगाप्रमाणें प्रधानान्त कर्मपद सप्तमींत योजलेलें आहे, जसें–सेनापतौ, अर्जुनवधे व मूळ कर्तृपद तृतीयेंत योजलेलें आहे, जसें–शत्रुणा, भीष्मेण.

त्या वेळीं ' हतवान्, प्रतिज्ञातवान् ' अशीं कर्तरिभूतकालवाचक धातुसाधितें योजलेलीं आहेत त्या वेळी कर्तरि प्रयोगाप्रमाणें मूळ कर्ता सप्तमींत व मूळ

कर्मपद द्वितीयेंत योजलेलें आहे, उसें–शत्रौ, भीष्मे व सेनापतिं, अर्जुनवधम्.

३ 'रामे पृथ्वीं शासति' प्रजाः सुखिन्यः अभवन्।

'रुदति पुत्रे' पिता अरण्यं गतः।

'गच्छति काले' बालः शास्त्रनिपुणः जातः।

वरील वाक्यांतील अवतरणचिन्हांकित भाग हे सति सप्तमीत योजलेले आहेत. सति सप्तमीला अवश्य असणाऱ्या सर्व गोष्टी या ठिकाणीं आहेत; परंतु क्रियापदापासून बनविलेलें विशेषण कर्मणि अथवा कर्तरिभूतकालवाचक नसून वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषण आहे. कारण गौण क्रिया व मुख्य क्रिया या दोन्ही एकाच वेळीं चालू आहेत व त्यामुळें वर्तमानकालवाचक धातुसाधितच उपयोगांत आणावें लागतें. जसें, रामाची पृथ्वीवर राज्य करण्याची क्रिया व प्रजेची सुखी होण्याची क्रिया या एकाच वेळीं चालू आहेत; तसेंच मुलाची रडण्याची क्रिया व बापाची जाण्याची क्रिया या एकाच वेळीं चालू आहेत. वरील वाक्यांत कर्तरिवर्तमानकालवाचकाचा उपयोग केलेला आहे व त्यामुळें वाक्यरचना कर्तरिप्रयोगाप्रमाणें आहे.

४ 'शत्रुणा दह्यमाने नगरे' जनाः इतस्ततः अधावन्।

'नृपेण सिंहासने अलङ्क्रियमाणे' राजपुरुषाः उदतिष्ठन्।

'सेनापतिना नीयमानायां सेनायां, गम्भीरः शङ्खध्वनिः उदभवत्।

वरील वाक्यांमध्ये अवतरणचिन्हांकित भागामध्यें सति सप्तमीचा उपयोग केलेला आहे. ज्या अर्थी गौण क्रिया व मुख्य क्रिया एकाच वेळीं चालू आहेत त्या अर्थी वर्तमानकालवाचक धातुसाधिताचा उपयोग केलेला आहे. परंतु तीं कर्मणि-वर्तमानकालवाचक धातुसाधितें असल्यामुळें कर्मणि तऱ्हेची रचना झाली आहे.

५ 'पश्यतः पितुः' पुत्रेण अविनयः कृतः।

'पश्यतः ईश्वरस्य' जनाः पापं कुर्वन्ति।

'विद्यमानानां देवानां' दमयन्ती नलं पतिं वव्रे।

वरील वाक्यांत सति सप्तमीच्या ऐवजी सत- षष्ठीचा उपयोग विशिष्ट तऱ्हेनें

केलेला आहे. सति सप्तमीला आवश्यक असणाऱ्या या पाठात पूर्वी सांगितलेल्या गोष्टी याही वाक्यावरून दिसून येतात. शिवाय गौण वाक्यावरून त्यातील कर्तृपदाबद्दल अनादर अथवा तुच्छता ध्वनित केली जात आहे. म्हणून अशा वेळेला सति सप्तमीच्या ऐवजी सत षष्ठीचा उपयोग करण्याचा ज्यास्त प्रघात आहे. रचनेकडे पाहिलें असता असें दिसून येईल कीं वर्तमानकालवाचक धातुसाधिताची षष्ठी योजून कर्तृपदाची सुद्धा षष्ठी योजलेली आहे.

६ सुवर्णमृगम् अनुसरतः रामस्य रावणेन सीता अपनीता ।
गुरोः सेवां कुर्वतः तस्य छात्रस्य बहूनि दिनानि अतीतानि ।

वरील वाक्यात अनादर अथवा तुच्छतादर्शक अर्थ ध्वनित नसतांना सुद्धा सति सप्तमीप्रमाणें सत षष्ठीचा उपयोग केलेला आहे. यावरून असें दिसून येईल कीं सामान्यतः योग्य ठिकाणी सति सप्तमी अथवा सत षष्ठी याचा उपयोग करता येईल. परंतु सामान्यतः सति सप्तमी योजली जाते व अनादरदर्शक विशिष्ट अर्थ दर्शविण्याकरिता सत षष्ठी उपयोगात आणली जाते.

७ एवं स्थिते कः भयस्य अवकाशः ।
इत्थं गते न किमपि शरणम् आलोक्यते ।
एवं सति मत्स्याः जलाशयात् बहिः गताः ।

वरील वाक्यात स्थिते, गते व सति हीं सप्तम्यन्त धातुसाधितें योजलेलीं आहेत व इतर ठिकाणच्या सप्तम्यन्त शब्दाबद्दल एवम्, इत्थम् हीं क्रियाविशेषण अव्ययें योजलेलीं आहेत व त्या सर्वांचा अर्थ 'असें झालें असता' 'असें असताना' असा केला जातो.

८ अनुकूले चित्ते संकटानि नरम् आपतन्ति ।
प्रतिकूले दैवे मित्राणि अपि अरिवत् आचरन्ति ।

वरील वाक्यांतील सर्व सप्तम्यन्त समानाधिकरण विशेषण व नाम एकेक शब्द सप्तमीत योजलेले आहेत, व 'सति, वर्तमान' वगैरे वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणांचीं रूपें गुप्त ठेवण्याची पद्धति आहे.

९ मृते नृपे तस्य पुत्रः सिंहासनम् आरोहति ।
आगतेषु बालेषु तेषां नामानि पृच्छ ।

हीं सतिसप्तमीयुक्त वाक्यें योग्य तऱ्हेनें बनविलेलीं आहेत. परंतु

**आगतेषु विप्रेषु तेभ्य दक्षिणा दातुम् आरभस्व।** अथवा **गोषु दुह्यमानासु ता जलम् अपाययत् ।** अशा प्रकारचा सति सप्तमी रचना योग्य नव्हे कारण मुख्य वाक्यातील कर्तृपद अथवा कर्मपदवाचक शब्द अथवा त्याबद्दल येणारे सर्वनाम, षष्ठीशिवाय इतर विभक्तींत मुख्य वाक्यात येता कामा नये पहिल्या दोन वाक्यामध्ये '**नृप**' या गौण क्रियेच्या कर्तृपदाबद्दल '**तस्य**' हें सर्वनामाचें षष्ठ्यन्त रूप आलें आहे व **वाला** याबद्दल **तेषाम्** हें रूप आलेलें आहे म्हणून सति सप्तमी रचना योग्य रीतीनें उपयोगात आणिली आहे म्हणून असा नियम करता येईल की गौण क्रियेचें कर्तृपद अथवा कर्मपद मुख्य वाक्यात षष्ठीशिवाय अन्य विभक्तीत येत असेल तर सति सप्तमी रचना उपयोगात आणू नये, व साधी वाक्यरचना करावी **नसें—आगतेभ्य विप्रेभ्य दक्षिणा दातुम् आरभस्व । दुह्यमाना गा जलम् अपाययत् ।** संस्कृत वाङ्मयात वरील नियमाला अपवादात्मक उदाहरणेंही आढळून येतात

१० **हतमात्रे एव सेनापतौ सैनिका पलायिता ।**
**एव शाप उच्चारयति एव गौतमे अहिल्या शिलाभावम् आपन्ना ।**

वरील वाक्यात सति सप्तमी रचनेतील सप्तम्यन्त धातुसाधित विशेषणानंतर '**एव**' किंवा धातुसाधितास '**मात्र**' जोडून नंतर '**एव**' हें अव्यय योजलेलें आहे व '**ती क्रिया घडते तोंच**' अथवा '**घडली मात्र तोंच**' असा अर्थ दाखविला जातो

## अभ्यास १

पुढील श्लोकातील सति सप्तमी अथवा सत षष्ठी यांचा अर्थ स्पष्ट होईल अशा रीतीने त्यांचा अर्थ करा —

१ लतायां पूर्वलूनायां प्रसूनस्यागम कुत ।
२ हतवानसुरान् रामो रावणस्यापि पश्यत ।
३ इति महति विरोधे वर्तमाने समाने
नृपतिजनपदाना दुर्लभ कार्यकर्ता ।
४ ताते चापद्वितीये वहति रणधुरां को भयस्यावकाश ।

५ अपक्रान्ते नले राजन् दमयन्ती गतक्लमा ।
अबुध्यत वरारोहा संत्रस्ता विजने वने ॥
६ हृतराज्ये नले भीमः सभार्ये प्रेष्यतां गते ।
द्विजान् प्रस्थापयामास नलदर्शनकाङ्क्षया ॥
७ एवमुक्तस्तु वैदर्भ्या मरुत्वान् प्रत्यभाषत ।
तिष्ठतां लोकपालानां कथं मानुषमिच्छसि ॥
८ वसतस्तस्य तु सुखं राघवस्य महात्मनः ।
शरद्व्यपाये हेमन्त ऋतुरिष्टः समागतः ॥
९ जीवत्सु तातपादेषु नवे दारपरिग्रहे ।
मातृभिश्चिन्त्यमानानां ते हि नो दिवसाः गताः ॥
१० सन्तानवाहीन्यपि मानुषाणां दुःखानि सद्बन्धुवियोगजानि ।
दृष्टे जने प्रेयसि दुःसहानि स्रोतःसहस्रैरिव सम्प्लवन्ते ॥

## टीपा

४ अश्वत्थाम्यानें म्हटलेला श्लोक.
९ श्रीरामानीं म्हटलेला श्लोक.
१० सद्बन्धुवियोगजानि (दुःखानि)—चांगल्या बान्धवांच्या वियोगामुळें उत्पन्न होणारीं.

## अभ्यास २

पुढील वाक्यांत सति सप्तमी अथवा सत. षष्ठी योजा :—

१ यदा नरस्य दैवं प्रतिकूलं भवति तदा तस्य सर्वे प्रयत्नाः निष्फलाः भवन्ति ।
२ यावत् द्रोणः सम्मुखम् अतिष्ठत् तावत् अर्जुनः जयद्रथं प्रति गन्तुम् असमर्थः ।
३ यावत् बालाः क्रीडन्ति तावत् एव सूर्यः अस्तं गतः ।
४ यदा अभिमन्युः रणाङ्गणे पतितः तदा केचित् कौरवयोधाः तं मूर्धनि प्राहरन् ।
५ मध्यरात्रात् अनन्तरं चोरः गृहं प्रविष्टः ।
६ यद्यपि सर्वे गुरुजनाः वीराः सभायाम् उपविष्टाः तथापि दुःशासनः द्रौपद्याः वस्त्रं कर्षितुम् उद्यतः अभवत् ।

समास (समासाचीं सर्व पदें मुख्य असून तीं ‘च’ नें जोडलेलीं असतात), कुन्तीपुत्राः व वनवासः हे तत्पुरुष समास (यांतील प्रथम पद द्वितीय पदाचा अर्थ निश्चित करतें), रक्तकमलानि हा कर्मधारय (प्रथम पद विशेषण व द्वितीय पद विशेष्य), गजाननः हा बहुव्रीहि (यांतील दोन्ही पदांच्या समासावरून तृतीय शब्दाचा बोध होतो) व प्रतिशैलम् हा अव्ययीभाव (प्रथम पद अव्यय व सर्व समासाचा उपयोग अव्ययाप्रमाणें) आहे.

## द्वन्द्व

२ सुखदुःखाभ्यां पण्डितस्य मनः पर्याकुलं न भवति ।
धर्मार्थकाममोक्षाः चत्वारः पुरुषार्थाः इति पुराणेषु कथ्यते ।
कस्मिंश्चित् वटवृक्षे हंसकाकौ निवसतः ।

वरील वाक्यांत सुखदुःखाभ्याम्, धर्मार्थकाममोक्षाः व हंसकाकौ हे तीन समास योजलेले आहेत. या समासाचा उपयोग केला नसता तर ‘सुखेन च दुःखेन च, धर्मः अर्थः कामः मोक्षः च, हंसः काकः च’ अशा शब्दयोजना करून अर्थ दाखविता आला असता. या सामासिक शब्दाचें लिंग शेवटच्या पदाप्रमाणें व वचन समासांतील पदांनी निर्दिष्ट केलेल्या संख्येवर अवलंबून असतें. जसें पहिल्या व तिसऱ्या समासाचें द्विवचन आहे व दुसऱ्याचें बहुवचन आहे. या समासांतील पदांचा विचार वेगवेगळा केलेला आहे, समुदायित तऱ्हेनें नव्हे, म्हणून या समासाला इतरेतर द्वन्द्व असें म्हणतात. जेव्हा दोन अथवा अधिक समान दर्जाच्या शब्दांचा विचार वेगवेगळ्या तऱ्हेनें केलेला असेल व सामासिक शब्द योजावयाचा असेल तर इतरेतर द्वन्द्व समास योजतात.

३ सुरभिकुसुमधूपानुलेपनेन भक्तः देवं पूजयति ।
आहारनिद्राभयम् नैसर्गिकं जीवजातस्य ।
दंष्ट्रानखलाङ्गूलेन सिंहः गजान् हन्ति ।

वरील वाक्यांमध्ये दोन अथवा अधिक शब्द द्वन्द्व समासानें एके ठिकाणीं जोडलेले आहेत. परंतु दुसऱ्या प्रकारच्या द्वन्द्व समासाप्रमाणें वचन प्रत्येक शब्दाच्या अर्थानुरूप संख्येवर अवलंबून नसून तें नेहमीं एकवचन आहे व त्याला

लिंग शेवटच्या शब्दावर अवलंबून नसून तें नेहमीं नपुंसकलिंग आहे. शिवाय याकडे नजर दिल्यास असे दिसून येईल कीं समासाच्या घटक शब्दाचा विचार वेगवेगळा केलेला नसून सर्वांचा मिळून सामुदायिक रीतीनें केलेला आहे. त्या समासांना समाहारद्वन्द्व असें म्हणतात. समासाच्या सर्व निरनिराळ्या अवयवांचा समूह या दृष्टीनें विचार केला असतां याचा उपयोग करण्याचा प्रघात आहे. म्हणजे दोन अथवा अधिक समान दर्जाचे शब्द एकत्र योजावयाचे असल्यास ॥ इतरेतर द्वंद्व समासाच्या रूपानें यावयाचे का समाहार द्वन्द्वाच्या रूपानें यावयाचें हें लिहिणाराच्या मनावर अवलंबून असतें. परंतु कांहीं ठिकाणी समाहार द्वन्द्व करावा असा निर्बंध आहे. उदा—पाणिपादम्, रथिकाश्वारोहम्, यूका लिक्षम्, अहिनकुलम्, धानाशष्कुलि, मार्दङ्गिकपाणविकम्।

४ प्रतिदिनं बालः पितरौ (मातरं पितरं च) नमेत्।
धृष्टद्युम्नः द्रौपदी च भ्रातरौ (भ्राता च स्वसा च) भवतः।
वर्षाकाले मयूरौ (मयूरः मयूरी च) नृत्यतः।

वरील वाक्यांत 'पितरौ, भ्रातरौ व मयूरौ' हे द्विवचनान्त शब्द स्त्रीवाचक व पुरुषवाचक अशा निकट संबद्ध अशा दोन दोन व्यक्तींबद्दल योजिले गेल्याबद्दल आले आहेत हें वरील दिलेल्या शब्दांवरून ध्यानांत येईल. संस्कृतमध्यें स्त्रीवाचक व पुरुषवाचक अशा दोन शब्दांचा समास करून त्यांमधील पुरुषवाचक शब्द मात्र द्विवचनांत योजण्याची पद्धति आहे. ह्या समासास एकशेषवृत्ति म्हणतात.

## अव्ययीभाव

५ प्रतिदिनं (दिने दिने) नरस्य आयुः क्षीयते।
भक्तः यथाविधि (विधिम् अनतिक्रम्य) पूजयति देवम्।
उपकृष्णं (कृष्णस्य समीपे) तिष्ठन्ति धेनवः।

वरील वाक्यांत 'प्रतिदिनं, यथाविधि व उपकृष्णम्' हे सामासिक शब्द अव्ययाचें काम करतात व त्यांचा प्रथम शब्द हा अव्यय आहे. अशा समासांना अव्ययीभाव असें म्हणतात. अव्ययीभाव समासाचा उपयोग नित्य

१० स्वर्गात्परावृत्त —स्व[illegible]या शुभास्पद नि[illegible]
दुष्कृत्यांपासून [illegible] म्हटलेला आहे

## अभ्यास २

पुढील वाक्यांत जाड्या अक्षरांतील शब्दांच्या ठिकाणी द्वन्द्व अथवा अव्ययीभाव समास योजा —

१ **सूर्यस्य हिमवायोः** च स्वस्वमहत्त्वविषये महान् संघर्षः जातः ।
२ **गङ्गायाः पारं** गन्तुं यात्रिकैः नावः उपयुज्यन्ते ।
३ **अहनि अहनि** गायन्ति भक्ताः ईशगुणान् मुदा ।
४ **रूपेण यौवनेन दाक्षिण्येन** च युक्ता राजपुत्री स्वयंवरार्थम् आगता ।
५ **पत्तिभिः अश्वारोहैः गजस्थैः रथिकैः** च सह प्रस्थितः वीरः ।
६ **सत्यं दानम् अनालस्यं** च नरस्य भूषणानि भवन्ति ।
७ **यथा विधि** वर्तते तथा एतान् बालान् सम्मानय ।
८ शयनात् उत्थितः नरः प्रथमं **हस्तौ पादौ नयने** च प्रक्षालयेत् ।
९ **क्रमम् अनुसृत्य** छात्र गुरून् नमन्
१० **सुहृदः सम्बन्धिनः बान्धवान्** च हन्तुं अर्जुनः रणक्षेत्रे योद्धुम् उद्यतः न अभवत् ।

---

# पाठ ३३.

## समास—तत्पुरुष व कर्मधारय.

### तत्पुरुष

१ **राजपुरुषैः चोरः गृहीतः ।**
**शङ्खनादेन युद्धारम्भः सूच्यते ।**
**विद्युत्प्रकाशः चन्द्रलेखा इव भाति ।**

वरील वाक्यांमध्ये **राजपुरुष , शङ्खनाद , युद्धारम्भ , विद्युत्प्रकाश** व **चन्द्रलेखा** हे सामासिक शब्द आहेत. या समासांतील पहिले पद द्वितीय

पदाचा अर्थ मर्यादित करतें, जसें—कोणीतरी पुरुष नव्हे तर राजाचा पुरुष (अधिकारी), कसला तरी आरंभ नव्हे तर युद्धाचा आरंभ इ. या समासांतील निरनिराळीं पदें उपयोगांत आणावयाचीं झाल्यास तीं भिन्न भिन्न विभक्तींत योजावीं लागतील. अशा समासांना तत्पुरुष समास म्हणतात व विग्रहांतील प्रथम पदाच्या विभक्तीवरून त्या त्या विभक्तीचा तत्पुरुष असें म्हणतात. म्हणजे वरील तत्पुरुष समास षष्ठी तत्पुरुष होतील. शिवाय या समासाचा उपयोग शेवटच्या शब्दाच्या जातीप्रमाणें केला जातो. जसें पुरुष, लेखा व आरम्भ हे शब्द नामें असल्यामुळें समासाचा उपयोग नामाप्रमाणें केलेला आहे. षष्ठी तत्पुरुष हा तत्पुरुष समासाचा सामान्य प्रकार आहे.

२ (अ) कृष्णाश्रितान् पाण्डवान् जेतुं कौरवाः असमर्थाः।

(आ) पञ्जरगतस्य शुकस्य स्वातन्त्र्यं नष्टं भवति।

(इ) वर्षभोग्यः शापः यक्षेण सोढः।

(ई) शरविद्धं श्रावणं दृष्ट्वा दशरथः शोकार्तः जातः।

(उ) दध्यन्नं गृहीत्वा पथिकः ग्रामान्तरं प्रस्थितः।

(ऊ) द्रविणान्धः नरः आपद्गतं नरं हसति।

(ऋ) कुण्डलहिरण्यं दत्तं पित्रा पुत्राय।

(ॠ) गृहमेधी प्रतिदिनं भूतबलिं दद्यात्।

वरील अ, आ व इ या वाक्यांमध्यें 'कृष्णाश्रिताः, पञ्जरगतः व वर्षभोग्यः' या समासाचा अर्थ पूर्ण असून त्याचा उपयोग शेवटच्या शब्दाच्या जातीप्रमाणें केलेला आहे. यांतील पहिले शब्द द्वितीया विभक्तीनें द्वितीय पदाचा अर्थ मर्यादित करतात. यांना द्वितीया तत्पुरुष समास म्हणतात.

तसेंच ई, उ व ऊ या वाक्यांत शरविद्धः, दध्यन्नम् व द्रविणान्धः हेही तृतीया तत्पुरुष समास आहेत, कारण यांतील प्रथमपदें द्वितीयपदाशीं तृतीयेनें संबद्ध आहेत.

त्याचप्रमाणें ऋ व ॠ मधील कुण्डलहिरण्यम् व भूतबलिः हे चतुर्थी तत्पुरुष समास आहेत, कारण यांचीं प्रथमपदें द्वितीयपदाशीं चतुर्थी विभक्तीनें संबद्ध आहेत.

३ (अ) सुखापेतः नरः सर्वदा निर्विण्णः दृश्यते।

(आ) धनुर्मुक्तं बाणं प्रतिसंहर्तुम् अशक्यम्।

(इ) जालबद्धः सिंहः उच्चैः अगर्जत्।

(ई) वृक्षपक्वानि फलानि स्वादुतमानि सन्ति।

वरील अ व आ या वाक्यांतील **सुखापेतः** व **धनुर्मुक्तः** या तत्पुरुष समासांतील प्रथमपदें द्वितीयपदाशीं पंचमी विभक्तीनें संबद्ध आहेत, म्हणून त्यांना पंचमी तत्पुरुष असें म्हणतात.

त्याचप्रमाणें इ व ई या वाक्यांमधील **जालबद्धः** व **वृक्षपक्वानि** हे सप्तमी तत्पुरुष समास आहेत. कारण **जाल** व **वृक्ष** हीं प्रथम पदें **बद्ध** व **पक्व** या द्वितीय पदांशीं सप्तमीचा संबंध दर्शवितात.

## कर्मधारय

४ (अ) व्याघ्रस्य स्तनितगम्भीरां गर्जनां श्रुत्वा पथिकः भीतिग्रस्तः जातः।

(आ) भवसागरम् उत्तरितुं भक्तिः एव सुलभं साधनं भवति।

(इ) दमयन्ती पुरुषव्याघ्रं नलं भर्तारम् अवृणीत।

(ई) सुरभिकुसुमानि सर्वेभ्यः रोचन्ते।

(उ) शीतवायुः निदाघकाले आह्लादकः।

(ऊ) हिमाचलस्य उत्तुङ्गशिखराणि दुरारोहाणि सन्ति।

वरील वाक्यांतील **स्तनितगम्भीरा, भवसागरः, पुरुषव्याघ्रः, सुरभिकुसुमानि, शीतवायुः** व **उत्तुङ्गशिखराणि** या समासांचा अर्थ पूर्ण आहे, व त्यांचा वाक्यांत उपयोग अन्य शब्दांच्या नात्याप्रमाणें झाला आहे. **स्तनितगम्भीरा** यांतील द्वितीयपद **गम्भीर** हें विशेषण आहे, म्हणून समास **गर्जना** या नामाचें विशेषण म्हणून योजलेला आहे. **भवसागरः** यांतील द्वितीयपद नाम आहे, म्हणून समासाचा उपयोग नामासारखा झाला आहे. परंतु या सर्व

समासातील प्रथमपदें द्वितीयपदाशीं प्रथमा विभक्तीचा संबंध दर्शवितात, म्हणून यास प्रथमा तत्पुरुष किंवा समानाधिकरण तत्पुरुष अथवा कर्मधारय अशी संज्ञा आहे.

**स्तनितम् इव गम्भीरम्** यांतील प्रथमपद हें **उपमानदर्शक** (ज्याची उपमा द्यावयाची तें अथवा उपमीयते अनेन तद् उपमानम्) आहे व **गम्भीर** हा शब्द साधर्म्यवाचक विशेषण आहे. अशा समासास **उपमानपूर्वपद कर्मधारय** असे म्हणतात. विग्रहात **इव** हें अव्यय नेहमीं उपमानवाचक शब्दानंतर योजतात. **भयसागरः** व **पुरुषव्याघ्रः** यांतील **भयः** व **पुरुषः** हीं प्रथमपदें **उपमेयें** (ज्याला उपमा द्यावयाची तें अथवा उपमातुं योग्यानि) आहेत, व द्वितीयपदें **सागरः** व **व्याघ्रः** हीं उपमानें आहेत. यास उपमेयोपमान कर्मधारय असे म्हणतात. विग्रहामध्ये **उपमेय** व **उपमान** यामध्यें **यथा** हें अव्यय अथवा उपमानानंतर **इव** हें अव्यय योजतात.

**सुरभिकुसुमानि, शीतवायुः** व **उत्तुङ्गशिखराणि** यामध्यें प्रथमपदें विशेषण व द्वितीयपदें विशेष्यें आहेत. यास विशेषणविशेष्य कर्मधारय असे म्हणतात.

कर्मधारय समासाचे वरील तीन मुख्य प्रकार आहेत. तेव्हां विशेषण-विशेष्य, उपमेय-उपमान व उपमान-साधर्म्य अशा तऱ्हेच्या अर्थांच्या निर-निराळ्या शब्दांबद्दल कर्मधारय समास योजता येतो.

वरील द्वितीया ते सप्तमी तत्पुरुष व कर्मधारय हे एकाच तत्पुरुष समासाचे प्रकार आहेत हें ध्यानांत येईल, कारण (१) अर्थ समासांतच पूर्ण होतो, (२) प्रथम पद द्वितीय पदाचा अर्थ निश्चित करतें व (३) सर्व समासाची जाति अन्त्य पदाच्या जातीवर अवलंबून असते. परंतु प्रथम पदाचा द्वितीय पदाशीं संबंध जर द्वितीया ते सप्तमी या विभक्तींनीं दाखविता येत असेल तर त्यास द्वितीया ते नाम. तत्पुरुष म्हणतात व जर प्रथमा विभक्तीनें दाखविता येत असेल तर कर्मधारय असे म्हणतात.

## अभ्यास १

खालील वाक्यांचा व त्यांच्या अर्थ सांगून त्यांतील तत्पुरुष व कर्मधारय समासांचा विग्रह करा—

१ अथ प्रभाभास्वरो भगवान् भानुरसुना दिवसनिशो रत्नानामिरिव नभस्तलमध्यमध्यारोहति ।

३ (अ) सुखापेतः नरः सर्वदा निर्विण्णः दृश्यते ।

(आ) धनुर्मुक्तं बाणं प्रतिसंहर्तुम् अशक्यम् ।

(इ) जालबद्धः सिंहः उच्चैः अगर्जत् ।

(ई) वृक्षपक्वानि फलानि स्वादुतमानि सन्ति ।

वरील अ व आ या वाक्यांतील **सुखापेतः** व **धनुर्मुक्तः** या तत्पुरुष समासांतील प्रथमपदें द्वितीयपदांना पंचमी विभक्तीनें संबद्ध आहेत, म्हणून त्यांना पंचमी तत्पुरुष असें म्हणतात.

त्याचप्रमाणें इ व ई या वाक्यांतील **जालबद्धः** व **वृक्षपक्वानि** हे सप्तमी तत्पुरुष समास आहेत, कारण **जाल** व **वृक्ष** हीं प्रथम पदें बद्ध व **पक्व** या द्वितीय पदांशीं सप्तमीचा संबंध दर्शवितात.

## कर्मधारय

४ (अ) व्याघ्रस्य स्तनितगम्भीरां गर्जनां श्रुत्वा पथिकः भीतिग्रस्तः जातः ।

(आ) भवसागरम् उत्तरितुं भक्तिः एव सुलभं साधनं भवति ।

(इ) दमयन्ती पुरुषव्याघ्रं नलं भर्तारम् अवृणीत ।

(ई) सुरभिकुसुमानि सर्वेभ्यः रोचन्ते ।

(उ) शीतवायुः निदाघकाले आह्लादकः ।

(ऊ) हिमाचलस्य उत्तुङ्गशिखराणि दुरारोहाणि सन्ति ।

वरील वाक्यांतील **स्तनितगम्भीरा, भवसागरः, पुरुषव्याघ्रः, सुरभिकुसुमानि, शीतवायुः** व **उत्तुङ्गशिखराणि** या समासांचा अर्थ पूर्ण आहे, व त्यांचा वाक्यांत उपयोग अन्त्य शब्दाच्या नात्याप्रमाणें झाला आहे. **स्तनितगम्भीरा** यांतील द्वितीयपद **गम्भीर** हें विशेषण आहे, म्हणून समासही **गर्जना** या नामाचें विशेषण म्हणून योजलेला आहे. **भवसागरः** यांतील द्वितीयपद नाम आहे, म्हणून समासाचा उपयोग नामासारखा झाला आहे. परंतु या सर्व

समासातील प्रथमपदें द्वितीयपदाचा प्रथमा विभक्तीचा संबंध दर्शवितात, म्हणून यास प्रथमा तत्पुरुष किंवा समानाधिकरण तत्पुरुष अथवा कर्मधारय अशी संज्ञा आहे.

**स्तनितम् इव गम्भीरा** यांतील प्रथमपद हें **उपमानदर्शक** ( ज्याची उपमा द्यावयाची तें अथवा उपमीयते अनेन तद् उपमानम् ) आहे व **गम्भीर** हा शब्द साधर्म्यवाचक विशेषण आहे. अशा समासास उपमानपूर्वपद कर्मधारय असे म्हणतात. विग्रहांत **इव** हें अव्यय नेहमीं उपमानवाचक शब्दानंतर योजतात. **भवसागरः** व **पुरुषव्याघ्रः** यांतील **भवः** व **पुरुषः** हीं प्रथमपदें **उपमेयें** (ज्यास उपमा द्यावयाची तीं अथवा उपमातुं योग्यानि ) आहेत, व द्वितीयपदें **सागरः** व **व्याघ्रः** हीं उपमानें आहेत. यास उपमेयोपमान कर्मधारय असें म्हणतात. विग्रहामध्ये **उपमेय** व **उपमान** यामध्यें **एव** हें अव्यय अथवा उपमानानंतर **इव** हें अव्यय योजतात.

**सुरभिकुसुमानि, शीतवायुः** व **उत्तुङ्गशिखराणि** यामध्यें प्रथमपदें विशेषणें व द्वितीयपदें विशेष्यें आहेत. यास विशेषणविशेष्य कर्मधारय असें म्हणतात.

कर्मधारय समासाचे वरील तीन मुख्य प्रकार आहेत. केव्हा विशेषण-विशेष्य, उपमेय-उपमान व उपमान-साधर्म्य अशा व हेच्या अर्थांच्या निर-निराळ्या शब्दांबद्दल कर्मधारय समास योजता येतो.

वरील द्वितीया ते सप्तमी तत्पुरुष व कर्मधारय हे एकाच तत्पुरुष समासाचे प्रकार आहेत हे ध्यानात येईल, कारण (१) अर्थ समासांतच पूर्ण होतो, (२) मागचें पद द्वितीय पदाचा अर्थ निश्चित करतें व (३) सर्व समासाची जाति अन्त्य पदाच्या जातीवर अवलंबून असते. परंतु प्रथम पदाचा द्वितीय पदाशी संबंध जर द्वितीया ते सप्तमी या विभक्तींनी दाखविता येत असेल तर त्यास द्वितीया ते सप्तमी तत्पुरुष म्हणतात व जर प्रथमा विभक्तीनें दाखविता येत असेल तर कर्मधारय असें म्हणतात.

## अभ्यास १

पुढील वाक्यांचा व श्लोकांचा अर्थ सांगून त्यांतील तत्पुरुष व कर्मधारय समासांचा विग्रह करा —

१ अथ प्रभाभास्वरो भगवान् भानुरद्युना दिवसश्रियो रत्नाभरणमिव नभस्तलमध्यमलङ्करोति ।

# पाठ ३४.

## समास—बहुव्रीहि.

१. ( यस्य अम्बरं पीतं सः ) विष्णुः अस्मान् पातु ।
पीताम्बरः „ „ „
( येन प्रतिज्ञा कृता सः ) अर्जुनः जयद्रथं हतवान् ।
कृतप्रतिज्ञः „ „ „
( दश आननानि यस्य सः ) रावणः सीताम् अपाहरत् ।
दशाननः „ „ „

वरील वाक्यांमध्यें पीताम्बरः, कृतप्रतिज्ञः व दशाननः या समासांचा उपयोग विष्णुः, अर्जुनः व रावण. या नामांचीं विशेषणें म्हणून केलेला आहे. या समासांचीं अन्त्यपदें नामें आहेत. शिवाय, समासांच्या फक्त दोन्ही पदांचाच अर्थ केला, जसें—पिवळें वस्त्र, केलेली प्रतिज्ञा व दहा तोंडें, तर त्या समासाचा तो अर्थ वाक्यांत उपयुक्त होत नाहीं. परंतु पीतवस्त्रयुक्त असा विष्णु हा अर्थ केला तर तो बरोबर होऊन सर्व समासाचा तृतीय पदार्थाशीं ( विष्णु या शब्दाशीं ) संबंध दर्शवितो. जसें—पीताम्बरयुक्त असा विष्णु, ज्यानें प्रतिज्ञा केली आहे असा अर्जुन, दशाननयुक्त असा रावण

या समासांना बहुव्रीहि असें म्हणतात. त्यांचीं लक्षणें —

१ समासाचा अर्थ समासांत नसणाऱ्या तृतीय पदाशीं संबद्ध असतो व केवळ दोन पदांचाच अर्थ केल्यास तो योग्य होत नाहीं.

२ शेवटचें पद नामवाचक असून सर्व समासाचा उपयोग विशेषणासारखा केलेला असतो.

वरील वाक्यांमध्यें दिलेल्या समासांच्या विग्रहावरून हें दिसून येतें कीं विग्रहांमध्यें यद् या सर्वनामाचें रूप असतें व तें ज्या विभक्तींत असतें त्या विभक्तीचा बहुव्रीहि समास असें म्हणतात. जसें—पीताम्बर व दशानन हे षष्ठी बहुव्रीहि व कृतप्रतिज्ञ हा तृतीया बहुव्रीहि. वरील समासांच्या विग्रहावरून

८ प्रचण्डसूर्य स्पृहणीयचन्द्रमा सदावगाहक्षमवारिसञ्चय ।
दिनान्तरम्याऽभ्युपशान्तमानसा निदाघकाल समुपागत प्रिये ।

९ धर्मार्थं क्षीणवित्तस्य क्षीणत्वमपि शोभते ।
सुरै पीतावशेषस्य कृष्णपक्षे विधोरिव ॥

१० व्रजन्ति ते मूढधिय पराभव भवन्ति मायाविषु ये न मायिन ।
प्रविश्य हि घ्नन्ति शठास्तथाविधानसवृताङ्गान्निशिता इवेषव ॥

## टीपा

५ मावमंस्था — मा अवमन्यस्व

७ श्रीकृष्णाच्या विश्वरूपाला उद्देशून अर्जुनाने म्हटलेला श्लोक

## अभ्यास २

पुढील वाक्यांत जाड्या अक्षरांतील शब्दसमुच्चयाबद्दल बहुव्रीहि समास योजा —

१ **येन महाश्वेताया वृत्तान्त श्रुत** स चन्द्रापीड शोकेन आर्त अभवत् ।

२ **याभ्य अभय प्रतिश्रुत तासाम्** अप्सरसा पुरूरवा रक्षणम् अकरोत् ।

३ **यस्य हस्ते खड्ग आसीत्** स राम **यस्य नाम शम्बूक** त तप आचरन्त शूद्र हतवान् ।

४ **यस्मिन् राज्यधुरा निहिता** स भरत सम्यक् प्रजापालनम् अकरोत् ।

५ **यस्या आनन चन्द्र इव** ता शकुन्तला दृष्ट्वा दुष्यन्त ता परिणेतुम् ऐच्छत् ।

६ **येन धनु त्यक्त** तस्य द्रोणस्य मूर्धान धृष्टद्युम्न चिच्छेद ।

७ **चत्वारि मुखानि यस्य कमल च नाभौ यस्य** त ब्रह्माण देवा शरण जग्मु ।

८ **याभ्या श्रावणस्य वधवार्ता निवेदिता** तौ दम्पती दशरथम् अशपताम् ।

९ **यस्य मौलौ गङ्गा वर्तते** स शिव अर्जुनेन सह अयुध्यत ।

१० **येषाम् आत्मा महान् अस्ति** तथा चरित्रविभूषण भवन्त्य सन्ति ।

# पाठ ३५.

## प्रयोजक क्रियापदें.

| | प्रथम विभाग | द्वितीय विभाग |
|---|---|---|
| १ | गोपालः अध्ययनम् आरभते । | पिता गोपालेन अध्ययनम् आरम्भयति । |
| | बालः गणेशं नमति । | गुरुः बालेन गणेशं नामयति । |
| | मालाकारः जलं सिञ्चति । | स्वामी मालाकारेण जलं सेचयति । |

वरील वाक्यांतील प्रथम विभागांतील वाक्यामध्यें, **गोपालः**, **बालः** व **मालाकारः** हे स्वतः होऊन क्रिया करतात असें दर्शविलें आहे; व द्वितीय विभागांतील वाक्यामध्यें ते स्वतः क्रिया करतात असा अर्थ नसून **पिता**, **गुरुः** व **स्वामी** हे त्यांच्याकडून क्रिया करवून घेतात असा अर्थ दर्शविला जातो. यावरून प्रथम विभागांतील वाक्यांना मूळ वाक्यें व द्वितीय विभागांतील वाक्यांना प्रयोजक वाक्यें असें म्हणतात.

क्रियेच्या मूळ कर्त्याकडून दुसरा कोणी तरी ती क्रिया करवितो असा अर्थ दर्शविणें झाल्यास प्रयोजक क्रियापदांचा उपयोग करतात.

वरील मूळ वाक्यें व त्यांचीं प्रयोजक वाक्यें यांकडे लक्ष दिल्यास असें दिसून येईल कीं मूळ वाक्यांचें प्रयोजकांत रूपान्तर होतांना मूळ कर्तृपदाची तृतीया विभक्ति झाली आहे, मूळ कर्मपद द्वितीयेंत योजलेलें आहे व प्रयोजक कर्तृपदाला अनुरूप असें मूळ धातूचें प्रयोजक असें क्रियापद योजलेलें आहे. प्रयोजक क्रियापदांकडे नजर दिल्यास असें दिसून येईल कीं मूळ धातूला दशम गणाच्या विकरणाप्रमाणें 'अय' जोडून प्रयोजक रूपें बनविण्यांत आलीं आहेत. सामान्यतः प्रयोजक क्रियापदें दशम गणाच्या क्रियापदाप्रमाणें उभयपदी असतात. शिवाय दुसरी विशेष लक्षांत ठेवण्याची गोष्ट म्हणजे वरील वाक्यांतील मूळ क्रियापदें सकर्मक आहेत.

## अभ्यास २

( अ ) पुढील वाक्यांची प्रयोजक वाक्यरचना बनवा —
१ दूतः राज्ञे वार्तां कथयति ।
२ स्वामी अविनीताय भृत्याय अकुप्यत् ।
३ वसिष्ठः दूतं भरतम् आनेतुं नन्दिग्रामं व्यसृजत् ।
४ धात्री बालं पुष्यतु ।
५ निशागमे बालाः क्रीडायाः विरमन्ति ।

( आ ) पुढील प्रयोजक वाक्यांची मूळ वाक्यें बनवा —
१ जनकः यथोचितं सर्वान् नृपान् महार्हासनेषु संन्यवेशयत् ।
२ दुर्योधनः पुरोचनेन पाण्डवानां निवासभूतं जतुगृहम् अदाहयत् ।
३ पुत्रः पितरं सुचरितैः तोषयति ।
४ सूर्यः अरुणेन नभांसि विभेदयति ।
५ क्षोभं जनयते नृपाम् ।

---

# पाठ ३६.

## तरतमभाव.

१ यमुना नदी दीर्घा । गोदावरी तस्याः दीर्घतरा अथवा द्राघीयसी । गङ्गा तु सर्वासु नदीषु अथवा सर्वासां नदीनां दीर्घतमा अथवा द्राघिष्ठा ।

सह्याद्रिः तुङ्गः । तस्मात् तुङ्गीयान् अथवा तुङ्गतरः विन्ध्यः । हिमालयः तु सर्वेषु पर्वतेषु अथवा सर्वेषां पर्वतानां तुङ्गिष्ठः अथवा तुङ्गतमः ।

रथस्य वेगः महान् । अग्निरथस्य वेगः शकटस्य वेगात् महीयान् महत्तरः वा । विद्युद्रथस्य वेगः तु महिष्ठः महत्तमः वा ।

वरील तीन वाक्यसमुदायांमध्यें विशेषणाचा उपयोग केलेला आहे. प्रत्येक

समूहातील पहिल्या वाक्यात मूळ विशेषण योजलेलें आहे, दुसऱ्या वाक्यात दोन वस्तूंमध्यें अथवा गुणामध्यें तुल्ना दर्शविणारें असें दोन प्रकारचें रूप दाखविलेलें आहे, व तिसऱ्या वाक्यामध्यें दोहोंहून अधिकांची तुल्ना करून सर्वांत श्रेष्ठ अशा अर्थाचीं रूपें योजिलेलीं आहेत जसें—

दीर्घा — दीर्घतरा–द्राघीयसी — दीर्घतमा–द्राघिष्ठा।
गुरुः — गुरुतरः–गरीयान् — गुरुतमः–गरिष्ठः।
महान्— महत्तरः–महीयान् — महत्तमः–महिष्ठः।

वरील गुणविशेषणाचे रूपावरून असें दिसून येईल कीं दोहोंमधील तुल्नादर्शक रूप मूळ विशेषणाला तर् अथवा ईयस् हे प्रत्यय जोडून करता येतें व सर्वांत श्रेष्ठ अशा अर्थाचें तुल्नात्मक रूप तम अथवा इष्ठ हे प्रत्यय लावून करता येतें

वरील वाक्यांच्या रचनेकडे लक्ष दिल्यास असें दिसून येईल कीं दोहोंमधील तुल्नात्मक विशेषणाचें रूप उपयोगात आणताना ज्याच्याहून आधिक्य दर्शवावयाचें असेल त्याची पंचमी विभक्ति योजतात, असें–तस्याः, तस्मात् इत्यादि, व दोहोंहून अधिक वस्तूंची तुल्ना केली असता ज्यामध्यें श्रेष्ठत्व दर्शविणें असेल त्याची षष्ठी अथवा सप्तमी विभक्ति योजतात, जसें—पर्वतेषु–पर्वतानाम्। नदीषु–नदीनाम् इत्यादि.

२ पलायनात् मृत्युः अभिमततरः शूरस्य।
सर्वेषां प्राणिनाम् अभिमततमं जीवितं सर्वेषु वस्तुषु अस्मिन् जगति।
विषात् अपि घातकतरं दुर्जनवचनम्।
कर्णः दातृतमः सर्वेषु इति पुराणेषु प्रसिद्धम्।

वरील वाक्यांत तारतम्यवाचक रूपें फक्त तर व तम जोडून झालेलीं आहेत ईयस् व इष्ठ हे प्रत्यय लावलेले नाहीत, कारण दीर्घ, गुरु व महत् या गुणविशेषणांप्रमाणें अभिमत, घातक व दातृ हीं गुणविशेषणें नाहीत परंतु उपयोग करण्याची पद्धति मात्र एकच आहे

३ गोविन्दः उच्चैः वाचयति । रामः उच्चैस्तरां वाचयति ।
कृष्णः सर्वेषु बालेषु उच्चैस्तमां वाचयति ।
अश्वः शनैः गच्छति । गजः शनैस्तरां गच्छति ।
उष्ट्रः शनैस्तमां गच्छति ।
रामः गोविन्दात् पारितोषिकाणि लभतेतराम् ( अधिकानि लभते ) ।
रामः सर्वेषु वीरेषु विजयतेतमाम् ( भृशं विजयते ) ।

वरील वाक्यातही तरतमभाव दर्शविला आहे परंतु तर व तम हे प्रत्यय न लावता, तराम् व तमाम् असे प्रत्यय जोडलेले आहेत, कारण ज्यांना प्रत्यय जोडावयाचे ते शब्द क्रियाविशेषणें व क्रियापदें आहेत.

४ उच्चैस्तरः नादः । उच्चैस्तमः नादः ।
शीघ्रतरा गतिः । शीघ्रतमा गतिः ।

वरील उदाहरणावरून हें ध्यानात येईल की क्रियाविशेषणाला तर व तम हे प्रत्यय जोडले असता क्रियाविशेषणाचें विशेषणात रूपान्तर होतें

वरील सर्व विवेचनावरून हें ध्यानात येईल की गुणविशेषणाला तरतमभाव तर–तम अथवा ईयस्–इष्ठ हे प्रत्यय जोडून दर्शविता येतो, इतर शब्दांना तर–तम हे प्रत्यय जोडून दर्शविता येतो, मात्र क्रियापदें व क्रियाविशेषणांना जोडताना तरबद्दल तराम् व तमबद्दल तमाम् असा फरक होतो.

५ लोकोत्तराणां चेतांसि कुसुमात् अपि मृदूनि वज्रात् अपि कठोराणि च सन्ति ।
पक्षात् सत्यं विशिष्यते ।

वरील वाक्यांवरून असे दिसून येईल की तुलनात्मक अर्थ दर्शविताना ( तर–तम प्रत्ययान्त विशेषणावाचून इतर शब्दांनी ) ज्याच्याहून ज्यास्त असा अर्थ दर्शवावयाचा असेल त्या अर्थाच्या शब्दाची पंचमी विभक्ति योजतात.

टीप—तारतम्यवाचक रूपें केवळ आधिक्य दर्शविण्यासाठीच साध्या विशेषणाऐवजी योजण्याचाही प्रघात आहे.

९ स्वैराचारप्रवर्तनवर्णनम्—मनाला वाटेल त्याप्रमाणें वागण्याची बदी (स्वैरस्य आचारस्य प्रवर्तनस्य वर्णनम्)
१० अर्जुनानें कृष्णाला विचारलेला प्रश्न

## अभ्यास २

पुढील वाक्यांत तारतम्यवाचक रूपें योजा —

१ भीम युधिष्ठिरात् ——। सर्वेषां कुन्तीपुत्राणां तु अर्जुन ——।
२ राम लक्ष्मणस्य —— भ्राता। भरतस्तु ——।
३ बलीवर्दात् अश्व ——।
४ सर्वेषु पशुषु गज आकारेण ——।
५ विद्यमानेषु विविधेषु मार्गेषु —— मार्गेण गच्छन् नर शीघ्र गृह प्राप्नोति।
६ उष्ण वालुकानिकर जनानां चरणतल अग्ने अपि ——।
७ भारतवर्षे सर्वासां नदीनां भागीरथी विस्तारे ।
८ सिंहात् अपि कदाचित् मृग गच्छति।
९ पौरुषात् दैव इति निश्चित्य केचित् नरा उद्यम न कुर्वन्ति।
१० उष्ट्रस्य ग्रीवाया गजस्य ग्रीवा ।

---

# पाठ ३७.

## कर्मणि विध्यर्थक धातुसाधित विशेषणें.

१ छात्र अध्ययन कुर्यात्।
छात्रेण अध्ययन कर्तव्यम् कार्यम् वा।
नर उपकारान् स्मरेत्।
नरेण उपकारा स्मरणीया -स्मर्तव्या वा।

पिता कन्यायै भूषणानि यच्छेत्।

पित्रा कन्यायै भूषणानि दातव्यानि-देयानि वा।

ही पूर्वोक्त तीन वाक्यें दोन निरनिराळ्या तऱ्हांनी लिहिलेलीं आहेत. पहिल्या प्रकारांत विध्यर्थाचा उपयोग केलेला आहे व त्यांत सकर्मक क्रियापदें आहेत दुसऱ्या प्रकारामध्यें त्याच धातूंचीं कर्मणि विध्यर्थक धातुसाधितें योजलेलीं आहेत व रचना कर्मणि तऱ्हेची आहे. जसें **छात्रः** याबद्दल **छात्रेण, अध्ययनं** या द्वितीयेबद्दल **अध्ययनं** ही प्रथमा व त्याला अनुरूप असें **कर्तव्यम्** किंवा **कार्यम्** हें रूप

वरील कर्मणि विध्यर्थक धातुसाधितें हीं अकारान्त विशेषणासारखीं उपयोगांत आणलीं जातात. जसें—अध्ययनम्-कर्तव्यम् । उपकाराः-स्मर्तव्याः । भूषणानि-दातव्यानि ।

त्याचप्रमाणें असें दिसून येईल कीं कर्मणि विध्यर्थक धातुसाधितें **तव्य, अनीय** अथवा य हे प्रत्यय धातूला जोडून बनविलीं जातात.

२ विपदि सज्जनाः उच्चैः तिष्ठेयुः ।

विपदि सज्जनैः उच्चैः स्थातव्यम्-स्थेयं वा ।

पथिकः क्षुण्णात् वर्त्मनः न प्रविचलेत् ।

पथिकेन क्षुण्णात् वर्त्मनः न प्रविचलितव्यम् ।

गृहवासिनः परस्परस्मिन् स्नेहेन वर्तेरन्-व्यवहरेयुः वा ।

गृहवासिभिः परस्परस्मिन् स्नेहेन वर्तितव्यम्-व्यवहर्तव्यं वा ।

प्रजाः राज्ञः विजयेन मोदेरन् ।

प्रजाभिः राज्ञः विजयेन मोदितव्यम् ।

वरील वाक्यांमध्यें अकर्मक क्रियापदांच्या कर्मणि विध्यर्थक धातुसाधिताचा उपयोग केलेला आहे. त्यामुळें मूळ वाक्यांतील कर्तृपद तृतीयेंत योजलेलें आहे व कर्म नसल्यामुळें कर्मणि विध्यर्थक धातुसाधित विशेषणाचें रूप नपुंसकलिंगी प्रथमेचे एकवचनाप्रमाणें योजलेलें आहे जसें—सज्जनाः-सज्जनैः । तिष्ठेयुः -स्थातव्यम्-स्थेयम् । गृहवासिनः-गृहवासिभिः । वर्तेरन्-वर्तितव्यम् । इत्यादि

८ कार्यं कर्तुम् उद्यतेन नरेण प्रथमं परिणतिः ——— ।
९ सज्जनेन अहिताभिनिवेशं मित्रं ——— ।
१० स्वधर्मे विहितं कर्म नरेण ——— ।

### टीपा

७ उत्तिष्ठमानः-प्रबल होणारा, वाढणारा. (उद्+स्था याचें व० का० धा० वि०)
९ अहिताभिनिवेशः ( मित्रम् )-अहितकारक गोष्टींच्या ठिकाणीं ज्याची आसक्ति आहे असा.

---

## पाठ ३८.

## द्वितीयभूतकाळ ( परोक्षभूतकाल ) व द्वितीय-भूतकाळवाचक धातुसाधित विशेषणें.

१ पुरा किल रघुः नाम नृपः बभूव ।
अजः बाष्पगद्गदं विललाप ।
महाश्वेता कादम्बरीं सोत्कण्ठं कण्ठे जग्राह ।

वरील वाक्यांतील क्रिया भूतकालीन आहेत; परंतु तो फार प्राचीन काळ आहे. म्हणून प्रथमभूतकाळाचीं रूपें योजलेलीं नाहींत, तर **बभूव, विललाप व जग्राह** अशीं *द्वितीयभूतकालवाचक रूपें* योजलेलीं आहेत. वरील वाक्यांतील क्रिया इतक्या प्राचीन काळच्या आहेत कीं वर्णन करणारानें त्या पाहिलेल्या नाहींत. अशा तऱ्हेच्या फार प्राचीन काळीं अथवा परोक्ष घडलेल्या क्रिया दाखविण्याकरितां *द्वितीयभूतकाळाचा* उपयोग केला पाहिजे. परंतु संस्कृत ग्रन्थकार हा भेद फारसा पाळीत नाहींत. ते कोणताही भूतकाळ योजतात. जसें—

**अत्रान्तरे कञ्चुकी महाश्वेताम् अवोचत् ।**
**महाश्वेता चन्द्रापीडः क आस्ताम् इति कादम्बरीमपृच्छत् ।**
**पश्चात्सा गन्धर्वराजं द्रष्टुं ययौ ।**

वरील वाक्यें एकाच संदर्भांतील घेतलेलीं आहेत. त्यांत **अवोचत्** हें तृतीय-भूतकाळाचें रूप, **अपृच्छत्** हें प्रथमभूतकाळाचें रूप व **ययौ** हें द्वितीय-भूतकाळाचें रूप अशीं तीन्ही भूतकाळाच्या प्रकारांचीं रूपें आलीं आहेत यावरून असें दिसतें कीं संस्कृत ग्रन्थकर्ते भूतकाळाच्या तीन प्रकारांतील भेद न मानता त्यांच्या जरूरीप्रमाणें वाटेल तसा उपयोग करतात.

२ **अहं गृहम् अगच्छम् ।** ( जगाम नव्हे )
**वयं चिरं अक्रीडाम ।** ( चिक्रीडिम नव्हे )
**आवाम् अध्ययनम् अकुर्व ।** ( चकृव नव्हे )

वरील उदाहरणावरून असें दिसून येईल कीं द्वितीयभूताचा प्रथमपुरुषामध्यें उपयोग करता येत नाहीं.

परंतु

**सुप्तः अहं बहु विललाप ।**
**उन्मत्ताः वयं गुरुं निनिन्दिम ।**

वरील वाक्यांत प्रथमपुरुषी कर्त्यांबरोबर द्वितीयभूतकाळाच्या रूपाचा उपयोग केलेला आहे, कारण कर्ता क्रिया करतांना शुद्धीवर नसतो.

**अपि त्वं गोपालेन सह चिक्रीडिथ । न अहं तं ददर्श ।**
**कति पाठान् यूयम् अधिजगिध्वे । वयं न एकम् अपि पाठम् अधिजगिमहे ।**

वरील वाक्यांतही प्रथमपुरुषवाचक कर्तृपदाबरोबर *द्वितीयभूतकाळाचीं* रूपें योजण्यांत आलीं आहेत, कारण या ठिकाणीं कर्तो क्रिया केल्याचें नाकारीत आहे. म्हणून जेव्हां कर्ता शुद्धीवर नसेल अथवा एखादी गोष्ट केल्याचें नाकारीत असेल तेव्हां प्रथमपुरुषी कर्तृपदाबरोबर द्वितीयभूतकाळाच्या प्रथम-पुरुषी रूपांचा उपयोग करता येतो

## द्वितीयभूतकालवाचक विशेषणें

३ नद्याः तीरे तस्थिवत् सैन्यं सेनापतिः समराङ्गणम् अनयत्।
वाराणसीं जग्मुषां नराणां पुण्यम् अवर्धत।
अभिमन्युं जघन्वांसं जयद्रथम् अर्जुनः जघान।
सिंहासने निषेदुषी भूदेवी सीतां गृहीत्वा अदृश्या बभूव।

वरील वाक्यांमध्ये तस्थिवत्, जग्मुषाम्, जघन्वांसं व निषेदुषी या द्वितीयभूतकालवाचक धातुसाधितांचा विशेषणांप्रमाणें उपयोग केला आहे. ज्यांनी एखादी क्रिया केलेली आहे अशांचीं विशेषणें म्हणून यांचा उपयोग केला जातो. जसें—

तस्थिवत् सैन्यम्—राहिलेलें सैन्य
जग्मुषां नराणाम्—जाऊन राहिलेल्या लोकांचें
जघन्वांसं जयद्रथम्—ज्यानें मारलें होतें अशा जयद्रथाला
निषेदुषी भूदेवी—बसून राहिलेली भूदेवी

वरील विशेषणें कर्तरिप्रयोगाचा अर्थ दर्शवितात. परंतु संस्कृत वाङ्मयामध्यें यांचा साधारणपणें फारच थोडा उपयोग केला जातो.

### अभ्यास १

पुढील वाक्यांचा व श्लोकांचा अर्थ करून त्यांतील द्वितीयभूतकालवाचक रूपांचा उपयोग स्पष्ट करा —

१ उ भक्तोऽहं बहु न जल्पति परिजनेन कथितम्।

२ दिशः प्रसेदुर्मरुतो ववुः सुखाः प्रदक्षिणार्चिर्हविरग्निराददे।
बभूव सर्वं शुभशंसि तत्क्षणम् भवो हि लोकाभ्युदयाय तादृशाम्॥

३ रत्नैर्महार्हैस्तुतुषुर्न देवा न भेजिरे भीमविषेण भीतिम्।
सुधां विना न प्रययुर्विरामं न निश्चितार्थाद्विरमन्ति धीराः॥

४ तस्मिन्नवसरे देवाः पौलस्त्योपप्लुता हरिम्।
अभिजग्मुर्निदाघार्ताश्छायावृक्षमिवाध्वगाः॥

५ विललाप स बाष्पगद्गदं सहजामप्यपहाय धीरताम् ।
अभितप्तमयोऽपि मार्दवं भजते कैव कथा शरीरिषु ॥
६ यतिपार्थिवलिङ्गधारिणौ ददृशाते रघुराघवौ जनैः ।
अपवर्गमहोदयार्थयोर्भुवमंशाविव धर्मयोर्गतौ ॥
७ तत्र नागफणोत्क्षिप्तसिंहासननिषेदुषी ।
समुद्ररसना साक्षात्प्रादुरासीद्वसुन्धरा ॥
८ अथास्तमासेदुषि मन्दकान्तौ पुण्यक्षयेणेव निधौ कलानाम् ।
समालम्बे रिपुमित्रकल्पैः पद्मैः सुहासः कुमुदैर्विषादः ॥
९ आशास्यमन्यत्पुनरुक्तभूतं श्रेयांसि सर्वाण्यधिजग्मुषस्ते ।
१० त्रैलोक्यदीपके देवे लोकान्तरमुपेयुषि ।
तमस्तान्तमभूद्विश्वं क्व सुखं महदापदि ॥

## टीपा

२ सदक्षिणाग्नि (अग्नि)—ज्याच्या जवळ उजवीकडे अग्नि आहेत असा ( सदक्षिणाग्नि अग्नयो यस्य स )
४ स—जन ।
६ रघुराघवौ—रघु अज च ।
७ नाग ......निषेदुषी—शेषनागाच्या फण्यांनीं धरलेल्या सिंहासनावर बसलेली—( नागस्य फणया उत्क्षिप्ते सिंहासने निषेदुषी )
८ रिपुमित्रकल्पैः—रिपुमित्रसदृशैः ।
१० तमस्तान्तम्—तमसा पीडितम् । तान्त—तम् (ताम्यति) धातूचें भू. धा. विशेषण.

## अभ्यास २

पुढील वाक्यांत रिकाम्या जागीं द्वितीयभूतकाळी क्रियापदें अथवा धातुसाधित विशेषणें घाला —

१ रावणेन नीयमाना सीता भृशं ———— आत्मन अविचारता च ———— ।
२ अभिमन्यु एकाकी एव द्रोणेन रचितं चक्रव्यूहं ———— ।

३ रणाङ्गणे निपतितम् अभिमन्युं दुःशासनः मूर्ध्नि ———— ।
४ भीष्मः वासुदेवधनञ्जयौ तावे शरैः ———— ।
५ अहं स्वप्ने रामं ———— इति सीता हनूमतं ———— ।
६ रावणं हत्वा लङ्कायाः सीता ———— ——— रामं प्रजाः प्रत्युदगच्छन् ।
७ दिग्विजयं कृत्वा राजधानीं ———— रघुं दृष्ट्वा प्रजाः ———— ।
८ पितुः शासनं ———— परशुरामः मातुः शिरः ———— ।
९ किमर्थं गुरुः तस्मै जनकः शरणं ददियं इति नृपेण पृष्टाः प्रजाः न वय ते ———— इति ———— ।
१० कौरवपाण्डवानां सैन्यं विशालसागरः इव ———— ।

---

# पाठ ३९.

## भविष्यकाळ व द्वितीयभविष्यकालवाचक धा० सा० विशेषणें.

१ गोपालः श्वः प्रभाते ग्रामान्तरं प्रस्थास्यते । सः च वर्षद्वयेन निवर्तिष्यते ।
हतः वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।
कलियुगस्य अन्ते अखिलं जगत् नङ्क्ष्यति ।

वरील वाक्यांत भविष्यकाळीन क्रिया दर्शविलेल्या आहेत, व **प्रस्थास्यते, निवर्तिष्यते, भोक्ष्यसे, प्राप्स्यसि** व **नङ्क्ष्यति** इत्यादि द्वितीयभविष्य काळाची रूपें योजलेली आहेत वरील वाक्यांतील भविष्यकाळ जसा दूरचा तसा जवळचाही आहे म्हणून असें म्हणता येईल की द्वितीयभविष्यकाळाचा उपयोग कोणतीही भविष्यकालीन क्रिया दर्शविण्याकडे करतां येतो

२ कर्णेन समः दाता वर्षसहस्रेण अपि न भविता ।
बहूनां जन्मनाम् अन्ते अपि नरः ब्रह्मपदं न प्राप्ता ।
वार्द्धके अपि भवान् शारीरं कर्म कर्तुं शक्ता ।

वरील वाक्यातही भविष्यकाळच अभिप्रेत असून तो भविता, प्राप्ता व शक्ता या प्रथमभविष्यकाळाच्या रूपांनी दर्शविलेला आहे. परंतु वरील वाक्यातील भविष्यकाळ दूरचा आहे, जवळचा नव्हे म्हणून सामान्यतः कोणताही भविष्यकाळ दर्शविणें झाल्यास द्वितीयभविष्याचा उपयोग करतात. परंतु दूरचा भविष्यकाळ प्रथमभविष्यकाळाचे रूपांनीं दर्शविला जातो. व्यवहारात प्रथम भविष्यकाळ फारच थोडा दिसून येतो

३ अद्य रामः पाठशालाम् आगच्छेत्—आगमिष्यति वा ।
वयं कृष्णजन्मोत्सवं पश्येम—द्रक्ष्यामः वा ।
बालः परीक्षायां यशः प्राप्नुयात्—प्राप्स्यति वा ।

वरील वाक्यात विध्यर्थी व द्वितीयभविष्यकाळी अशीं दोन्हीं तऱ्हेचीं रूपें योजलेलीं आहेत. कारण या वाक्यावरून भविष्यकाळांत क्रियेबद्दल अनिश्चितपणा दर्शविलेला आहे. म्हणून भविष्यकालीन क्रियेचा संभव अथवा अनिश्चितपणा दर्शवावयाचा असेल त्या वेळीं विध्यर्थी किंवा द्वितीयभविष्यकाळी रूपें योजावीं

## द्वितीयभविष्यकालवाचक धातुसाधित विशेषणें

४ ग्रामं गमिष्यन् रामः मां द्रष्टुम् आगतः ।
धक्ष्यमाणात् जतुगृहात् पाण्डवाः सुरक्षितं निर्गताः ।
समराङ्गणं प्रस्थास्यमानान् योधान् सेनापतिः नृपसन्देशं कथितवान् ।

वरील वाक्यात गमिष्यन्, धक्ष्यमाणात्, प्रस्थास्यमानान् हीं द्वितीयभविष्यकाळवाची धातुसाधित विशेषणें आहेत. त्यांचा उपयोग 'क्रिया करण्याच्या बेतात असणारा' अथवा 'क्रिया करण्याची इच्छा करणारा' असा अर्थ दर्शविण्याकरितां केला जातो.

वरील उदाहरणांतील भविष्यन्–हें परस्मैपदी कर्तरि द्वितीयभविष्यकालवाचक धातुसाधित विशेषण आहे, वक्ष्यमाणात्–हें कर्मणि द्वि. भ. का. वा. धा. सा. विशेषण आहे व प्रस्थास्यमानान्–हें कर्तरि आत्मनेपदी द्वि. भ. का. धा. विशेषण आहे.

हीं धातुसाधित विशेषणें परस्मैपदी धातूला स्यत् (ष्यत्) व आत्मनेपदी धातूला स्यमान (ष्यमाण) असे प्रत्यय जोडून करतात व कर्मणि प्रयोगाचा अर्थ असतानाहि 'स्यमान' (ष्यमाण) हा प्रत्यय जोडून करतात. यांपैकी परस्मैपदी द्वि. भ. का. धातुसाधितांचीं रूपें 'विदत्' या शब्द प्रमाणें वर्तमानकालवाचक धातुसाधिताप्रमाणें तीन्ही लिंगामध्ये होतात. आत्मनेपदी द्वि. भ. का. धातुसाधिताचीं रूपें अकारान्त नामाप्रमाणें पुल्लिंग व नपुंसकलिंगामध्ये होतात व 'आ' जोडून 'माला' शब्दाप्रमाणें स्त्रीलिंगामध्यें होतात.

५ कौरवैः सह योत्स्यमानः अर्जुनः सर्वां शत्रुसेनां निपुणं न्यरूपयत्।

ग्रन्थं प्रारप्स्यमाणः कविः इष्टदेवतां स्तौति।

वरील वाक्यावरून असें दिसून येईल की ज्या वेळेला क्रिया करण्याच्या बेतांत असलेला एखादा मनुष्य दुसरी एकादी क्रिया करतो त्या वेळीं प्रथम क्रियेचा अर्थ द्वितीयभविष्यकालार्थी धातुसाधित विशेषणाचा कर्तृपदाबरोबर उपयोग करून दर्शविला जातो. जसें—युद्ध करण्याच्या बेतांत असणाऱ्या अर्जुनानें कौरवसेनेचें सूक्ष्म निरीक्षण केलें. यांतील प्रथम क्रियेचा अर्थ योत्स्यमान या द्वि. भ. का. धातुसाधित विशेषणानें दर्शविलेला आहे. वरील वाक्याचा अर्थ पुढीलप्रमाणेंही लिहिता येतो —

*कौरवांबरोबर युद्ध करण्यापूर्वी अर्जुनानें शत्रूच्या सर्व सैन्याचें बारकाईनें निरीक्षण केलें.*

ग्रन्थाला आरंभ करण्यापूर्वी कवि इष्टदेवतेची स्तुति करतो.

## अभ्यास १

पुढील वाक्याचा व श्लोकाचा अर्थ सांगून त्यांतील द्वितीयभविष्यकालवाचक रूपाचा उपयोग स्पष्ट करा:—

१ सर्वथा देवता त्वयस्य श्रेयो विधास्यन्ति।

२ आर्य वैहीनरे अतः प्रभृति चाणक्यमनादृत्य चन्द्रगुप्तः स्वयमेव

राज्यं करिष्यतीति गृहीतार्थाः क्रियन्तां प्रकृतयः ।
३ घानिष्यते तेन महान् विपक्षः स्थास्यते येन रणे पुरस्तात् ।
४ भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।
येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥
५ कुसुमान्यपि गात्रसङ्गमात्प्रभवन्त्यायुरपोहितुं यदि ।
न भविष्यति हन्त साधनं किमिवान्यत्प्रहरिष्यतो विधेः ॥
६ हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।
तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥
७ यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।
तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥
८ प्रतिकूलतामुपगते हि विधौ विफलत्वमेति बहुसाधनता ।
अवलम्बनाय दिनभर्तुरभून्न पतिष्यतः करसहस्रमपि ॥
९ अनुयास्यन् मुनितनयां सहसा विनयेन वारितप्रसरः ।
स्थानादनुच्चलन्नपि गत्वेव पुनः प्रतिनिवृत्तः ॥
१० मूढो राजा धृतराष्ट्रस्य पुत्रो न मे वाचं पथ्यरूपां शृणोति ।
अतो नूनं भवितायं कुरूणां सुदारुणः सर्वहरो विनाशः ॥

## टीपा

४ व ६, ७— श्रीकृष्णानीं अर्जुनाला उद्देशून म्हटलेले श्लोक
मोहकलिलम्— मोहामुळें झालेला मनाचा गोंधळ

९ दुष्यन्त हा श्लोक म्हणतो — वारितप्रसरः (महत्) — ज्याच्या गतीचा वेग आवरला गेला आहे असा (वारितः प्रसरः यस्य सः)

## अभ्यास २

पुढील वाक्यांत भविष्यकालवाचक क्रियापदांचीं रूपें अथवा धातुसाधित विशेषणें घाला —

१ चिराय महासफला भूत्वा पुनः स्वम् आश्रमे पदं ——— इति कण्वः शकुन्तलाम् उवाच ।

२ कलियुगे वर्णसंकरः ——— इति पुराणेषु लिखितं भवति ।

३ रात्रिः ——— सुप्रभातं ——— भास्वान् च ——— ततः अहं, मार्गम् ——— इति चिन्तयन् एव पान्थः सुप्तः ।

४ जयद्रथं ——— अर्जुनस्य श्रीकृष्णः साहाय्यम् अकरोत् ।

५ अद्य वा अब्दशतान्ते वा प्राणिनां मृत्युः ——— इति सत्यम् ।

६ दुर्योधनस्य ऊरू गदया ——— भीमः तेन सह गदायुद्धं चकार ।

७ सीताम् अहं मासेन एव ——— ——— इति हनुमता प्रतिज्ञातम् ।

८ यदि त्वं मासद्वयात् प्राक् मम प्रार्थना न ——— तर्हि अहं त्वां ——— इति रावणः सीतां सन्तर्जयामास ।

९ प्रतिबोधितः अपि भर्ता त्वां न ——— इति शकुन्तला दुर्वाससा शप्ता ।

१० ग्रामं ——— पथिकः मां मार्गम् अपृच्छत् ।

---

# पाठ ४०.

## संकेतार्थ.

१ कथं नाम हरिश्चन्द्रः वचनभङ्गं कुर्यात् ।
कथं सत्यव्रतः असत्यं वदेत् ।
का खलु रामस्य राज्याभिषेकसमये विघ्नम् उत्पादयेत् ।

वरील वाक्यांत क्रियापदाचीं विध्यर्थी रूपें योजलेलीं आहेत. त्यांत वर्णिलेल्या क्रियाबद्दल साशंकता, अनुचितपणा अथवा आश्चर्य प्रकट केलेलें आहे. परंतु ह्याच अर्थ जर ज्यास्त जोरानें व्यक्त करावयाचा असेल तर पुढीलप्रमाणें संकेतार्थी रूपें योजतां येतील. जसें—

(अ) कथं नाम हरिश्चन्द्रः वचनभङ्गम् अकरिष्यत् ।
(आ) कथं सत्यव्रतः असत्यं अवदिष्यत् ।
(इ) का खलु रामस्य राज्याभिषेकसमये विघ्नं उद्पादयिष्यत्

वरील वाक्याचा अर्थ पुढीलप्रमाणे होईल.—

(अ) एखोदर हरिश्चन्द्राने असे वरें वचन मोडले असेल–म्हणजे हरिश्चन्द्राने असे केले असेल या गोष्टीवर विश्वास ठेवता येत नाही.

(आ) सत्यमत असत्य कसें बोलला असेल–म्हणजे असे होणे कधीही शक्य नाही.

(इ) कोण वरें रामाच्या राज्याभिषेकाच्या वेळी विघ्न उत्पन्न करील–म्हणजे कोणी करणार नाही.

वरील वाक्यातील क्रिया भूतकालीन आहेत का भविष्यकालीन आहेत हें संदर्भावरून ठरविलें पाहिजे. वरील वाक्यातील '**अकरिष्यत्, अवदिष्यत्** व **उदपादयिष्यत्**' हीं संकेतार्थाची रूपें आहेत. त्याना प्रथमभूताचे रूपाप्रमाणे अ हा आगम पूर्वी जोडलेला आहे व पुढे 'स्य' ने युक्त असे संकेतार्थाचे प्रत्यय जोडलेले आहेत.

२ **यदि त्वं मम गृहम् आगमिष्यसि आगच्छसि आगच्छेः वा**
**तर्हि अहं तुभ्यं पुस्तकं दास्यामि यच्छामि यच्छेयं वा ।**
**यदि गोविन्दः पारितोषिकार्थं यतते यतेत यतिष्यते वा**
**तर्हि सः तत्प्राप्नोति प्राप्नुयात् प्राप्स्यति वा ।**

वरील संमिश्र वाक्यामध्ये एकमेकावर अवलंबून असणारी वाक्ये भविष्यकाळाला उद्देशून लिहिलेली आहेत; म्हणून या वाक्यामध्ये द्वितीय भविष्य, विध्यर्थ अथवा वर्तमानकाळ यांचा उपयोग केलेला आहे.

परंतु

**यदि रावणः विभीषणोपदेशम् अन्वसरिष्यत् तर्हि रामः तं न अहनिष्यत् ।**

**दुर्योधनः पाण्डवेभ्यः राज्यार्धम् अदास्यत् चेत् कौरवसंक्षयः न अभविष्यत् ।**

वरील संमिश्र वाक्यामध्ये सुद्धा एकमेकांवर अवलंबून असणारी वाक्यें योजलेली आहेत, परंतु त्यांचा अर्थ भविष्यकालदर्शक नसून भूतकालदर्शक आहे व

वाक्यातील वरवर दिसणाऱ्या अर्थाहून विरुद्ध अर्थाचा बोध होत आहे; म्हणून या वाक्यात संकेतार्थाचाच उपयोग केलेला आहे.

संकेतार्थाचा उपयोग एकमेकावर अवलंबून असणाऱ्या संकेतदर्शक भूतकालार्थी वाक्यामध्यें करता येतो. मात्र शब्दरचनेवरून दिसून येणाऱ्या अर्थाहून भिन्न अर्थ ध्वनित होत असला पाहिजे. असें—जर रावणानें बिभीषणाचा उपदेश ऐकला असता तर रामानें त्याला मारलें नसतें. या वाक्यांचा ध्वनित होणारा अर्थ असा आहे कीं रावणानें बिभीषणाचा उपदेश ऐकला नाहीं व रामानें त्याला मारलें. हा उपयोगच प्रथम सांगितलेल्या उपयोगापेक्षा ज्यास्त प्रचारात आहे

## अभ्यास १

पुढील श्लोकाचा व वाक्याचा अर्थ सांगून त्यांतील संकेतार्थांच्या रूपांचें प्रयोजन सांगा व कांहीं ठिकाणां संकेतार्थाचीं रूपें का योजली नाहीत हें स्पष्ट करा —

१ वचनबद्धो दशरथो रामं वनं गन्तुमादिष्टवान्। अन्यथा स न कदापि तथा व्यधास्यत्।

२ दुर्योधनो विदुरोपदेशमन्वसरिष्यच्चेत् कुरुकुलनाशो नाभविष्यत्।

३ यदि मे चरणा गरुडवत् सुदृढा अभविष्यंस्तर्हि सान्द्रे न कोऽपि पद्मंमया तुरगमारोढुमक्षमादिति कोपि हरिण आत्मघातमशोचत्।

४ यदि व्याघ्रचर्मप्रच्छन्नो गर्दभ उच्चैः शब्दं नाकरिष्यत् तर्हि तस्य यथार्थरूपमन्ये पशवो नाज्ञास्यन्।

५ कर्कोटको नागो नलं नादङ्क्ष्यच्चेत्स क्लिष्टं नामोक्ष्यत्।

६ किंवाभविष्यदरुणस्तमसां विभेत्ता
तं चेत्सहस्रकिरणो धुरि नाकरिष्यत्।

७ यदि सुरभिमवाप्स्यस्तन्मुखोच्छ्वासगन्धम्
तव रतिरभविष्यत् पुण्डरीके किमस्मिन्।

८ लज्जा तिरश्चां यदि चेतसि स्यादसंशयं पर्वतराजपुत्र्याः।
तं केशपाशं प्रसमीक्ष्य कुर्युर्वालप्रियत्वं शिथिलं चमर्यः।

८ यदि लक्ष्मण सीताम् रामे एकाकिनीं न ——— तर्हि रावण तां हर्तु न ———।

९ सावित्री यम न ——— चेत् सत्यव्रत न पुनर् ———।

१० यदि अहं कृष्णप्रिय शूर पुत्र न ——— तर्हि अहं यमसादन ——— इति अर्जुनस्य प्रतिज्ञा।

---

# पाठ ४१.

## प्रयोजक क्रियापदें—पुढें चालू.

१ (अ) वानरा स्वर्गम् अगच्छन्। (मूळ वाक्य)
राम वानरान् स्वर्गम् अगमयत्। (प्रयोजक वाक्य)

(आ) शिष्या वेदार्थम् अविदु। (मूळ वाक्य)
गुरु शिष्यान् वेदार्थम् अवेदयत्। (प्रयोजक वाक्य)

(इ) बाल औषधम् अश्नाति पिबति वा। (मूळ वाक्य)
माता बालम् औषधम् आशयति पाययति वा। (प्र. वा.)

(ई) कुशलवौ रामायणम् अगायताम्। (मूळ वाक्य)
वाल्मीकि कुशलवौ रामायणम् अगापयत्। (प्र. वा.)

वरील मूळ वाक्यांच्या प्रयोजक रूपान्तराकडे नजर दिल्यास असें कळून येईल कीं प्रयोजक वाक्यामध्यें सामान्य नियमाप्रमाणें मूळ वाक्यांतील कर्तृपद तृतीयेंत न योजतां अकर्मक क्रियापदाच्या प्रयोजकाप्रमाणें द्वितीयेंत योजलें आहे. यांतील पहिलें वाक्य (अ) गत्यर्थक क्रिया दर्शवितें (आ) जाणण्याचा, (इ) खाण्यापिण्याचा व (ई) शब्दमय कर्म असणारी क्रिया दर्शवितें. यावरून पुढीलप्रमाणें नियम करतां येईल —

अकर्मक क्रियापदाच्या प्रयोजकाप्रमाणें गत्यर्थक, ज्ञानार्थक, पानाशनार्थक

व शब्दकर्मक क्रियापदांची प्रयोजक रूपें योजताना मूळ कर्तृपद द्वितीयेंत योजावे लागतें.

२ सैनिकाः रणाङ्गणं गच्छन्ति । सेनापतिः सैनिकान् रणाङ्गणं गमयति । नृपः सेनापतिना सैनिकान् रणाङ्गणं गमयति ।
छात्राः श्लोकं पठन्ति । शिष्यवरः छात्रान् श्लोकं पाठयति ।
गुरुः शिष्यवरेण छात्रान् श्लोकं पाठयति ।

वरील दोन्ही वाक्यसमूहांतील पहिलें वाक्य मूळ वाक्य, दुसरें प्रयोजक व तिसरें प्रयोजकाचें प्रयोजक आहे. मूळ वाक्यांतील क्रियापदें गत्यर्थक व शब्दकर्मक आहेत. त्यामुळें प्रयोजक रूपान्तरामध्ये मूळ कर्तृपद द्वितीयेंत योजलेलें आहेत. जसें— सैनिकान् व छात्रान्. तिसऱ्या वाक्यामध्ये प्रयोजकाची पुन्हा प्रयोजक रचना आहे. तेव्हा प्रथम प्रयोजकांतील कर्तृपदें— सेनापतिः व शिष्यवरः— द्वितीयेंत न योजता तृतीयेंत योजलेली आहेत. यावरून असें म्हणता येईल का, प्रयोजक वाक्याची पुन्हा प्रयोजक रचना केली गेली तर प्रथम प्रयोजक कर्ता तृतीयेंतच योजतात.

३ भृत्यः भारं नयति । भृत्येन भारं नाययति स्वामी ।
बालः पुष्पाणि आनयति । बालेन पुष्पाणि आनाययति पिता ।
दुष्यन्तः शकुन्तलां पर्यणयत् । दुष्यन्तेन शकुन्तला पर्यणाययत् कण्वः ।

वरील वाक्यांवरून असें दिसून येईल कीं ' नी ' या क्रियापदाच्या प्रयोजकाचा उपयोग करतांना मूळ कर्त्याची तृतीया विभक्ति योजतात.

४ भृत्यः भारं वहति । स्वामी भृत्येन भारं वाहयति ।
रामः सीतां विवहति उद्वहति वा ।
जनकः रामेण सीतां विवाहयति उद्वाहयति वा ।
परन्तु
अश्वाः रथं वहन्ति । सूतः अश्वान् रथं वाहयति ।

वरील दोन्ही वाक्यांत ' वह् ' या क्रियापदाच्या प्रयोजकाचा उपयोग केला

आहे, परंतु पहिल्या दोहोंत प्रयोजक रचनेंत मूळ कर्त्यांची तृतीया विभक्ति योजलेली आहे व तिसऱ्या वाक्यांत प्रयोजक रचनेंत मूळ कर्त्याची द्वितीया योजलेली आहे, कारण प्रयोजक कर्ता 'हाकणारा' या अर्थाचा आहे व तसा तो पहिल्या दोन वाक्यांत नाहीं.

वरील नी व वह् दोन्ही एकप्रकारें गत्यर्थक क्रियापदें असून सुद्धां प्रयोजनामध्यें मूळ कर्त्याची द्वितीया विभक्ति न येतां तृतीया विभक्ति योजावी लागते

५ पान्थः फलानि अत्ति खादति वा।

मुनिः पान्थेन फलानि आदयति खादयति वा।

अद् व खाद् हीं क्रियापदें जरी भक्षणार्थक असलीं तरी या क्रियापदांच्या प्रयोजकाचा उपयोग करावयाचा झाल्यास मूळ कर्त्याची तृतीया विभक्ति योजतात,—द्वितीया नव्हे

मार्जारः मूषकं भक्षयति। नरः मार्जारं मूषकं भक्षयति।
बलीवर्दाः यवान् भक्षयन्ति। कृषीवलः बलीवर्दान् यवान् भक्षयति।

परंतु

देवदत्तः ओदनं भक्षयति। माता देवदत्तेन ओदनं भक्षयति।

वरील पहिल्या दोन वाक्यामध्यें भक्ष् या क्रियापदाच्या प्रयोजकाचा उपयोग केलेला आहे व मूळ कर्त्याची द्वितीया विभक्ति योजलेली आहे, कारण त्या भक्षणक्रियेचा अर्थ हिंसात्मक आहे ( यव म्हणजे यवाचा शेतांतील जिवंत रोपा असा अर्थ समजून उपयोग केलेला आहे ) परंतु तिसऱ्या वाक्यांत मूळ कर्त्याची तृतीया विभक्ति योजलेली आहे, कारण त्या ठिकाणी भक्षण क्रियेचा अर्थ हिंसात्मक नाहीं यावरून असें ठरतें की भक्ष् या क्रियापदाचा अर्थ हिंसात्मक असेल तेव्हां प्रयोजक वाक्यामध्यें मूळ कर्तृपदाची द्वितीया विभक्ति योजतात व इतर वेळेला मूळ कर्तृपदाची तृतीया विभक्ति योजतात.

६ रामः पुष्पं जिघ्रति। पिता रामेण पुष्पं घ्रापयति।
बालः श्लोकं स्मरति। पिता बालेन श्लोकं स्मारयति।

घ्रा व स्मृ हे सामान्य-ज्ञानार्थक धातु नसून विशिष्ट-ज्ञानार्थक असल्यामुळें

प्रयोजक रचनेमध्यें मूळ कर्तृपदाची तृतीया विभक्ति योजतात परन्तु स्मृ याचा 'शोकपूर्ण आठवण' या अर्थी अकर्मक तऱ्हेनें उपयोग केला असता प्रयोजका-मध्य मूळ कर्तृपदाची द्वितीया विभक्ति योजतात असें—

प्रजाः गतस्य नृपस्य स्मरन्ति ।

नूतननृपद्रोषाः प्रजाः गतस्य नृपस्य स्मारयन्ति ।

मित्रं पुस्तकालयं पश्यति । अहं मित्रं मित्राय वा पुस्तकालयं दर्शयामि ।

भक्तः हरिं पश्यति । ईश्वरः भक्तं भक्ताय वा हरिं दर्शयति ।

दृश् या क्रियापदाच्या प्रयोजकाचा उपयोग करताना मूळ कर्तृपदाची द्वितीया किंवा चतुर्थी योजतात

भक्तः देवं पश्यति अभिवादयते वा ।

ईश्वरः भक्तं भक्तेन वा देवं दर्शयते अभिवादयते वा ।

दृश् व अभि+वद् यांच्या प्रयोजकाचा आत्मनेपदामध्यें उपयोग केला असता मूळ कर्तृपदाची द्वितीया किंवा तृतीया विभक्ति योजतात

८ भृत्यः भारं हरति । स्वामी भृत्यं भृत्येन वा भारं हारयति ।
बालः अध्ययनं करोति । पिता बालं बालेन वा अध्ययनं कारयति ।

हृ व कृ यांच्या प्रयोजकाचा उपयोग करताना मूळ कर्तृपदाची द्वितीया किंवा तृतीया योजावी लागते.

९ आचार्यः आसनं गृह्णाति । नृपः आचार्यम् आचार्येण वा आसनं ग्राहयति ।
रामः भार्यां त्यजति । प्रजाः रामं रामेण वा भार्यां त्याजयन्ति ।
मुनिः क्रोधं मुञ्चति । ईश्वरः मुनिं मुनिना वा क्रोधं मोचयति ।
बालः फलं लभते । पिता बालं बालेन वा फलं लम्भयति ।

ग्रह्, त्यज्, मुच् व लभ् या क्रियापदांच्या प्रयोजकाचा उपयोग करताना

मूळ कर्तृपदाची द्वितीया अथवा तृतीया विभक्ति योजतात. परंतु संस्कृत ग्रन्थकार द्वितीयाच जास्त उपयोगात आणतात.

## प्रयोजकाचा कर्मणि प्रयोग

१० स्वामी सूदेन अन्नं पाचयति । स्वामिना सूदेन अन्नं पाच्यते ।
माता बालेन अन्नं खादयति । मात्रा बालेन अन्नं खाद्यते ।

वरील वाक्यांचा प्रयोजक कर्तरि व कर्मणि प्रयोग दर्शविला आहे. कर्मणि प्रयोग करताना हीं सकर्मक क्रियापदें असल्यामुळें मूळ द्वितीयान्त कर्मच कर्मणि प्रयोगात प्रथमेंत योजलेलें आहे व प्रयोजक कर्तृपद व मूळ कर्तृपद हीं दोन्ही तृतीयेंत योजलेलीं आहेत, व क्रियापदाचें रूप कर्मणि उहेवें (अय काढून, य व आत्मनेपदी प्रत्यय जोडून) घेतलें आहे व तें नवीन प्रथमान्त पदाशीं जुळेल असें आहे. जसें—पाचय-पाच्+य+ते-पाच्यते ।

खादय-खाद्+य+ते-खाद्यते ।

११ पिता बालं ग्रामं गमयति । पित्रा बालः ग्रामं गम्यते ।
शिक्षकः छात्रं आसने उपवेशयति ।
शिक्षकेण छात्रः आसने उपवेश्यते ।
वातः समुद्रं क्षोभयति । वातेन समुद्रः क्षोभ्यते ।

वरील प्रयोजक वाक्यांतील क्रियापदें गत्यर्थक व अकर्मक असल्यामुळें मूळ कर्त्यांची द्वितीया विभक्ति योजलेली आहे व म्हणून प्रयोजकाचा कर्मणि प्रयोग करताना द्वितीयान्त मूळ कर्तृपद (प्रयोज्य कर्म) प्रथमान्त कर्तृपद झालें आहे. जसें—बाल, छात्र, समुद्र.

१२ माता बालम् अन्नं भोजयति । मात्रा बालः अन्नं भोज्यते ।
मात्रा बालम् अन्नं भोज्यते वा ।
वाल्मीकिः कुशलवौ रामायणं गापयामास । वाल्मीकिना कुशलवौ रामायणं गापयामासाते । वाल्मीकिना कुशलवौ रामायणं गापयामासे वा ।

गुरुः शिष्यान् शास्त्रार्थं वेदयति । गुरुणा शिष्याः शास्त्रार्थं वेद्यन्ते गुरुणा शिष्यान् शास्त्रार्थः वेद्यते वा ।

वरील प्रयोजक वाक्याचा दोन तऱ्हांनी कर्मणिप्रयोग केलेला आहे. वरील क्रियापदें सकर्मक असून खाणें व जाणणें या अर्थांचीं व शब्दकर्मयुक्त असल्यामुळें मूळ कर्त्यांची द्वितीया विभक्ति योजलेली आहे म्हणून प्रत्येक कर्तरि प्रयोजक वाक्यांत दोन दोन शब्द द्वितीयेंत योजलेले आहेत—एक मूळ कर्म व दुसरें प्रयोज्य कर्म–अशा तऱ्हेच्या वाक्याचा कर्मणिप्रयोग करताना कोणत्याही द्वितीयान्त पदाचें प्रथमान्त पदांत रूपान्तर करून त्याला जुळेल असें क्रियापदाचें कर्मणिरूप योजावें.

१३ कर्तरि— ईश्वरः वामनेन बलिं वसुधां याचयति ।
कर्मणि— ईश्वरेण ,, बलिः ,, याच्यते ।
कर्तरि— स्वामी गोपेन धेनुं दुग्धं दोहयति ।
कर्मणि— स्वामिना ,, धेनुः ,, दोह्यते ।

वरील वाक्यांतील क्रियापदें द्विकर्मक आहेत. प्रयोजकामध्यें मूळ कर्त्यांची तृतीया विभक्ति योजलेली आहे या प्रयोजक वाक्याचा कर्मणि प्रयोग करताना द्विकर्मक क्रियापदाच्या कर्मणि प्रयोग करण्यासंबंधीचा नियम पाळला पाहिजे. म्हणजे दोन कर्मांपैकी गौण कर्माचें कर्तृपदांत रूपान्तर केलें पाहिजे म्हणून बलिम् व धेनुम् हीं गौण कर्मपदें कर्मणि प्रयोगांत बलि व धेनु अशीं कर्तृपदें झालीं आहेत

१४ सेनापतिः सेनां रणाङ्गणं नयति । मूळ वाक्य कर्तरिप्रयोग.
नृपः सेनापतिना सेनां रणाङ्गणं नाययति । प्रयोजक वाक्य कर्तरिप्र०
नृपेण सेनापतिना सेना रणाङ्गणं नाय्यते । ,, ,, कर्मणिप्र०

वरील वाक्यांत 'नी' या द्विकर्मक क्रियापदाचा उपयोग केला आहे व कर्मणि प्रयोगामध्ये (प्रयोजक) सेनाम् या मुख्य कर्मपदाचें सेना या कर्तृपदांत रूपान्तर झालें आहे

४ सज्जना भक्तिनौकया भवसागरं ——— ।
५ दीर्घप्रवासेन श्रान्ता पान्था शीतं जलं ——— ।
६ अधुना विविधानि शास्त्राणि ——— विद्यार्थिन उरपर्यटनं कुर्वन्ति ।
७ सीता ——— मारुतिं आविशत् लङ्का पर्यभ्रमत् ।
८ परहितं ——— नरा न कदापि क्लेशं गणयन्ति ।
९ महात्मना दोषान् ——— नरा तेषा पुरत तथा स्थातुं न प्रभवन्ति ।
१० मोक्षमार्गं ——— नर प्रथमत युक्त गुरुम् अन्विष्येत् ।
( विवक्षव , प्रविविक्षु , तितीर्षन्ति, जिघांसव , ईप्सा, जिज्ञासमाना , चिकीर्षव , दिदृक्षन्, पिपासन्ति, आविविक्षमिपव )

---

# पाठ ५२.

## नामधातु व पौनःपुन्यार्थक क्रियापदें.

### नामधातु

१ परोपकारव्रताः सज्जनाः अङ्गीकृतं कार्यं न कदापि मन्दाः इव भवन्ति ( मन्दायन्ते ) ।
चन्द्रमाः समग्रं जीवलोकं ज्योत्स्नया धवलं करोति ( धवलयति ) ।
पुत्रम् इच्छता ( पुत्रीयता ) दशरथेन सत्रम् आरब्धम् ।
वरं लिप्सुः शिष्य. मुनिं नमस् करोति ( नमस्यति ) ।

वरील वाक्यांतील क्रियापदें, नामें व विशेषणें यांपासून उत्पन्न केलेली आहेत. याला नामधातु असें म्हणतात हाही प्रयोजक व इच्छार्थक क्रियापदा-प्रमाणें साधित क्रियापदाचा प्रकार आहे या क्रियापदाचा निरनिराळा अर्थ होतो जसें— मन्दायन्ते–मन्द होतात, धवलयति–शुभ्र करतो, पुत्रीयति–पुत्र–

काम्यति-मुलाची इच्छा करतो व **नमस्यति**-नमस्कार करतो अथवा पूजा करतो, **शब्दायते**-आवाज करतो, इत्यादि.

नामधातूंपासून होणारीं वर्तमानकालवाचक धातुसाधितें व कर्मणिभूतकाल-वाचक धातुसाधितें विशेष उपयोगात येतात. नामधातु १० काळ व अर्थ यांमध्ये चालवता येतात. परंतु वर्तमानकाळी रूपच ज्यास्त प्रचारात आहेत.

२ राहुणा चन्द्रः कवलितः भवति । सञ्जाते शङ्खनादे धनुर्भिः शब्दायितम् ।

यशस्कारयता वीरेण पराक्रमः दर्शयितव्यः ।

संकटे प्राप्ते नरः दोलायमानमतिः भवति ।

वरील वाक्यांत नामधातूंचीं कर्मणिभूतकाळवाचक धातुसाधित रूपें व वर्तमानकाळवाचक धातुसाधित रूपें योजलेलीं आहेत.

## पौनःपुन्यार्थक क्रियापदें

३ साक्षी बधिरः इति अज्ञात्वा न्यायाध्यक्षः तं वृत्तान्तं पुनः पुनः पृच्छति ( परीपृच्छ्यते ) ।

दैवहतस्य नरस्य मतिः पुनः पुनः लुप्यति ( लोलुप्यते ) ।

तेजसा अतीव दीप्यमानं ( देदीप्यमानम् ) आत्मजं रामं दृष्ट्वा कौसल्या प्रहृष्टा बभूव ।

वरील वाक्यांत प्रच्छ्, लुप्, दीप् या क्रियापदांचीं पौनःपुन्यार्थक रूपें योजलेलीं आहेत. हीं रूपें मूळ धातूनें दर्शविलेली क्रिया पुन्हा पुन्हा अथवा ज्यास्त तीव्रतेनें केला जाते असा अर्थ दर्शवितात. हीं मुद्दाम साधित क्रियापदें आहेत व जरी यांचीं रूपें सर्व काळ व अर्थ यांमध्ये होऊं शकतात तरी वर्तमान-कालीन रूपें वाङ्मयांमध्ये उपयोगात आलेलीं दिसतात यापासूनही निरनिराळीं धातुसाधित विशेषणें अथवा अव्यय बनवितां येतात, परंतु वर्तमानकाळवाचक धातुसाधितेंच ज्यास्त उपयोगांत दिसतात. संस्कृत वाङ्मयामध्ये पौनःपुन्यार्थाचा फारच थोडा उपयोग केला जातो.

## अभ्यास २

पुढील वाक्यातील रिकाम्या जागी कंसात दिलेल्या रूपांपैकीं योग्य तीं रूपें योजा —

१ यदा धर्मे विराटनृपस्य गाव हृता तदा अज्ञातवासात् अनन्तरम् आत्मानं ——— अयम् एव काल इति अर्जुन ज्ञातवान् ।
२ त्रिवर्षं मया पाल्यमानं जलं त्वम् ——— इति वृकेण अजशिशु सक्रोधं पृष्ट ।
३ ——— तारापाडेन विविधै प्रकारै पुनःपुनस्तेन ईश्वर पूजित ।
४ विघ्नै प्रतिहन्यमानस्य नरस्य चित्तवृत्ति ——— ।
५ विषम् अपि ——— ईश्वरेच्छया ।
६ उदरपूरणाय भिक्षुक ग्रामम् ग्राम ——— ।
७ यावत् इप्सितं वस्तु पुन पुन याचमान शिशु न लभते तावत् स ——— ।
८ वनभूमौ हरितै तृणा अग्रय ——— शिखाभि शोभन्ते ।
९ अनिले पूर्यमाणा कीचका मधुर ——— ।
१० विविधेषु अरण्येषु ——— मुनय फलमूलाशिन भवन्ति ।
(प्रज्वाल्यमानानि, निरुध्यते, तपस्यन्त, अविन्दथि, प्रलभ्यते, प्रक्रमयितुम्, दोलायते, पुनाक्ता, शक्यते, शब्दायन्ते)

---

## पाठ ५३.

### अन्वयें.

१ (अ) अथ प्रथमं तन्त्रम् आरभ्यते — पहिल्या तन्त्राचा आरंभ केला जातो

(आ) अथ लक्ष्मणात्मज चन्द्रकेतु अश्वसंरक्षणार्थं प्रहित. — नंतर लक्ष्मणाचा मुलगा चन्द्रकेतु घोड्याच्या रक्षणाकरिता पाठविला गेला

(इ) अथ भवान् योद्धुं समर्थः—आपण लढण्यास समर्थ आहां काय ?

(ई) अथ भवत्याः कौतुकम् अस्मिन् विषये तर्हि अहं कथयामि मद्वृत्तम्—जर या विषयाबद्दल बाईसाहेबांच्या मनांत उत्सुकता असेल तर मी माझी हकीकत सांगतो

(उ) गुरुः—अयि बाल अपि ज्ञातः अर्थः त्वया । बालः—अथ किम् । गुरु —मुला तुला अर्थ समजला का ? मुलगा —होय तर

अथ या अव्ययाचा उपयोग निरनिराळ्या अर्थी केला जातो हें वरील वाक्यांवरून लक्षांत येईल.

'अ' मध्यें ग्रंथ सुरू करतांना अथवा विवेचनाला आरंभ करतांना शुभदर्शक अव्यय म्हणून योजलेलें आहे.

'आ' मध्यें 'नंतर' या अर्थी योजलेलें आहे.

'इ' मध्यें प्रश्नार्थक वाक्याच्या आरंभी योजलेलें आहे

'ई' मध्यें 'जर' या अर्थी योजलेलें आहे

'उ' मध्यें 'अथ'ला 'किं' जोडलें आहे व त्याचा उपयोग एखाद्या प्रश्नाचें होकारार्थी उत्तर देण्याकरतां करतात असें दर्शविलें आहे

२ (अ) अपि युद्धं समाप्तम् इति धृतराष्ट्रः सञ्जयम् अपृच्छत् ।

(आ) श्रीमता अपि विद्यावत्सु आदरेण वर्तितव्यम् ।

(इ) सीता स्वस्तु लक्ष्मणम् आज्ञाप्य रामः समागृहात् निर्गतः ।

लक्ष्मणः अपि तथा इति उक्त्वा भ्रातृवचनम् अनुससार ।

(ई) अपि नाम ईश्वरः संकटं दूरीकुर्यात् ।

अपि या अव्ययाचा उपयोग वरील चार वाक्यांत निरनिराळ्या अर्थी केला आहे

'अ' मध्ये प्रश्नाच्या आरंभी अपि या अव्ययाचा उपयोग केलेला आहे, व संस्कृतमध्ये प्रश्न विचारतांना या पद्धतीचाच अवलंब केला जातो.

'आ' मध्ये 'सुद्धा' या अर्थी उपयोग केलेला आहे.

'इ' मध्ये 'आणि सुद्धा' या अर्थी उपयोग केलेला आहे. अशा वेळेला ज्या वाक्यात अपि योजलेले असेल त्याचा मागील वाक्याशीं संबंध असतो.

'ई' मध्ये 'अपि' हें अव्यय 'नाम' या अव्ययाबरोबर योजलेलें आहे. त्याचा अर्थ 'असें वाटतें, अशी आशा आहे' असा वन्हेचा होतो. या वाक्यांतील क्रियापद सामान्यतः विध्यर्थी असतें, तुसत्या 'अपि' या अव्ययानेंही हा अर्थ दर्शविला जातो.

३ (अ) इति श्री रामरक्षास्तोत्रं सम्पूर्णम् ।

(आ) मित्रनाशः मा भूत् इति अहं स्वजीवितं संशये पातयामि ।

(इ) महाश्वेतावृत्तान्तं श्रुत्वा चन्द्रापीडः इति अवोचत् ।

'अ' मध्ये कोणताहि ग्रंथ अथवा विभाग समाप्त झाला म्हणजे शेवटी इति हें अव्यय योजतात हें दर्शविलेलें आहे.

'आ' मध्ये हेतुवाचक वाक्यानंतर 'म्हणून अथवा या हेतूनें' या अर्थी इति याचा उपयोग केलेला आहे.

'इ' मध्ये 'पुढें लिहिल्याप्रमाणें' किंवा 'असें' या अर्थी उपयोग केलेला आहे. या अर्थी एवम् अथवा इत्थम् याचाहि उपयोग करतात.

■ कामक्रोधलोभानाम् एकैकः अपि नरं नाशयितुं समर्थः ।

किमुत एतेषां समवायः ।

मेधावी अपि ईशतत्त्वं यथार्थतः ज्ञातुम् असमर्थः किं पुनः

मृत्पिण्डबुद्धिः ।

वरील वाक्यात किम् हा शब्द उत व पुनः या अव्ययांना जोडून योजलेला आहे. त्याचा अर्थ किती ज्यास्त अथवा किती कमी असा संदर्भाला धरून होत असतो. असें—काम, क्रोध व लोभ ह्यांपैकी एक एक सुद्धा मनुष्याचा नाश करण्यास समर्थ आहे तर या सर्वांचा समूह किती ज्यास्त

नाशकारक असेल ? बुद्धिमान् मनुष्याला सुद्धा ईश्वराचें तत्त्व समजत नाहीं, मग मदबुद्धीच्या मनुष्याला किती कमी समजेल बरें ?

याच अर्थी किंबहुना किंवा निश्चय याचाही उपयोग करतात

५ कच्चित् न कोऽपि अत्र उपद्रवः सम्भवति। (या ठिकाणीं काहीं उपद्रव नाहींना ? अथवा असें वाटतें की या ठिकाणीं काही उपद्रव नाहीं )

कच्चित् कुशलिनः सर्वे गृहवासिन । (घरातील सर्व मंडळी कुशल आहेत ना ? [अर्थात् आहेत])

**कच्चित्** हें अव्यय सौम्य रीतीनें प्रश्न विचारावयाचा असल्यास योजतात, व त्या प्रश्नाचें उत्तर प्रश्नाचे मांडणीवरूनच व्यक्त केलें जातें. जसें— वरील पहिल्या वाक्यात 'उपद्रव नाहीं ना' या प्रश्नाचें अपेक्षित उत्तर 'नाहीं' हें आहे, व दुसऱ्या वाक्यात 'कुशल आहेत ना' या प्रश्नाचें उत्तर 'आहेत' हें आहे

६ क सूर्यवंश. क च मम अल्पविषया मतिः। (कोठें तो सूर्यवंश व कोणाकडे माझी तुटपुंजी बुद्धि ! म्हणजे दोहोंमध्यें फार फरक किंवा असंबद्धता आहे )

क ईदृशं तीव्रं तपः क च वपुः कोमलतनुः। (कोठें हा खडतर तपश्चर्या व कोठें हें कोमल शरीर ! म्हणजे दोहोंमध्यें फार मोठें अंतर आहे)

**क** हें अव्यय ज्या दोन गोष्टींमध्यें फार फरक किंवा असंबद्धता आहे अशा दोन्ही ठिकाणीं फरक दर्शविण्याकरितां योजतात म्हणून दोन निरनिराळ्या शब्दसमूहांपूर्वी क हें अव्यय दोनदां असतें तर त्या दोहोंमध्यें फार फरक आहे असें समजावें

७ कामं भवान् प्रकृत्या चतुरः। तथापि परीक्षायै भवता महाप्रयत्नः कार्यः। (आपण पुष्कळ चतुर आहां हें कबूल, तथापि परीक्षेकरितां आपण फार मोठा प्रयत्न केला पाहिजे)

कामं सिंहः मृगराजः। तथापि तस्यापि भक्ष्यार्थं संचरणम् आवश्यकम्। (सिंह जनावरांचा राजा ही गोष्ट खरी, तरी त्याला सुद्धां भक्ष मिळविण्याकरितां इकडे तिकडे फिरणें आवश्यक असतेच )

वरील वाक्यावरून हे लक्षात येईल की, जेव्हा एखादी गोष्ट कबूल करून दुसरी विरुद्ध गोष्ट मांडावयाची असते त्या वेळी कबूल असलेली गोष्ट दर्शविणाऱ्या वाक्याबरोबर 'कामम्' हे अव्यय योजतात व विरुद्ध गोष्ट दर्शविणाऱ्या वाक्याबरोबर 'तथापि, अपि तु' इत्यादि अव्यय योजतात

८ न केवलं रामः रावणं जघान अपि तु बिभीषणं लंकायां
 स्थापयामास ।

न केवलं यः महतः अपभाषते शृणोति तस्मात् अपि यः
स पापभाक् ।

ज्या वेळेला एकमेकांवर अवलंबून असणाऱ्या दोन वाक्यांना जोडणारे शब्द 'केवळ असे नव्हे ... तर' अशा अर्थाचे असतात त्या वेळी पहिल्या वाक्यात 'न केवलं' हे अव्यय असतात व दुसऱ्या वाक्यात 'अपि तु किंवा तु' वगैरे अव्यये असतात

## अभ्यास १

पुढील वाक्यांचा व श्लोकांचा अर्थ करून त्यातील विशिष्ट अव्ययांचे उपयोग स्पष्ट करा —

१ पुण्यानि हि नामग्रहणानि महामुनीनां किं पुनर्दर्शनानि ।

२ यथा धनञ्जयोऽनुरागेण पाटवेन समता अपि नामैतस्मादनुरूप वरं लभते विनतायास्तनुजस्तस्य ।

३ क्व बत हरिणकानां जीवितं चातिलोलम्
 क्व च निशितनिपाता वज्रसाराः शरास्ते ।

४ सरसिजमनुविद्धं शैवलेनापि रम्यं
 मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति ।
 इयमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी
 किमिव हि मधुराणां मण्डनं नाकृतीनाम् ॥

५ निवार्यतामालि किमप्ययं बटुः पुनर्विवक्षुः स्फुरितोत्तराधरः ।
 न केवलं यो महतोऽपभाषते शृणोति तस्मादपि यः स पापभाक् ॥

६ कामं कर्णान्तविश्रान्ते विशाले तस्य लोचने ।
चक्षुष्मत्ता तु शास्त्रेण सूक्ष्मकार्यार्थदर्शिना ॥
७ कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।
कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥
८ स्त्रीणामशिक्षितपटुत्वममानुषीषु संदृश्यते किमुत याः प्रतिबोधवत्यः ।
९ पुरस्थया मङ्गलतूर्यनिस्वनाः प्रमोदनृत्यैः सह वारयोषिताम् ।
न केवलं सद्मनि मागधीपतेः पथि व्यजृम्भन्त दिवौकसामपि ॥
१० अथाजिनाषाढधरः प्रगल्भवाग्ज्वलन्निव ब्रह्ममयेन तेजसा ।
विवेश कश्चिज्जटिलस्तपोवनं शरीरबद्धः प्रथमाश्रमो यथा ॥

## टीपा

४ इयम्—शकुन्तला.
५ तपश्चर्या करणाऱ्या पार्वतीनें दासीला उद्देशून म्हटलेला श्लोक.
६ तस्य—रघोः.
७ गीतेच्या शेवटीं श्रीकृष्णांनीं अर्जुनाला विचारलेला प्रश्न.
१० शंकराचें बटुरूप वर्णन.
अजिनाषाढधरः—हरिणाचें कातडें व पळाशदण्ड धारण करणारा.

## अभ्यास २

या धड्यातील योग्य तीं अव्ययें पुढील वाक्यांतील रिकाम्या ठिकाणीं योजा:—

१ पिता पुत्रं पृच्छति:—अयि जात ——— समाप्तं सन्ध्यावन्दनम् ।
पुनः प्रतिवदति— ——— ।

२ ——— सन्तु सत्यभाषिणः सहस्रशः अस्मिन् जगति ——— न कोऽपि हरिश्चन्द्रेण तुलाम् आरोढुं योग्यः ।

३ ——— पुरूरवसा नृपेण सचेतनाः प्राणिनः उर्वश्याः प्रवृत्तिं पृष्टाः ——— अचेतनाः अपि ।

४ अङ्गुलीयकं दृष्ट्वा दुष्यन्तः वदति स्वगतम्:— ——— शकुन्तला मह्यं न कुप्येत् तस्याः अकारणप्रत्याख्यानेन ।

५ ——— परमेश्वरस्य सृष्टिरचनाकौशल्यम् ——— अल्पमेधसः नरस्य तद् ज्ञातुं प्रयत्नः ।

६ गोविन्दः चिरात् दृष्टं वयस्यं पृच्छति:— ——— भवान् माम् अभिजानाति ।
७ रामाज्ञया लक्ष्मणेन वने त्यक्ता सीता तम् ——— अवदत् ।
८ गर्भेश्वरत्वम् अभिनवयौवनत्वम् अप्रतिमरूपत्वम् अमानुषशक्तित्वं च इति महती खलु इयम् अनर्थपरम्परा । एकैकम् अपि एतेषां महते अनर्थाय कल्पते । ——— समवाय ।
९ भीष्मः कृष्णसहायम् अर्जुनं पराजेतुम् असमर्थः । द्रोणः ——— तद् कर्तुं न अशक्नोत् ।
१० अर्जुनस्य अग्निप्रवेशः मा भूत् ——— श्रीकृष्णेन सूर्यबिम्बं संवृतम् ।

---

# पाठ ५४.

## अव्यये—पुढें चालू.

१ किं तेन जातु जातेन यः न विद्वान् न भक्तिमान् ।
न जातु कामः कामानाम् उपभोगेन शाम्यति ।

जातु या अव्ययाचा उपयोग 'अगदीं, मुळींच, कदाचित्' अशा अर्थी वाक्याला जोर येण्याकरिता करितात.

२ दिष्ट्या संकटं निवारितम् ।
दिष्ट्या भवान् विजयेन वर्धते ।

'दिष्ट्या' म्हणजे सुदैवानें या तृतीयान्त नामाचा अव्ययासारखा उपयोग केला जातो.

'दिष्ट्या' शब्दाचा वृध् या क्रियापदाबरोबर उपयोग केला म्हणजे त्याचा अर्थ अभिनन्दन करणें असा होतो. त्या वाक्यात ज्याचें अभिनंदन करावयाचें त्याची प्रथमा विभक्ति व ज्याबद्दल अभिनंदन करावयाचें त्याची तृतीया विभक्ति योजतात.

३ प्रायः गच्छति यत्र भाग्यरहितः तत्र एव यान्ति आपदः ।
प्रायेण एते रमणविरहेषु अङ्गनानां विनोदाः ।

**प्रायः** किंवा **प्रायेण** याचा उपयोग 'बहुतकरून' 'बहुशीं' या अर्थी केला जातो.

४ (अ) यथा बीजं तथा अङ्कुरः । (जसें बीं तसा अङ्कुर)

(आ) यथा त्वं धूर्तैः न विप्रलभ्यसे तथा वर्तेथाः । (ज्या रीतीनें धूर्तांकडून फसविला जाणार नाहीस तसा तूं वाग)

(इ) यथा अयं पान्थः विचेतनः दृश्यते तथा तर्कयामि यद् अयं चण्डातपेन मूर्च्छाम् आपन्नः । (ज्या अर्थी हा वाटसरू काही हालचाल दिसत नाही त्या अर्थी मला असें वाटतें कीं सूर्याच्या अति प्रखर उष्णतेनें याला मूर्च्छा आली आहे)

(ई) न तथा पीडयति दारिद्र्यं यथा अपमानः । (अपमान जसे दुःख देतो तसें दारिद्र्य देत नाही)

(उ) यथा यथा वायुः शीततरं वातुं प्रवृत्ते तथा तथा दृढतरम् आवृणोत् पान्थः स्वशरीरं कम्बलेन । (जसजसा वारा अधिक थंड वाहूं लागला तसतसा वाटसरू घोंगडी शरीराभोवती अधिक अधिक घट्ट गुंडाळूं लागला)

वरील पाच वाक्यांमध्यें **यथा–तथा** या जोड अव्ययाच्या उपयोग दर्शविला आहे. सामान्यतः **यथा** हें गौण वाक्याबरोबर योजतात व **तथा** हें मुख्य वाक्याबरोबर योजतात

'अ' मध्यें— जसा–तसा या अर्थी उपयोग केलेला आहे.
'आ' „ — ज्या रीतीनें–त्या रीतीनें „ „ „
'इ' „ — ज्या अर्थी–त्या अर्थी „ „ „
'ई' मध्यें—जितका किंवा जसा–तितका किंवा त्या या अर्थी उपयोग केलेला आहे.

'उ' मध्ये—यथा व तथा ही दोनहोनदा योजलेली असून त्याचा अर्थ 'जितकें अधिक–तितकें अधिक किंवा जसा जसा–तसा तसा' असा होतो.

५ (अ) यावान् प्रयत्नः तावत् फलम्। (जितका प्रयत्न तितकें फळ)

(आ) यावत् धनं लब्धं तावत् उपयुक्तम्। (जितकें धन मिळविलें गेलें तितकें म्हणजे सर्व धन खर्च केलें गेलें)

(इ) यावत् रणाङ्गणं गच्छन्ति सैनिकाः तावत् मया अपि तत्र गन्तव्यम्। (शिपाई रणाङ्गणावर पोचतात तोंपर्यंत मलाही तेथें गेलें पाहिजे)

(ई) यावत् व्याधः न निवर्तते तावत् एव अस्माभिः जालेन सह उड्डयितव्यम्। (पारधी परत येण्यापूर्वीच आपल्यास जाळ्यासह उडालें पाहिजे.)

यावत् व तावत् याचा विशेषणाप्रमाणें 'जितका–तितका' या अर्थी उपयोग केला जातो व अव्ययाप्रमाणें 'जोंपर्यंत–तोंपर्यंत' या अर्थी उपयोग केला जातो.

'अ व आ' मध्यें विशेषणासारखा 'जितका–तितका, जितकें–तितकें' या अर्थी उपयोग केलेला आहे, 'आ' मध्यें यावत्–तावत् याचा अर्थ 'सर्व' असा होतो.

'इ' मध्यें जोंपर्यंत–तोंपर्यंत अशा अर्थी उपयोग केलेला आहे.

'ई' मध्यें यावत् याच्याबरोबर न हें अव्यय योजून त्याचा अर्थ 'पूर्वीच' असा झाला आहे.

६ वरं प्राणत्यागः न पुनर् अपमानः। (प्राण गेला तरी पुरवला परंतु अपमान नको)

वरम् एकः गुणी पुत्रः न च मूर्खशतानि अपि। (एक गुणवान् पुत्र चालेल पण शेकडो मूर्ख नकोत)

वरं–न याचा उपयोग 'एखादी गोष्ट पुरवली पण दुसरी नको' या अर्थी

केला जातो जी गोष्ट इष्ट किंवा पसंत असते ती दर्शविणाऱ्या शब्दाबरोबर 'वर' याचा उपयोग करतात व जी अनिष्ट किंवा नापसंत असते ती दर्शविणाऱ्या शब्दाबरोबर 'न, नतु, न पुन , न च' याचा उपयोग करतात **वरं** व **न** या शब्दानंतर तुलना रूपें योजता यावा नयेत, वाक्यें अथवा प्रथमान्त नामें योजिली पाहिजेत

'**वरं**' याचा उपयोग तारतम्यदर्शक रूपाप्रमाणें पञ्चम्यन्त नामाबरोबरही करतात, असें— वर कूपशतात् वापी ।

७ **स्थाने अयं कुमारः सर्वदमन. इति कृतनामधेय. भवति ।**
(या मुलाचें सर्वदमन हें नाव अगदीं योग्य आहे)
**अस्थाने खलु तव प्रयत्न. ।** (शरीरावर तुझा प्रयत्न अयोग्य आहे)

**स्थाने** व **अस्थाने** याचा 'योग्य स्थलीं आहे व अयोग्य स्थलीं आहे' या अर्थी अव्ययासारखा उपयोग करतात

८ (अ) **हा हन्त हन्त नलिनीं गज. उज्जहार ।**
(आ) **हन्त प्रतिहतं सङ्कटम् ईशकृपया ।**

**हन्त** हें उद्गारबोधक अव्यय अ मध्यें शोक दर्शवितें व आ मध्यें आनंद दर्शवितें

## अभ्यास १

पुढील श्लोकांचा अर्थ करून त्यांतील विशिष्ट अव्ययाचा उपयोग स्पष्ट करा —

१ न हि आत्मवमन्तव्यो मनुष्य इति भूमिप ।
महती देवता ह्येषा नररूपेण तिष्ठति ॥
२ यथा स्त्रीणां तथा वाचां साधुत्वे दुर्जनो जन ।
३ दिष्ट्या सोऽयं महाबाहुरञ्जनानन्दवर्धन ।
यस्य बाल्येन कृतिनो वयं च भुवनानि च ॥
४ वधूचतुष्केऽपि यथैव शान्ता प्रिया तनूजास्य तथैव सीता ।
५ प्रायेण नीचा व्यसनेषु मग्ना निन्दन्ति दैवं न तु दुष्टं स्वम् ।
६ वरं वनं व्याघ्रगजेन्द्रसेवितम् न बन्धुमध्ये धनहीनजीवितम् ।
७ स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।

# पाठ ५५.

## वाक्यरचना.

१. अस्ति गौतमस्यारण्ये प्रस्तुतयज्ञः कश्चिद्ब्राह्मणः। स च यज्ञार्थं ग्रामान्तराच्छागमुपक्रीय स्कन्धे नीत्वा गच्छन् धूर्तत्रयेणावलोकितः। ततस्ते धूर्ता यद्येष छागः केनाप्युपायेन लभ्यते तदा मतिप्रकर्षो भवतीति समालोच्य वृक्षत्रयतले क्रोशान्तरेण तस्य ब्राह्मणस्यागमनं प्रतीक्षमाणाः पथि स्थिताः।

वरील उताऱ्यामध्यें संस्कृत भाषेचें माधुर्य व समजण्यास सोपें असें सहज भाषेशी ज्यांना अल्प परिचय झाला आहे अशा वाचकांना उपयुक्त असें स्वरूप आहे. त्यांतील वाक्यरचना या पुस्तकांत पूर्वी दिलेल्या नियमांस अनुरूप अशीच आहे हें दिसून येईल.

पहिलें वाक्य —प्राचीन काळांतील गोष्ट सांगावयाची असल्यामुळें '**अस्ति**' हें क्रियापद आरंभीं योजलेलें आहे. अरण्ये हें अधिकरणाचें पद नंतर योजलेलें आहे. **प्रस्तुतयज्ञः** हें सामासिक विशेषण **ब्राह्मणः** याचे पूर्वी आलें आहे.

दुसरें वाक्य —पहिल्या वाक्याशीं जोडण्याकरितां '**च**' या उपयोग पहिल्या शब्दानंतर केला आहे. त्याचप्रमाणें सः या सर्वनामाशीं संबद्ध असलेल्या पहिल्या दोन क्रियावाचक **उपक्रीय** व **नीत्वा** या त्वान्तांचा उपयोग केला आहे. **अवलोकितः** हें सकर्मक धातूचें कर्मणिभूतकालवाचक धातुसाधित क्रियापदाप्रमाणें उपयोगांत आणलेलें आहे. त्यामुळें वाक्यरचना कर्मणि केलेली आहे. त्याचप्रमाणें 'तो जात असतां पाहिला गेला' हा अर्थ दर्शविण्याकरितां '**गच्छन्**' हें वर्तमानकालवाचक धातुसाधित योजलेलें आहे.

तिसरें वाक्य —याची रचनाही पूर्वी दिलेल्या नियमानुसार झाली आहे. या वाक्यांत **स्थिताः** हें अकर्मक धातूचें कर्मणिभूतकालवाचक धातुसाधित [illegible] असल्यामुळें रचना कर्तरिप्रयोगास धरूनच झाली आहे. '**यद्येष . .. भवति**' या वाक्यानें धूर्तांच्या मनांतील विचार आहे हें दर्शविण्याकरितां त्याच्या नंतर '**इति**' हें अव्यय आलें आहे. [illegible] या पुस्तकांत पूर्वी दिलेल्या नियमानुसार

रचना केली असतां मूळ संस्कृत ग्रंथांतील रचनेसारखी रचना करतां येईल.

२ अथास्तंगते भगवति रवौ सा छत्रग्राहिणी समागत्याकथयत्। भर्तृदारिके तयोर्मुनिकुमारयोरन्यतरो द्वारि तिष्ठति कथयति चाक्षमालामुपयाचितुमागतोऽस्मीति । अहं तु मुनिकुमारनामग्रहणादेव स्थानस्थितापि गतेव द्वारदेशं समुपजाततदागमनशङ्का समाहूयान्यतमं कञ्चुकिनं गच्छ प्रवेश्यतामित्यादिश्य प्राहिणवम् । अथ मुहूर्तादिव तं तस्यानुरूपं सखायमृषिकुमारं कपिञ्जलनामानं जराधवलस्य कञ्चुकिनोऽनुमार्गेणागच्छन्तमपश्यम् ।

वरील उतारा कादम्बरींतील आहे. कादम्बरींतील भाषा म्हणजे पूर्णावस्थेस प्राप्त झालेली संस्कृत भाषा होय. त्यामध्यें समासाचें प्राचुर्य, रचनेचें सौन्दर्य व शब्दांचें औचित्य दिसून येईल. परंतु यांतही वाक्यरचनेचे सामान्य नियम पाळलेले आहेत हें दिसून येईल.

प्रथम वाक्यः—आरंभी कालदर्शक सति सप्तमी रचना आहे. छत्रग्राहिणीच्या शब्दानंतर शेवटीं इति हें अव्यय योजलेलें आहे. ‘अन्यतरः’ या कर्तृपदाशी संबद्ध असलेल्या क्रिया ‘च’ नें जोडलेल्या आहेत व क्रमवार वर्णिल्या आहेत.

द्वितीय वाक्यः—तु हें विरोधदर्शक उभयान्वयी अव्यय प्रथम न देतां ‘अहं’ नंतर आलें आहे. अहं याशीं संबद्ध असणाऱ्या पहिल्या दोन क्रियांबद्दल ल्यबन्तांचा उपयोग केलेला आहे, जसें— **समाहूय** व **आदिश्य**. **समाहूय** या ल्यबन्ताचें कर्मपद मात्र पूर्वी न योजतां नंतर योजलेलें आहे. हा कादम्बरीच्या भाषेचा विशेष आहे.

तिसरें वाक्यः—यांतील रचना सामान्यनियमानुसारच झाली आहे. अपश्यम् याचें कर्मपद व त्याचीं विशेषणें एकामागून एक योजलेलीं आहेत. अथ म्हणजे नंतर हें पहिल्यानें आलेलें आहे.

या दोन उताऱ्यावरून असें दिसून येईल की सामान्यतः संस्कृत ग्रन्थांतील वाक्यरचना ज्या नियमांनुसार करण्यांत आलेली आहे त्याच नियमांचें स्पष्टीकरण या पुस्तकांत करण्यांत आलें आहे.

---

# शब्दसंग्रह.

## अ

अंश (पु)—भाग

अकाल. (पु; न. तत्पु.)—अयोग्य वेळ

अक्षि (न.)—डोळा

अगाध (वि.)—खोल

अगारम् (न.)—घर

अग्निनौका (स्त्री.)—अग्नीच्या साहाय्यानें चालणारें जहाज

अग्न्यस्त्रम् (न.)—तोफ

अघम् (न.)—पाप

अङ्क (पु.)—मांडी, चिन्ह

अङ्गना (स्त्री.)—स्त्री

अङ्गुलीयकम् (न.)—आंगठी

अचेतन (वि.; न. ब.)—मट्ठ डोक्याचा

अजातशत्रु (ब. स.)—ज्याचा शत्रु जन्मला नाहीं असा. युधिष्ठिर

अजित (जि धातूचें क. भू. धा. वि.; न. तत्पु.)—न जिंकलेलें

अजिनम् (न.)—हरिणाचें कातडें

अट् (प्र. ग. प. प.)—हिंडणें, भटकणें

अटवी (स्त्री.)—अरण्य

अण्डम्-, (न., पु.)—अण्डें

अतिकष्ट (वि.)—अतिशय कठीण

अतिलोल (वि.)—अतिशय चंचल, अतिशय दुर्बळ, नाजुक

अतृण (वि.; न. ब.)—ज्या ठिकाणीं गवत नाहीं असें. (जागा)

अत्यय (पु.)—अंत, संकट

अधस्तात् (अव्यय)—खालीं

अधिगम (पु.)—लाभ, मिळविणें

अधिजग्मिवस् (द्वि. भू. धा. वि.; अधि+गम्)—ज्यानें मिळविलें आहे असा

अधिदेवता (स्त्री)—मुख्य देवता

अधीत (क. भू. धा. वि.; अधि+इ)—शिकलेला

अध्वग (पु)—वाटसरू

अनध्याय (पु.; न. तत्पु.)—सुटीचा दिवस

अनपायिन् (वि)—नित्य टिकणारें, अविनाशी

अनय (पु)—अनीति, अन्याय

अनवेक्षणम् (न.; न. तत्पु.)—निष्काळजीपणा, दुर्लक्ष

अनाथ (वि., न. ब.)—निराधार

अनामय -म् (पु., न.; न. तत्पु.)—निरोगीपणा

अनिर्वृत (वि; न. तत्पु.)—सुखी नसलेला

अनिशम् (अव्यय)—एकसारखा, सतत

अनीकम्- (न., पु)—सैन्य

अनुकम्पा (स्त्री.)—कींव, दया
अनुज्ञात (अनु + ज्ञा धातूचें क. भू. धा. वि.)—परवानगी दिलेला.
अनुनयः (पु.)—मनधरणी
अनुविद्ध (अनु + व्यध् धातूचें क. भू. धा. वि.)—वेढिलेलें
अनुशयः (पु.)—पश्चात्ताप
अनृतम् (न.)—खोटें वचन
अन्तरिक्षम् (न.)—आकाश, हवा
अन्तरा (अव्यय)—मध्यें, शिवाय
अन्वयः (पु.)—संबंध, कुळ
अपगमः (पु.)—दूर होणें, नाश
अपत्यम् (न.)—मूल
अपवर्गः (पु.)—मोक्ष
अपाय (पु.)—संकट, दुःख, नाहींसे होणें, दूर जाणें
अप्रतिम (वि.; न. ब.)—अनुपम, ज्याच्या जोडीचा कोणी नाहीं असा
अप्रतिहत (प्रति + हन् या धातूचें क. भू. धा. वि.; न. तत्पु.)—जिला कमीपणा आला नाहीं अशी, सर्वगामी (बुद्धि)
अप्सरस् (स्त्री.)—अप्सरा
अबुध. (न. तत्पु.)—मूर्ख
अभयम् (न. तत्पु.)—संरक्षण
अभिगन्तृ (वि.)—चाल करणारा
अभिज्ञानम् (न.)—खूण, चिन्ह
अभियुक्त (अभि + युज् या धातूचें क. भू. धा. वि.)—पारंगत, विद्वान्
अभिलाषः (पु.)—इच्छा
अभीक्ष्णम् (अव्यय)—एकसारखें, अतिशय
अभ्रम् (न.)—मेघ
अमानुषी (वि.; न. तत्पु.)—मनुष्यजातीशिवाय इतर जीवजातीचा प्राणी
अम्बरम् (न.)—वस्त्र, आकाश
अम्भस् (न.)—पाणी
अम्भोधि. (पु.)—सागर, समुद्र
अम्ल (वि.)—आंबट
अयस् (न.)—लोखंड
अरण्यौकस् (वि.)—अरण्य हेंच ज्याचें घर आहे तो
अरुणः (पु.)—सूर्याच्या सारथ्याचें नांव
अर्कः (पु.)—सूर्य
अर्घ्यम् (न.)—पूजा करतांना अर्पण करण्याचें साहित्य
अर्च्—(१ उ. प.; १० प. प.)—पूजा करणें, मान देणें
अर्जनम् (न.)—मिळविणें
अर्णवः (पु.)—समुद्र
अर्थः (पु.)—१ हेतु, उद्देश
२ संपत्ति, द्रव्य
३ वस्तु
४ शब्दांचा अर्थ
अर्थ्य (वि.)—अर्थपूर्ण, योग्य
अर्द् (१, १० प. प.)—पीडा देणें
अर्भकः (पु.)—मूल, मुलगा

अर्ह् (१, १० प प)—योग्यता असणें, अधिकार असणें

अवगाह (पु)—स्नान, बुडी मारणें

अवनि (स्त्री)—पृथ्वी

अवहित (अव+धा धातूचें क भू धा वि)—जागरूक रम असलेला

अविरत (न तत्पु, वि)—न थांबलेला, एकसारखा चालू

अव्यय (न ब वि)—नाश न पावणारा

अव्यतिरिक्त (न तत्पु वि)—निराळा नसलेला, भिन्न नसलेला

अश् (९ प प)—खाणें, भक्षण करणें

अशनि (पु स्त्री)—इन्द्राचें वज्र —विजेचें चमकणें

अश्वारोह (पु)—घोडेस्वार

अस् (४ प प)—फेकणें, घालवून देणें

निर्+अस्—नाश करणें, घालवून देणें

असंवृत (न तत्पु वि)—उघडा, आच्छादित नसलेला

असिधाराव्रतम् (न)—तरवारीच्या धारेवर उभे राहण्यासारखे कठिण नियम

अस्थायिन् (वि)—क्षणभंगुर, चिरकाल न टिकणारा

अहन् (न)—दिवस

अहि (पु)—साप

अह्नाय (अव्यय)—तत्क्षण, लौकर, एकदम

## आ

आ (अव्यय)—क्रोध, आश्चर्य व शोक दर्शविणारें अव्यय

आकृष्ट (आ+कृष् धातूचें क भू धा वि)—ओढलेला, ग्रासलेला

आखण्डल (पु)—इन्द्र

आखु (पु)—उंदीर

आगन्तुक (पु)—अनोळखी मनुष्य, पाहुणा

आघात (पु)—तडाखा, मार

आडम्बर (पु)—भपका, बाह्य उपकरण

आढ्य (वि)—भरलेला, युक्त

आतप (पु)—सूर्याची उष्णता, सूर्य प्रकाश

आत्त (आ+दा धातूचें क भू धा वि)—घेतलेलें

आत्मवश्य (वि)—स्वतःचे ठिकाणी असलेला

आत्मीय (वि)—स्वतःचें

आदरादरम् (न, आदर+आदर)—आदराचें स्थान

आदरार्ह (वि)—आदर करण्याला योग्य

आदेश (पु)—हुकूम, आज्ञा

आप् (५ प प)—मिळविणें

अव+आप्—मिळविणें

परि+ „—योग्य, समर्थ किंवा पुरा असणें

प्र + ,,—गोंवण, मिळवणें
सम् + ,,—समर्पिणें, साध्य करणें
आपन्न ( आ + पद् धातूचें क भू धा. वि )—मिळविलेला, स्थितींप्रत गेलेला
आप्त (पु)—१ विश्वासाई मनुष्य
२ नातलग
आभरणम् (न)—दागिना, शोभा दायक अलंकार
आम्रकुम्भ (पु)—मातीचें कच्चें भांडें
आमिषम् (न)—मांस, भक्ष्य
आयतनम् (न)—ठिकाण, विश्रान्ति-स्थान
आयस (वि)—लोखंडी
आयुस् (न)—आयुष्य
आराधनम् (न)—मनाचा संतोष, रंजन
आलम्ब (वि)—लोंबणारा
आलम्ब (पु नाम)—आधार
आलस्यम् (न.)—आळस
आलिखित ( आ + लिख् धातूचें क भू धा वि.)—रेखाटलेला, आकृति काढलेला,
आलि -ली (स्त्री)—मैत्रीण
आविष्ट ( आ + विश् धातूचें क भू धा वि )—पछाडलेला, घेरलेला, मग्न झालेला
आशास्य ( आ + शास् धातूचें क वि धा वि )—इच्छिण्यास योग्य
आशु (अव्यय)—शीघ्र, त्वरेनें
आशिस् (स्त्री)—आशीर्वाद, शुभ शब्द
आश्रम -म् (पु न)—१ यतींची राहण्याची जागा, पर्णकुटिका
२ आयुष्याचा एक चतुर्थांश भाग, अवस्था
आसेदिवस् ( आ + सद् धातूचें द्वि भू धा वि )—प्राप्त झालेला, पोहों चलेला, जवळ गेलेला
आस्यम् (न)—तोंड

## इ

इ (२ प ए)—जाणें
उप + इ—जवळ जाणें, युक्त होणें
परि + इ—१ विचार करणें,
२ वेढणें
प्रति + इ—विश्वास ठेवणें
प्रति + इ—( प्रयोजक-प्रत्यययुक्त ) —विश्वास उत्पन्न करणें
इज्या (स्त्री)—पूजा, यज्ञ
इन्दु (पु)—चन्द्र
इष् (६ प ए)—इच्छिणें
(४ प ए)—टाकणें, टाकविणें
अनु + इष् (४ प ए)—शोधणें
इषु (पु)—बाण

## ई

ई (४ आ ए)—जाणें
उद् + ई—वर येणें, उदय पावणें

ईक्ष् (१ आ. प.)—पाहाणें
निर्+ईक्ष्—बारकाईनें पाहाणें
परि+ईक्ष्—परीक्षा करणें, तपासणें
प्र+ ,,—पाहाणें
प्रति+ ,,—वाट पाहाणें
ईक्षणम् (न.)—डोळा
ईप्स् (आप् धातूचें इच्छार्थक रूप)—मिळविण्याची इच्छा करणें
परि+ईप्स्—,, ,, ,,
ईप्सितम् (न.)—इच्छा, इच्छित गोष्ट
ईर् (२ आ. प.)—जाणें चालणें, हलणें चालणें

उ

उच्चैःश्रवस् (पु.)—इन्द्राच्या घोड्याचें नाव
उज्झ् (६ प. प.)—टाकणें, सोडणें
प्र+उज्झ्— ,, ,,
उन्मूल्य (उद्+मूल् धातूचें ल्यबन्त)—समूळ उपटून, नाश करून
उत्तानित (उद्+तन् धातूच्या प्रयोजकाचें क. भू. धा. वि.)—वर केलेलें, वर उचललेलें
उत्तुंग (वि.)—फार उंच
उत्संग (पु.)—मांडी
उत्सृज्य (उद्+सृज् धातूचें ल्यबन्त)—सोडून
उद्गीर्ण (उद्+गॄ धातूचें क. भू. धा. वि.)—ओकलेलें, बाहेर टाकलेलें
उद्दिष्ट (उद्+दिश् धातूचें क. भू. धा. वि.)—योजलेलें, मनांत असलेलें
उद्दिश्य (उद्+दिश् धातूचें ल्यबन्त)—उद्देशून, संबंधी
उन्मत्त (उद्+मद् धातूचें क. भू. धा. वि.)—वेडा, शुद्धीवर नसलेला
उपपन्न (उप+पद् धातूचें क. भू. धा. वि.)—योग्य, युक्तीला पटलेलें
उपहृत (उप+हृ धातूचें क. भू. धा. वि.)—दुग दिलेला, शरा दिलेला
उपल: (पु.)—दगड
उपलक्षणम् (न.)—विशिष्ट गुण
उपस्थ: (पु.)—मांडी, मधला भाग (रथोपस्थः—रथाचा मधील भाग)
उपानह् (स्त्री.)—जोडा
उपान्तः (पु.)—कडेचा भाग
उपेत (उप+इ धातूचें क. भू. धा. वि.)—जवळ गेलेला, युक्त
उपेयिवस् (उप+इ धातूचें द्वि. भू. धा. वि.)—जवळ गेलेला आहे असा
उमा (स्त्री.)—पार्वती
उरगः (पु.)—साप
उषित्वा (वस् धातूचें ल्यबन्त)—राहून

ऊ

ऊरुद्वयम्—दोन्ही मांड्या
ऊह् (१ उ. प.)—तर्क करणें, लक्षांत ठेवणें
अप+ऊह्—नाहींसें करणें, नाश करणें

### ऋ

ऋ (१ प प)—जाणें
,, (प्रयोजक-अर्पयति)—देणें, अर्पण करणें
सम्+अर्पयति—समर्पण करतो
प्रति+ ,, —परत करतो

### ए

एकरूपता (स्त्री)—सारखें स्वरूप
एकान्ततः (अव्यय)—पूर्णपणें सर्वस्वी
एकरूप (वि)—एका स्वरूपाचा

### ऐ

ऐश्वर्यम् (न)—संपत्ति
ऐहिक (वि)—या जगांतील

### औ

औदासीन्यम् (न)—उदासपणा

### क

कथकिन् (पु)—कथा पुराणांचा सेवक
कटु (वि)—तिखट
कनकम् (न)—सोनें
कनिष्ठ (वि)—सर्वांत लहान
कन्था (स्त्री)—गोधडी चिंध्यांनीं बनविलेलें वस्त्र
कन्दर-म् (पु न)—गुहा दरी
कन्दुक (पु)—चेंडू
कन्धरा (स्त्री)—मान
कम्प् (१ आ प)—कांपणें
वि+कम्प्—कांपणें, हालणें
कर (पु)—१ हात, किरण
२ सोंड
३ प्रजेनें राजाला दिलेला पैसा
करणम् (न)—इन्द्रिय
कराल (वि)—भयंकर
कर्णधार (पु)—सुकाणू धरणारा
कलङ्क (पु)—डाग
कला (स्त्री)—१ चौसष्ट कलांतील एक
२ चन्द्रबिम्बाचा सोळावा हिस्सा
कलुष (वि)—[illegible]
—मलिन, चिखलानें भरलेला
कल्पलता (स्त्री)—मनोरथ पुरविणारी वेल
कल्पित (क्लृप् धातूच्या प्रयोजकाचें क भू धा वि)—तयार केलेला
कल्याणम् (न)—हित, शुभ गोष्ट
,, (वि)—शुभकारक, सुखावह
कल्लोल (पु)—मोठी लाट
काङ्क्षा (स्त्री)—इच्छा
काच (पु)—कांच
काण (वि)—एका डोळ्यानें आंधळा, एकाक्ष
काण्ड-म् (पु न)—१ पुस्तकाचा भाग २ देंठ ३ बाण
कान्त (वि)—सुंदर, रमणीय

कान्त (पु)—नवरा, आवडता मनुष्य
कान्ता (स्त्री)—स्त्री, आवडती स्त्री
कापुरुष (पु)—क्षुद्र पुरुष
कामिनी (स्त्री)—सुंदर किंवा प्रिय स्त्री
कार्मुकम् (न)—धनुष्य
कारण्डव (पु)—बदकाच्या जातीचा प्राणी
किंनर (पु)—पुराणांतला काल्पनिक प्राणी (मनुष्याचें शरीर व घोड्याचें डोकें असलेला)
कियत् (वि)—किती
कीट (पु)—किडा
कुकृतम् (न)—वाईट कृत्य
कुतूहलिन् (वि)—जिज्ञासा असणारा
कुबुद्धि (स्त्री)—वाईट विचार
कुरङ्गनाभि (पु)—कस्तुरी
कुशीलव (पु)—सोंगाड्या
कुशिकनन्दन (पु)—विश्वामित्र
कुशेशयम् (न)—कमळ
कूपखननम् (न)—विहीर खणणें
कृ (८ उ प)—करणें
निर्+कृ—नायनाट करणें घालवून देणें
कृच्छ्र -म् (पु, न)—१ संकट २ एक प्रकारचें तप किंवा प्रायश्चित्त
कृत् (६ प प)—तुकडे तोडणें
कृतिन् (वि)—भाग्यशाली सुदैवी
कृपण (वि)—क्षुद्र, दीन
कृपण (पु)—कंजूष मनुष्य

कृष् (१, ६, प प)—ओढणें नांगरणें
आ+कृष्—आकर्षण करणें, ओढणें
कृषि (स्त्री)—शेतकी
कृष्णा—द्रौपदी
कॄ (६ प प)—पसरणें, फेंकणें
वि+कॄ— ,, ,,
अव+कॄ—आवरण व्याप्त करणें
कॢप् (१ आ प)—योग्य असणें परिणाम होणें
कोटर -म् (पु न)—झाडाची ढोली
कोप (पु)—राग
कौटिल्यम् (न)—वाकडेपणा, दुष्टपणा
कौलीनम् (न)—लोकापवाद
क्रतु (पु)—यज्ञ
क्रम् (१ उ प ४ प प)—चालणें, जाणें
आ+क्रम्-आक्रमते—आक्रमण करतो (१ आ प)
क्रमागत (वि)—क्रमानें आलेला
क्रमात् (अव्यय)—क्रमानें
क्री (९ उ प)—विकत घेणें
क्रीत (क्री धातूचें कर्मणि भू. धा. वि)—विकत घेतलेला
क्रीतवान् (क्री धातूचें कर्तरि भू. धा. वि)—विकत घेता झाला
क्रुश् (१ प प)—ओरडणें रडणें
आ+क्रुश्—ओरडणें, शाप देणें, वाईट शब्द बोलणें

क्रोधन (वि)—रागीट
क्रोश (पु)—दोन मैल
क्षतम् (न)—जखम
क्षतजम् (न)—रक्त
क्षपा (स्त्री)—रात्र
क्षमावत् (वि)—क्षमाशील
क्षि (१ प प)—ऱ्हास होणें, कमी होणे
(प्रयोजक-क्षपयति—नाश करणें, वेळ घालवणें)
क्षितिधर (पु)—पर्वत
क्षितीन्द्र (पु)—राजा
क्षीरम् (न)—दूध
क्षीरिणी (वि स्त्री)—दूध देणारी
क्षुण्ण (क्षुद् धातूचें क भू धा वि)—रगडलेला
क्षेत्रम् (न)—शेत
क्षोदीयस (वि)—ज्यास्त नाच

## ख

खम् (न)—आकाश
खञ्ज (वि)—लंगडा
खण्ड -म् (पु न)—तुकडा, एक भाग
खन् (१ प प)—खणणें
नि+खन्—पुरणे
खनित्रम् (न)—कुदळ
खल (पु)—दुष्ट मनुष्य
खाद् (१ प प)—खाणें

## ग

गण् (१० उ प)—मोजणें, पर्वा करणें
गताङ्ग (वि)—शीण गेला आहे असा
गन्तुकाम (वि)—जाण्याची इच्छा करणारा
गम् (१ प प)—जाणें
प्रति+आ+गम्—परत फिरणें, येणें
गरलम् (न)—विष
गाण्डीवम्- (न, पु)—अर्जुनाच्या धनुष्याचें नाव
गात्रम् (न)—अवयव, शरीर
गान्धारराज (पु)—सुबल राजा
गाह् (१ आ प)—बुडी मारणें, स्नान करणें
गुणत्वम् (न)—दोरीची स्थिति, दोरपणा
गुप्ति (स्त्री)—रक्षण
गुरु (वि)—जड, वडील महत्त्वयुक्त
गुरु (पु)—शिक्षक वडील मनुष्य
गुरुजन (पु)—वडील माणस
गुरुत्वम् (न)—महत्त्व
गुह् (१ उ प)—झाकणें
गृहमेधिन् (पु)—गृहस्थाश्रमी मनुष्य
गेहम् (न)—घर
गो (पु)—बैल, इन्द्रिय
„ (स्त्री)—गाय, पृथ्वी
गोप्तृ (पु)—रक्षण करणारा

जव (पु.)—वेग
जाठराग्नि (पु.)—पचनशक्तिरूपी अग्नि
जाड्यम् (न.)—मंदपणा, बुद्धिमान्द्य
जात (जन् धातूचें क भू धा. वि.)—उत्पन्न झालेला.
जि (१ प प.)—जिंकणें
    निर् + जि—जिंकणें
    परा+जि (१-आ प)—पराजय करणें
जिघांसु (हन् धातूच्या इच्छार्थक रूपाचें प. का. धा. वि)—ठार मारण्याची इच्छा करणारा
जिजीविषति (जीव् धातूचें इच्छार्थक रूप)—जगण्याची इच्छा करतो
जिष्णु (पु)—अर्जुनाचें नाव
जिहीर्षु (हृ धातूचे इच्छार्थक उकारान्त नाम)—हरण करण्याची इच्छा करणारा
जुष् (६ आ प.)—आवडणें
    जोषयति (प्रयोजक)—आवड उत्पन्न करणें
जृम्भ् (१ आ. प.)—उघडणें, जांभई देणें
    वि+जृम्भ्—पसरणें
ज्या (स्त्री.)—धनुष्याची दोरी
ज्येष्ठ (वि.)—सर्वांत वडील
ज्योतिस् (न.)—१ प्रकाश
    २ परब्रह्माचें तेज
    ३ तारा
ज्योत्स्ना (स्त्री.)—चन्द्रप्रकाश

## ड

डी (१ आ. प.)—उडणें
    उद्+डी—उंच उडणें

## त

तन् (८ उ. प)—पसरणें, पसरविणें, वाटविणें
तनु (वि)—लहान, आकुंचित, बारीक
तनु (स्त्री)—देह
तन्द्रा (स्त्री)—झोपाळूपणा, थकवा
तप् (१,४ प प)—प्रकाशणें, तळपणें
तप् (प्रयोजक)—तापवणें, ताप देणें
तपस्विन् (पु)—तपश्चर्या करणारा, यति
तपोधन (पु)—यति
तमस् (न)—काळोख, अज्ञान
तमिस्रा (स्त्री.)—रात्र
तरस् (न.)—वेग, बल
तर्क् (१० उ प)—तर्क करणें, विचार करणें
तस्कर (पु)—चोर
तिर्यञ्च् (पु, न.)—क्षुद्र प्राणी
तीर्थम् (न)—घाट, पवित्र स्थळ, पवित्र पुरुष
तुङ्ग (वि)—उंच
तुरङ्ग (पु)—घोडा
तुला (स्त्री)—तराजू
तुष (पु)—टरफल
तुषार (पु.)—बर्फ
तूर्यम्- (न, पु)—एक वाद्य

तूष्णीम् (अव्यय)—स्तब्ध गप्प
तॄ (१ प प)—ओलांडून जाणें
उद्+तॄ—तरून जाणें, उतरून बाहेर येणें
वि+तॄ—देणें, इयाळीं करणें
वि+अति+तॄ (प्रयोजक)—पलीकडे नेणें
तोयम् (न)—पाणी
तोरणम्— (न, पु)—कमानदार दरवाजा
त्याग (पु)—दान करणें, टाकणें, सोडून देणें
त्र्यम्बक (पु)—शंकर
त्रितयम् (न)—तीन वस्तूंचा समूह
त्रै (१ आ प)—रक्षण करणें
त्वादृश (वि)—तुझ्यासारखा

द

दह् (१ प प)—जाळणें, दग्ध करणें
दधि (न)—दही
दम्पती (पु द्विवचन)—नवराबायको
दय् (१ आ प)—दया करणें
दरिद्रा (२ प प)—दरिद्री होणें
दव (पु)—वणवा
दल (१ प प)—फुलणें, फुटणें
(प्रयोजक)—फोडणें, तोडणें, नाश करणें
दवीयस् (वि)—अत्यन्त दूर
दहन (वि)—नष्ट करणारा, जाळणारा
दहन (पु)—अग्नि

दा (१ प, ३ उ प)—देणें
आ+दा—घेणें
प्र+दा—देणें
प्रति+दा—फेड करणें, परत देणें
दार (पु ब व) भार्या
दारुण (वि)—भयंकर
दित्सा (स्त्री, दा धातूचें इच्छार्थक नाम)—देण्याची इच्छा
दिव् (४ प प)—जुगार खेळणें
दिव्य (वि)—स्वर्गीय, प्रकाशणारा
दिवाकर (पु)—सूर्य
दिवौकस् (पु)—देव
दीपार्चि (न)—दिव्याची ज्योत
दीर्घसूत्रता (स्त्री)—दिरंग लावण्याचा गुण, चालढकलपणा
दुग्धकुल्या (स्त्री)—दुधाचा पाट
दुरतिक्रम (वि)—न बदलणारा
दुराप (वि)—मिळण्यास कठिण
दुरारोह (वि)—चढण्यास कठिण
दुर्गम् (न)—किल्ला
दुर्विदग्ध (वि)—पूर्ण भोळ्या गर्वानें फुगलेला
दुर्दिनम् (न)—ढगाळ वातावरण
दृ (६ आ प)—आ+दृ आदर करणें, मान देणें
दृष्ट (दृश् धातूचें क भू धा वि)—पाहिलेला
देव (पु)—१ राजा २ ईश्वर
देहबन्ध (पु)—शरीराचा बांधा

देहिन् (पु)—मनुष्य, आत्मा
द्रढयति (दृढ या विशेषणापासून झालेले क्रियापद)—दृढ करतो
द्रष्टुम् (दृश् धातूचें तुमन्त अव्यय)—पाहण्याकरिता
द्रुम (पु)—वृक्ष
द्रुह् (४ प प)—द्रोह करणें, द्वेष करणे
द्वार् (न)—दरवाजा
द्विज (पु)—१ पक्षी २ ब्राह्मण
द्वीप -म् (पु न)—बेट
द्वेष्टृ (पु)—द्वेष करणारा
द्वेष्य (द्विष् धातूचें क वि या वि)—द्वेष करण्याला योग्य

ध

धनंजय (पु)—अर्जुनाचे नाव
धनिक (पु)—श्रीमंत मनुष्य
धनुष् (न)—धनुष्य
धर्मवादिन् (वि)—धर्माचें विवरण करणारा
धा (३ उ, प)—ठेवणे
अभि+धा—बोलणें
नि+धा—ठेवणें
वि+धा—आचरणात आणणें, लिहून ठेवणें
धाव् (१ प प)—धावणे
अभि+धाव्—चाल करून जाणें
धिक् कृ (८ उ प.)—धिक्कार करणे
धी (स्त्री)—बुद्धि
धीर (वि)—धीट, स्थिर बुद्धीचा, विद्वान्
धीरम् (अव्यय)—स्थिरपणें, धीटपणें
धीवर (पु)—कोळी
धुर् (स्त्री)—जू, जोखड, जोखीम
धृ (१० उ प)—ऋणी असणें, धरणें, आश्रय देणें
धृ (६ आ प)—जिवंत राहणे, चालू राहाणे
धृति (स्त्री)—धैर्य
ध्रुव (वि)—निश्चित, कायम टिकणारा
ध्रुवम् (अव्यय)—खरोखर
ध्वन् (१ प प)—आवाज करणें, गडगडणें
ध्वनि (पु)—आवाज

न

नकुल (पु)—मुंगुस
नगापगा (स्त्री.)—पर्वतातून वाहणारी नदी (नग-पर्वत+आपगा-नदी)
नन्द् (१ प प)—आनंदित होणें, संतुष्ट होणें
आ+नन्द् (प्रयोजक)—आनंदित करणें
अभि+नन्द्—आनंदित होणें, अभिनंदन करणें
नवनीतम् (न)—लोणी
नारिकेल (पु)—नारळाचें झाड
निकर (पु)—समूह, राश

निदर्शनम् (न.)—उदाहरण, दाखला
निदाघ (पु.)—उन्हाळा
निद्रा (२ प. प.)—झोंपी जाणें
निधनम्- (न., पु.)—नाश, मरण
निधानम् (न.)—साठा, संपत्ति
निनीषु (नी धातूचें इच्छार्थक कर्तृवाचक वि.)—नेण्याची इच्छा करणारा
निपात (पु.)—आघात, पडणें
निपुणम् (अव्यय)—बारकाईनें, काळजीपूर्वक
निमेष (पु.)—क्षण
नियत (नि+यम् धातूचें क. भू. धा. वि.)—निश्चित, ताब्यात ठेवलेला
नियुक्त (नि+युज् धातूचें क. भू. धा. वि.)—नेमलेला
नियोग (पु.)—हुकूम
निरभिलाष (वि.)—निरिच्छ, निष्काम
निराहार (वि.)—आहार न घेतलेला
निर्गत (निर्+गम् धातूचें क. भू. धा. वि.)—पूर्णपणें निघालेला
निर्झर -म्—ओढा, प्रवाह
निर्भर (वि.)—गाढ
निर्भिन्न (निर्+भिद् धातूचें क. भू. धा. वि.)—भिन्न, दुभंगलेला
निर्वृति (स्त्री.)—सुख, संतोष
निर्वेद (पु.)—तिटकारा, निराशा
निर्वासित (निर्+वस् धातूच्या प्रयोजक क. भू. धा. वि.)—हाकलेला
निःशब्दम् (अव्यय)—निःशब्द

निशा (स्त्री.)—रात्र
निशित (वि.)—तीक्ष्ण
निषण्ण (नि+सद् धातूचें क. भू. धा. वि.)—घट्ट बसलेला, चिकटलेला
निषेक (पु.)—शिंपणें, सिंचणें
निसर्ग (पु.)—१ स्वभाव, २ सृष्टि
नी (१ प. प.)—नेणें
निर्+नी—निर्णय करणें
परि+नी—विवाह करणें
प्र+नी—रचना करणें, लिहून ठेवणें
नीचैस् (अव्यय)—खालीं, क्षुद्र स्थितींत
नीरम् (न.)—पाणी
नीलीभाण्डम् (न.)—निळीचें भांडें
नूपुर -म् (पु., न.)—पैंजण
नेमि (स्त्री.)—परिघ
नैष्कर्म्यम् (न.)—निष्क्रियता
न्याय्य (वि.)—न्यायाला धरून

प

पक्ष (पु.)—बाजू, पंख, पंधरा दिवस
पञ्जर (पु.)—पिंजरा
पटीरपादप (पु.)—चन्दनाचें झाड
पटु (वि.)—हुशार, बुद्धिमान, निपुण
पण्डित (पु.)—विद्वान् मनुष्य, बुद्धिमान् मनुष्य
पत् (१ प. प.)—पडणें
उद्+पत्—उडणें, उडी मारणें
अभि+पत्—हल्ला करणें, धावणें

पतङ्गः (पु.)—पुल्पाखरूं, पक्षी, —सूर्य

पक्षिन् (पु.)—पक्षी

पत्तिः (पु.)—शिपाई (पायदळांतील)

पथ्य (वि.)—हितकर, योग्य

पथ्यम् (न.)—कल्याण, हित

पथ्यरूप (वि.)—हितकारक स्वरूपाचा

पथिकः—वाटसरू

पद् (४ आ. प.)—जाणें, मिळणें

उद् + पद् (प्रयोजक)—उत्पन्न करणें

उप + पद्—योग्य असणें, युद्धाला पटणें

प्रति + पद्—मिळवणें, कबूल करणें, आचरणें, जाणें, प्राप्त होणें

पदातिः (पु.)—पायदळांतील शिपाई

पनसः (पु.)—फणसाचें झाड

परः (वि.)—परका, दुसरा, श्रेष्ठ, शत्रु

परभृता (स्त्री.)—कोकिळा

परिग्रहः (पु.)—स्वीकार, परिवार विवाह, भार्या

परिणतिः (स्त्री.)—परिणाम

परितः (अव्यय)—सभोंवती

परिपन्थिन् (वि.)—अडथळा करणारा

परिपाकः (पु.)—परिणाम

परिभवः (पु.)—अवज्ञा, अनादर

परिवत्सरः (पु.)—पूर्ण वर्ष

परिवासित (वि.)—सुवासिक

परिष्कृत (परिष्कृ धातूचें क. भू. धा. वि.)—सुशोभित केलेला, शुद्ध केलेला

परुष (वि.)—कठोर, राकट्दांन

पर्यङ्कः (पु.)—बिछाना, पलंग

पर्याप्त (वि.)—पुरेसा

पशुपतिः (पु.)—शंकर

पा (१ प. प.)—पिणें

(२ प. प.)—रक्षण करणें

पा (प्रयोजक—१ प. प.)—पाजणें (पायय)

„ („ २ प. प.)—रक्षण करणें (पालय)

पाकशासनः (पु.)—इन्द्र

पाणिः (पु.)—हात

पाण्डुर (वि.)—फिकट, पांढुरका

पातित (पत् धातूच्या प्रयोजकाचें क. भू. धा. वि.)—पाडलेला, झापटलेला

पाथेयम् (न.)—प्रवासाची सामग्री

पादपः (पु.)—वृक्ष

पान्थः (पु.)—वाटसरू

पारग (वि.)—परतीराला जाणारा

पारितोषिकम् (न.)—बक्षिस

पार्थिवः (पु.)—राजा

पार्श्वः-म् (पु., न.)—बाजू

पावन (वि.)—पवित्र

पिण्डः (पु.)—गोळा, अन्न

पिपीलिका (स्त्री.)—मुंगी

पिशिताशनः (पु.)—राक्षस, भूत

पिशुन (वि.)—दुष्ट

पीडित (पीड् धातूचें क. भू. धा. वि.)—(१) दाबलेला, (२) रगडलेला, (३) त्रास दिलेला

प्रदीप (पु)—दिवा, (प्रकाशमान करणारा)
प्रधान (वि)—मुख्य
प्रभूत (वि)—पुष्कळ
प्रमाणम् (न)—आधार
प्रयस्त (वि)—इकडे तिकडे पसरलेला
प्रवीर (पु)—मोठा वीर
प्रवृत्ति (स्त्री)—वार्ता
प्रश्रय (पु)—विनय, सन्मान
प्रसन्न (वि)—स्वच्छ निर्मळ, संतुष्ट
प्रसित (वि)—उत्सुक
प्रसूनम् (न)—फूल
प्रस्थित (प्र+स्था धातूचें क भू धा वि)—निघालेला
प्राक् (अव्यय)—पूर्वी
प्राकार (पु)—तट
प्राङ्गणम् (न)—आवार
प्राज्ञ (पु)—शहाणा मनुष्य
प्राणापहारिन् (वि)—प्राण घेणारा
प्राय-प्रायेण (अव्यय)—बहुधा, बहुश
प्रासाद (पु)—राजवाडा
प्रेष्यता (स्त्री)—दास्य
प्लवग (पु)—वानर
प्लु (१ आ प)—पोहणें, तरणें
आ+प्लु—उडी मारणें, बुडी मारणें
वि+प्लु—वाहावत जाणें
सम्+प्लु—एकत्र होणें, एकत्र वाहणें

फ

फणिन् (पु)—सर्प
फल् (१ प प)—फलद्रूप होणें
फाल्गुन (पु)—अर्जुनाचें नाव

ब

बक (पु)—बगळा
बडिशम् (न)—मासे पकडण्याचा गळ
बन्ध् (९ प प)—बांधणें
नि+बन्ध—घट्ट बांधणें
बलि (पु)—कर
बलिकर्मन् (न)—बळी देणें, आहुति देणें
बलीवर्द (पु)—बैल
बहल (वि)—पुष्कळ, विपुल
बहिस् (अव्यय)—बाहेर
बाल (पु)—१ मुलगा, २ केस
बालापत्यम् (न)—लहान पिल्लू
बाष्पम् (न पु)—अश्रु, वाफ
बाष्पगद्गदम् (अव्यय)—अश्रूंनीं गळा दाटून
बिम्बोद्ग्राह (पु)—प्रतिमा उमटणें
बुभुक्षु (पु भुज् धातूचें इच्छार्थक उकारान्त नाम)—खाण्याची इच्छा करणारा
बृहत्सहाय (वि)—ज्याला बलवान मदतगार आहे ता
ब्रू (२ उ प)—बोलणें

भ

भद्रम् (न.)—कल्याण, सुख
भद्र (वि.)—भला
भव (पु.)—संसार
भवताप (पु.)—संसारातील दुःख
भस्मचय (पु.) राखेचा ढीग
भाग्यम् (न.)—दैव, नशीब
भाजनम् (न.)—आश्रयस्थान
भावस्थिर (वि.)—हृदयांत दृढ झालेला
भास् (स्त्री.)—प्रकाश, तेज
भास्वर (वि.)—प्रकाशणारा, तेजस्वी
भास्वत् (पु.)—सूर्य
भिक्ष् (१ आ. प.)—याचना करणें
भीम (वि.)—भयंकर
भ्रष्ट (भ्रंश् धातूचे प. भू. धा. वि.)—खाली पडलेला, चळलेला
भुज (पु.)—बाहु
भुजग (पु.)—सर्प
भू (१ प. प.)—होणें, असणें
  प्र+भू—उत्पन्न होणें, सत्ता चालवणें, समर्थ असणें
  वि+भू (प्रयोजक)—युक्त असणें, स्पष्ट असणें
भूति (स्त्री.)—भरभराट, उत्कर्ष
भूयस् (अव्यय)—पुन्हा, जास्त
  ,, (वि.)—अधिक, विपुल
भृ (३ उ. प.)—भरणें, पोसणें, धारणें
भ्रंश् (प्रयोजक)—नाश करणें, खाली पाडणें
भ्रम् (१-४ प. प.)—भटकणें, फिरणें

म

मण्डूक (पु.)—बेडूक
मणि (पु.)—रत्न
मति (स्त्री.)—विचार, बुद्धि, मन
मत्तदन्तिन् (पु.)—माजलेला हत्ती
मत्स्य (पु.)—मासा
मदजननता (स्त्री.)—मद किंवा गर्व उत्पन्न करण्याचा स्वभाव
मधुमास (पु.)—चैत्रमास
मधुव्रत (पु.)—भुंगा
मध्यमम् (न.)—कंबर
मध्यम (वि.)—मधला
मन् (४ आ. प.)—विचार करणें
  अव+मन्—अपमान करणें
मनोज्ञ (वि.)—सुंदर, आकर्षक
मन्त्र (पु.)—वेद, मंत्र, विचारविनिमय
मन्थ् (९ प. प.)—घुसळणें
मन्दकान्ति (वि.)—ज्याचें तेज मंद झालें आहे तो
मकरन्द (पु.)—फुलांतील मधबिंदु
मरकतम् (न.)—पाचरत्न
मातङ्गः (पु.)—हत्ती
मर्मोद्घट्टनम् (न.)—काळजाचा छेद
मृद् (९ प. प.)—चुरडणें

नि+मस्ज्—बुडणें, आत शिरणें
महारथ (पु)—मोठा योद्धा
महार्घ (वि)—मूल्यवान्, महाग
महार्ह (वि)— ,, , ,,
महीध्र (पु)—पर्वत
महोदय (पु)—मोठा उत्कर्ष
मामक (वि)—माझ्या बाजूचे
मायाविन् (वि)—कपटी, ठक
मायिन् (वि)— ,,
मार्गणम् (न)—शोध
मार्दवम् (न)—मऊपणा, नरमपणा
मार्मिक (वि)—मर्म ओळखणारा
मित्र (पु.)—सूर्य
मित्रम् (न.)—मित्र, स्नेही
मितभाषिन् (वि)—मोजकें बोलणारा
मिथुनम् (न)—जोडी
मिष्टान्नम् (न)—गोड किंवा चवदार अन्न (मिष्ट+अन्न)
मुग्ध (वि)—प्रेमळ, आकर्षक
मुद् (स्त्री)—आनंद
मुद्रा (स्त्री)—(निद्रामुद्रा), निद्रारूपी मोहोर
मुमुक्षु (मुच् धातूच्या इच्छार्थकाचें उकारान्त नाम)—मोक्षाची इच्छा करणारा
मुह् (४ प. प)—मूर्च्छा येणें, वेडे होणें
मुह् (प्रयोजक)—मोह पाडणें, भुलविणें
मुहूर्त -म् (पु न)—थोडा वेळ, क्षण
मूढ (मुह् धातूचें भू. धा. वि)—मूर्ख
मूर्धन् (पु)—डोकें
मृ (६ आ प.)—मरणे
मृग (पु)—हरिण
मृगी (स्त्री)—हरिणी
मृगतृष्णिका (स्त्री.)—मृगजळ
मृज् (२ प. प)—पुसणें, सारवणें
प्र+मृज्—धुऊन टाकणें
मृणाल -म् (पु न)—देंठ, मूळ
मृद् (स्त्री)—माती
मृधम् (न)—युद्ध
मेदिनी (स्त्री)—पृथ्वी
मेष (पु)—मेंढा
मैथिली (स्त्री)—सीता
मौलि (पु)—मस्तक, डोकें

## य

यम् (१ प प)—ताब्यांत ठेवणें
नि+यम्— ,, , आवरणें
यव (पु)—एक प्रकारचें धान्य
यष्टि (स्त्री)—काठी
या (२ प. प)—जाणें
अनु+या—अनुसरणें, मागून जाणें
यात्रिक —प्रवासी
यियासत् (या धातूच्या इच्छार्थकाचें वर्त. धातु वि)—जाण्याची इच्छा करणारा
युज् (४ आ प)—मन एक करणें
नि+युज् (७ आ.)—नेमणूक करणे

युत (यु धातूचें क. भू. धा. वि.)—जोडलेला
युयुत्सु (युध् धातूच्या इच्छार्थकाचें उकारान्त नाम)—लढण्याची इच्छा करणारा

## र

रक्त (वि.)—तांबडा, लाल रंगाचा
रज्जु (स्त्री.)—दोरी
रञ्ज् (१ उ. प.; ४ उ. प.)—रंगविणें, चकाकणें
अनु+रञ्ज्—आसक्त होणें, प्रेम करणें
रणधुरा (स्त्री.)—युद्धाची जोखीम
रभसात् (अव्यय)—घाईनें, जोरानें
रम् (१ आ. प.)—खेळणें, क्रीडा करणें
वि+रम् (१ प. प.)—थांबणें
अभि+रम् (प्रयोजक)—संतुष्ट करणें
रमण (पु.)—वल्लभ, आवडणारा
रशना (स्त्री.)—कमरपट्टा
रस (पु.)—गोडी, चव
राज्यधुरा (स्त्री.)—राज्याची जबाबदारी
राध् (५ प. प.; ४ प. प.)—आराधना करणें
अप+राध्—अपराध करणें
रिच् (७ उ. प.)—रिकामें करणें
अति+रिच् (कर्मणि)—ज्यास्त असणें
रिपु (पु.)—शत्रु
रुचि (स्त्री.)—आवड
रुच् (१ आ. प.)—आवडणें
वि+रुच्—चकाकणें, प्रकाशणें
रुध् (७ उ. प.)—अडथळा करणें
अव+रुध्—अडकवून ठेवणें
रुह् (१ प. प.)—वाढणें
आ+रुह्—चढणें
रूक्ष (वि.)—कठोर
रोपित (रुह् धातूच्या प्रयोजकाचें क. भू. धा. वि.)—लावलेला
रौद्र (वि.)—भयंकर
रौरव (वि.)—रुरु जातीच्या हरिणाच्या कातड्याचें

## ल

लक्षणम्—व्याख्या, चिह्न
लक्ष्मन् (न.)—चिन्ह
लङ्घ् (१ उ. प., १० उ. प.)—पलीकडे जाणें
लप् (१ प. प.)—बोलणें
प्र+लप्—बरळणें
लभ् (१ आ. प.)—मिळणें, मिळविणें
वि+प्र+लभ्—फसविणें
लवणाम्भस् (पु.)—समुद्र
लस् (१ प. प.)—चकाकणें
वि+लस्—चमकणें, आविर्भूत होणें, प्रदर्शन करणें
लाघवम् (न.)—कौशल्य, हलकेपणा

लाञ्छनम् (न.)—चिन्ह, विशिष्ट नाव
लिख् (६ प. प.)—लिहिणें
  वि + लिख्—रोवणें
लिप्सा (लभ् धातूच्या इच्छार्थकाचें भाववाचक नाम)—मिळविण्याची इच्छा
लिप्सुः (लभ् धातूच्या इच्छार्थकाचें उकारान्त नाम)—मिळविण्याची इच्छा करणारा
लिह् (२ उ. प.)—चाटणें
लुठ् (६ प. प.)—लोळणें
लुभ् (४प.प.)—लोभ धरणें, हाव धरणें
लुब्ध (लभ् धातूचें क. भू. धा. वि.)—लोभी
लोक् (१ आ. प., १० उ. प.)—पाहाणें
  वि + लोक्—बारकाईनें पाहाणें
लोकापवाद (पु.)—लोकनिन्दा
लोमहर्षणम् (न.)—रोमांच उभे करणारें

व

वज्रसार (वि.)—ज्याला वज्राचें सामर्थ्य आहे असें
वनज्योत्स्ना (स्त्री.)—वेलीचें नांव
वपुस् (न.)—शरीर
वयस्य (पु.)—मित्र
वरवर्णिनी (स्त्री. वि.)—सुंदर किंवा चांगल्या वर्णाची (स्त्री)
वराङ्गना (स्त्री.)—श्रेष्ठ स्त्री
वरारोहा (वि. स्त्री.)—सुंदर

वर्चस् (न.)—तेज, सामर्थ्य
वर्त्मन् (न.)—मार्ग
वर्मन् (न.)—चिलखत
वल्कलम्-ः (न., पु.)—झाडाच्या साल्येचें वस्त्र
वल्लभ (पु.)—प्रियकर
वश् (२ प. प.)—इच्छा करणें
वशं गम् (१ प. प.)—ताब्यांत जाणें, वश होणें
वशिन् (पु.)—यति
वसुंधरा (स्त्री.)—पृथ्वी
वह् (१ प. प.)—नेणें, वाहाणें, उचलणें
  वि+वद्, सम्+वद्—विवाद करणें
वा (२ प. प.)—वाहाणें (वारा)
वाग्मिन् (वि.)—वक्ता
वाच्यता (स्त्री.)—निन्दा
वात्सल्यम् (न.)—प्रेम
वामोरु (स्त्री.)—वारांगना
वारि (न.)—पाणी
वारिवाहः (पु.)—मेघ
वासस् (न.)—वस्त्र
विकारिन् (वि.)—भावनावश
विगुण (वि.)—गुणरहित
विचारितम् (न.)—विचार करणें
विचेतन (वि.)—शुद्धीवर नसलेला
विज् (६ आ. प.; ७ प. प.)—भीतीनें कापणें
  उद् + विज्—तिरस्कार करणें, कंटाळणें

वैतालिक (पु)—भाट, स्तुतिपाठक
व्यपाय (पु)—अंत, शेवट, संपणें
व्यसनम् (न)—संकट
व्याहार (पु)—शब्द, भाषण
व्युष्ट (वि)—पहाट झालेला, संपलेला

श

शकट-म् (पु न)—गाडा
शङ्कु (पु)—बाण, खपीर
शतप्रभ (वि)—शताप्रमाणें तेज असणारा
शम् (४ प प)—शान्त होणें
उप+शम्—शांत होणें, थांबणें
प्र+शम् (प्रयोजक)—थांबवणें, विझवणें
शमिन् (वि)—इंद्रियदमन करणारा
शमयितृ (वि. पु)—नाश करणारा, विझवणारा
शयनम् (न)—बिछाना
शरीरिन् (वि)—आत्मा, शरीरयुक्त प्राणी
शशक (पु)—ससा
शशिन् (पु)—चंद्र
शात (वि)—धारदार
शालि (पु)—भाताचा [illegible]
शावक (पु)—छावा
शाश्वत (वि)—चिरकाल टिकणारा
शास् (२ प प)—राज्य करणें, शिकविणें, उपदेश करणें

शिक्ष् (१ आ प)—शिकणें
शिखिन् (पु)—मोर
शिथिल (वि)—सैल
शिष् (७ प प)—भेद करणें, बाकी राहाणें
वि+शिष् (कर्मणि)—ज्यास्त चांगला असणें, श्रेष्ठ असणें
शी (२ आ.प)—पडून राहाणें, झोपणें
शुच् (स्त्री)—शोक
शुच् (१ प प)—शोक करणें
अनु+शुच्—दुःख वाटणें
शुचि (वि)—शुद्ध
शुण्डा (स्त्री)—सोंड
शुभशंसिन् (वि)—मंगलदायक, शुभ सूचक
शून्य (वि)—निर्जन
शैत्यम् (न)—थंडपणा
शैवल (पु)—शेवाळ
शैशवम् (न)—बालपण
श्रीकण्ठपदलाञ्छन (पु)—श्रीकण्ठ हा शब्द ज्याचें विशिष्ट चिह्न आहे असा (भवभूति)
श्रीमत् (वि)—संपत्तिमान्, कीर्तिमान्
श्रु (५ प प)—ऐकणें
प्रति-आ+श्रु—वचन देणें
श्रुतम् (न)—वेद विद्या
श्रेयस् (वि)—हितकर, कल्याणप्रद
,, (न)—कल्याण, शुभ गोष्ट
श्रोत्रम् (न)—कान

श्लाघ्य (वि.)—स्तुत्य
श्लिष् (४ प. प.)—आलिंगन देणें
आ+श्लिष्— „ „
श्वस् (२ प. प.)—श्वास घेणें
आ+श्वस् (प्रयोजक)—धीर देणें

## स

संयम (पु.)—इंद्रियांवर ताबा
संयुग॰ (पु.)—युद्ध
संवृत (सं+वृ धातूचें क. भू. धा. वि.)
—झाकलेला, आच्छादिलेला
संसारभाव॰ (पु.)—ऐहिक वस्तु
संहत (सं+हन् धातूचें क. भू. धा. वि.)
—एकत्र झालेला
संहति (स्त्री.)—एकी, ऐक्य
सङ्कल्प॰ (पु.)—इच्छा
संक्षय (पु.)—पुरा नाश
सङ्घर्ष (पु.)—चढाओढ, स्पर्धा
सज्ज (वि.)—तयार
संचूर्णित (सं+चूर्ण् धातूचें क. भू. धा.
वि.)—चुराडा केलेला
संच्छन्न (सं+छद् धातूचें क. भू. धा.
वि.)—वेढिलेला, लपविलेला
सतम् (न.)—सतत
सत्त्वम् (न.)—१ प्राणी
—२ सामर्थ्य
—३ निगुणांतील पहिला
गुण
सत्तम (वि.)—अति चांगला

सत्यवत्यात्मज॰ (पु.)—सत्यवतीचा
मुलगा व्यास (आत्मज—पुत्र)
सत्संनिधानम् (न.)—चांगल्या लोकांची
संगत
सद् (१ प. प.)—बसणें, गढून जाणें
अव+सद्—नाश होणें, वाईट दशा
होणें
नि+सद्—बसणें
प्र+सद्—प्रसन्न होणें
„ (प्रयोजक)—शुद्ध किंवा स्वच्छ
करणें
वि+सद्—विषाद पावणें
सद्मन् (न.)—घर
सदाचार्य —विद्वान् व सच्छील गुरु
सन्नस्त (सं+त्रस् धातूचें क. भू. धा.
वि) भ्यालेला
सन्तानवाहिन् (वि.)—एकसारखें येणारें
—सतत चालू
राहणारें
सपत्नी (स्त्री.)—सवत
समराङ्गणम्—युद्धभूमि
समभ्येत्य (सम्+अभि+इ धातूचें
त्यबन्त रूप)—जवळ जाऊन
समा. (स्त्री. ब. व.)—वर्षे
समापन्न (सम्+आ+पद् धातूचें क.
भू. धा. वि.)—जवळ आलेला,
ओढवलेला
समीपग (वि.)—जवळ जाणारा
समुत्थाप्य (सम्+उद्+स्था धातूच्या
प्रयोजकाचें त्यबन्त रूप) वर उचलून

सम्पाति (पु)—जटायूच्या भावाचें नाव
सम्प्रवृत्त (सम्+प्र+वृत् धातूचें क भू धा वि)—तयार झालेला
सर्वश (अव्यय)—सर्व प्रकारांनी सर्वांनी
सलिलम् (न)—पाणी
सवनकर्मन् (न)—यज्ञकर्म
सस्यम् (न)—धान्य
सहज (वि)—जन्मापासून असलेलें —नैसर्गिक
सहोदर (पु.)—सख्खा भाऊ
साटोपम् (अव्यय)—आढ्यतेनें, गर्वानें
सात्यकि (पु)—कृष्णाच्या सारथ्याचें नाव (यादववीर)
साधुवृत्त (वि)—चांगल्या आचरणाचा
सानुमत् (वि पु)—पर्वत
सारङ्ग (वि)—ठिपके असलेलें
सारङ्ग (पु)—ठिपके असलेला हरिण
साहाय्यम् (न)—मदत
सिन्धुपति (पु)—सिंधुदेशाचा राजा जयद्रथ
सुकृतिन् (वि)—चांगलीं कृत्यें करणारा, पुण्यवान्
सुखश्रव (वि)—कानाला गोड वाटणारा
सुधा (स्त्री)—अमृत
सुप्त (स्वप् धातूचें क भू धा वि)—झोपलेला
सुरपति (पु)—इंद्र
सुरभि (वि)—सुवासिक
सूच्यग्रम् (न)—सुईचें टोक
सूत (पु)—सारथि
सूद (पु)—आचारी
सृज् (६ प प)—उत्पन्न करणें
उद्+सृज्—सोडून देणें
उप+सृज्—पीडा देणें, मारणें
वि+सृज्—पाठवणें
सेचनम् (न)—शिंपडणें, पाणी घालणें
सेव् (१ आ प)—सेवा करणें, उपभोग घेणें, आश्रय करणें
सोढ (सह् धातूचें क भू धा वि)—सहन केलेला
सोत्कण्ठम् (अव्यय)—उत्सुकतेनें
सोपानम् (न)—जिना, पायऱ्या
सौगन्धिकम् (न.)—पांढरें अथवा निळें कमळ
स्कन्ध (पु)—शाखा, खांदा,
स्तनितम् (न)—मेघगर्जना
स्तोक (वि)—थोडें
स्था (१ प प)—उभें राहाणें
आ+स्था (१ उ प) आचरणें, रूप धारण करणें, उपयोगास आणणें
प्र+स्था (१ आ प)—निघणें
उप+स्था (१ आ प)—पूजा करणें, जवळ येणें
उद्+स्था (१ आ प)—धडावणें जोरावणें
(१ प प) उठणें

